श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं

अर्पिलेला

# तिसरा सुमनहार

## अनुक्रमणिका

विषय व लेखक — पृष्ठांक

॥ श्रीराम ॥

# तिसरा सुमनहार

## प्रस्तावना

सांडून आपली संसारचेथा। करीत जावी सद्गुरूची चिंता।
निरूपण कीर्तन कथा वार्ता। सद्गुरूच्या चि सांगाव्या ॥

असें, देवाच्या जागीं सद्गुरूची स्थापना करून म्हणतां यावें, अशी महत्त्वाकांक्षा बाळगून, श्री **रामदास** आणि **रामदासी** मासिकानें सुमनहार गुंफून ते श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं अर्पण करण्याचा क्रम, देवतेच्या प्राणप्रतिष्ठेच्या दिवसापासून आरंभिला, तो अखंड चालूं राहावा, अशी श्री समर्थचरणीं लीन होऊन प्रार्थना आहे. अर्थात् असले सुंदर हार गुंफण्याचें, मासिकाच्या एकट्या संपादकाचें सामर्थ्य नोहे. अनेक श्रीसमर्थभक्तांनीं नित्य नूतन पुष्पें पुरविण्याचें मनावर घेतलें तर च हा क्रम अव्याहत चालूं राहणार. आम्हांस परिचित आणि अपरिचित असलेल्या सर्व प्रज्ञावंत आणि अनन्य श्रीरामदासांकित विद्वानांना आमची प्रार्थना कीं, श्रीसमर्थांच्या या सेवेला आपण होऊन सर्वांनीं हातभार लावावा.

या हारांतील पुष्पें केव्हा हि कोमेजून जात नाहींत. दुसरा हार अर्पण करतांना पहिला हार मागें पडत नाहीं. हीं पुष्पें नेहमीं ताजीं राहतात. त्यांचा सुगंध नाहींसा तर होत नाहीं च, पण कमी हि न होतां दिवसगतीनें सारखा वाढत च जातो.

पहिला सुमनहार ३५ पुष्पांचा ( निबंधांचा ) आहे. त्याच्या ३८३ पाकळ्या ( पृष्ठें ) आहेत. दुसऱ्यांत १३ पुष्पें असून त्यांच्या पाकळ्या १७५ आहेत. आणि

प्रस्तुतचा विषय हार २० पुष्पाचा असून त्याच्या पाकळ्या २१५ आहेत. यापुढें कोणास हि श्रीसमर्थांविषयी कांहीं सप्रमाण बोलावयाचें किंवा लिहावयाचें झाल्यास त्याच्या अवलोकनात हे हार आले पाहिजेत, तर च तो कांहीं नवीन बोलू किंवा लिहू शकेल.

प्रस्तुतच्या हारात जीं २० पुष्पें आहेत, तीं कशामुळें सुवासिक झालीं आहेत, तें एक एक दोन दोन वाक्यांत सांगून त्याची परीक्षा करण्याचें काम वाचकांवर सोपवू.

**पहिलें पुष्प-श्रीसमर्थांचा सातपुड्यांतील संचार-** हें अकोल्याचे रा. राजाभाऊ गद्रे यांचेकडून आलेलें आहे. राजाभाऊच्या बहुतेक लेखांत नेहमीं संशोधनाची नवीन दिशा दाखविलेली असते. तीर्थाटणाच्या काळांत उत्तरेकडे जाण्यापूर्वी बैतुल, माहुर, कारंजा, अकोला, वाशी, एलिचपुर, अमीरा, रामटेक, शनीम, छिंदवाडा, अमरकंटक इत्यादि प्रत्यक्ष सातपुड्यातील भागात किंवा त्याच्या आसमंतात् श्रीसमर्थांचा संचार झाला असावा, असें रा. राजाभाऊनीं या निबंधात सुचविलें आहे.

**दुसरें पुष्प – मराठ्यांची राजनीति –** हें पुष्प राजवाडे-संशोधन-मंदिराचे प्राण तात्यासाहेब भट यांच्या बगेंतील होय. राजवाडे यांच्या संग्रहाबरोबर च त्यांचे जळजळीत विचार आणि सडेतोड भाषा यांचा वारसा रा. भट यांनकडे आल्याचा प्रत्यय, हा निबंध वाचून वाचकास येईल, असा आम्हांस विश्वास आहे. शुक्रनीतीवर मराठ्यांची राजनीति आधारलेली होती व पुढें कधीं काळीं स्वराज्य मिळावयाचें व मिळाल्यावर टिकावयाचें असल्यास तें त्या च नीतीचा आश्रय करून मिळेल आणि टिकेल, असा रा. भटांचा सिद्धान्त आहे.

**तिसरें पुष्प – श्रीसमर्थांचे चमत्कार –** हें येथाल मुलींच्या हमनी शाळेवरील मुख्य अध्यापिका श्री. शारदाबाई साठ्ये यांनीं गुंफिलें आहे. श्रद्धा आणि विवेक यांचें मधुर मीलन या निबंधात वाचकांना आढळेल.

**चवथें पुष्प – श्रीसमर्थांच्या उपदेशाची चतुःसूत्री –** हें केसरीचे सपादक रा. तात्यासाहेब करंदीकर यांच्या लेखणींतून उतरलें आहे. श्रीसमर्थवाङ्मयाचा तात्यासाहेबांचा व्यासंग विख्यात आहे. शक्ति-युक्ति-भक्ति-मुक्ति अशी त्यांनीं श्रीसमर्थांच्या उपदेशाची चतुःसूत्री उदाहरणें देऊन सिद्ध केली आहे.

**पांचवें पुष्प – श्रीसमर्थांवरील आरती** – ही एका श्रीसमर्थसेवकानें रचिली असून तींत श्रीसमर्थांचें सारें चरित्र गोविलें आहे.

**सहावें पुष्प—श्रीसमर्थ आणि संघटण**-श्रीसमर्थांनीं साऱ्या भरतखंडभर संघटण कसें केलें आणि कां केलें हें या टांचणात दाखविलें असून श्रीसमर्थ हे पाहिले बृहन्महाराष्ट्रीय होत, असें म्हटलें आहे.

**सातवें पुष्प – श्रीसमर्थ आणि ब्राह्मण्य** — ब्राह्मण्य हें एक अविनाशी तत्त्व असावें, असें मानल्याशिवाय, गुरु तो सकळांसी ब्राह्मण । जर्‍ही तो जाला क्रियाहीन । तरी तयासी च शरण । अनन्यभावें असावें ॥ किंवा, जरी ब्राह्मण मूढमती । तरी तो जगद्वंद्य ॥ या श्रीसमर्थांच्या वचनाची उपपत्ति लावता येणें शक्य वाटत नाहीं. ही उपपत्ति लक्ष्यात न आल्यामुळें या वचनाविषयीं इतर साशंक असावेत, यांत नवल नाहीं, पण स्वत पुष्कळ ब्राह्मण हि, हें असें कसें, म्हणून शंका विचारीत असतात. त्याचें समाधान वरील उपपत्तीनें व्हावें व ज्या कारणानें इतर शंकित होतात, तें कारण हि, प्रत्यक्ष श्री तुकाराम महाराज हि असें च म्हणत आहेत, हें पाहिलें म्हणजे, शिल्लक राहू नये, असें वाटतें. महाराज म्हणतात :

> मर्कटें आघोळी लावियेले टिळे ।
> ब्राह्मणाचे सोळे वर्हू नेणे ॥ २२२३-३
>
> जरी तो ब्राह्मण जाला कर्मभ्रष्ट ।
> तुका म्हणे श्रेष्ठ तिहीं लोकीं ॥ ४

**आठवें पुष्प— श्रीमत् दासबोधांत बहुधा अध्यात्मनिरोपण निरोपिलें, तें कां च कसें?** हें या निबंधात रा गोपाळराव गोखले यांनीं दाखविलें आहे. अध्यात्माची बैठक नीट बसली तर च, लोकसंग्रहार्थ कर्मयोगाचरण नीट घडू शकतें, तेव्हां सर्व देशभर संचारार्थ शिष्य जावयाचे, त्याची या दृष्टीनें तयारी व्हावी म्हणून त्यांना अध्यात्म सामर्थ्याची श्रीसमर्थांना आवश्यकता भासली असली पाहिजे, असें सांगून

> कोऽहं कथमिदं जातम् । को वै कर्ताऽस्य विद्यते ।
> उपादान किमस्तीह । विचार सोऽयमीदृश ॥

या चार प्रश्नांचा आमच्या निबंधांत गोपाळरावांनीं विचार केला आहे. हे च चार प्रश्न नीट कळले म्हणजे बरें, असें श्रीसमर्थांनीं हि म्हटलें आहे :

परमेश्वरास वोळखिलें । आपण कोणसें कळलें ।
आत्मनिवेदन जालें । म्हणिजे बरें ॥ १०-८-२२
ब्रह्मांड कोणें केलें । कोणाचें उभारलें ।
मुख्य कर्त्यास वोळखिलें । म्हणिजे बरें ॥ २३

**नववें पुष्प – मायावादांत व्यावहारिक कर्में सिद्ध होऊं शकतात –** हें पुष्प महामहोपाध्याय श्रीधरशास्त्री पाठक यांच्या कृपेनें प्राप्त झालें आहे. वेदान्तामध्यें सत्ता तीन प्रकारची मानलेली आहे. दोरी असतां सर्प भासला ही प्रातिभासिक सत्ता, दोरी आहे हें कळलें ही व्यावहारिक सत्ता आणि त्या दोरीच्या ठिकाणीं हि ब्रह्मदृष्टि उत्पन्न होणें ही पारमार्थिक सत्ता होय. तथापि ब्रह्मदृष्टि प्राप्त झालेल्या पुरुषास तशी दृष्टि प्राप्त न झालेल्या लोकांकरितां व्यवहारांत व्यवहारी लोकांसारखें वागावें लागतें, हें शास्त्रीमहाशयांनीं या प्रबंधात सिद्ध केलें आहे. आमच्या श्रीसमर्थांची हि शिकवण शब्दशः अशी च आहे :

प्रकृतीसारिखें चालावें । परी अंतरीं शाश्वत वोळखावें ।
सत्य होऊन वर्तावें । लोकां ऐसें ॥ ११-२-४०

**दहावें पुष्प – श्रीसमर्थचरित्रांतील ध्रुवाचा तारा** म्हणजे "अवघे चि सुखी असावे । ऐसी वासना ॥" होय, असें या टिपणांत म्हटलें आहे.

**अकरावें पुष्प – श्रीसमर्थांच्या पाऊलवाटेवर : राजे रघुजींचें रामदास्य –** श्रीसमर्थांची शिकवण त्यांच्या काळीं उपयोगीं पडली, इतकें च नव्हे, तर त्यांच्या पश्चात् हि पडली आणि यापुढें हि पडणारी आहे, हें रघुजी राजे भोसले यांचें उदाहरण देऊन रा. राजाभाऊ गदे यांनीं सिद्ध केलें आहे. रा. राजाभाऊ यांच्या बहुतेक निबंधाप्रमाणें या हि निबंधात त्यांनीं नवीन संशोधनाचा प्रांत दाखविला आहे.

**बारावें पुष्प – आज श्रीसमर्थ असते तर –** तत्कालीन व सद्यःकालीन देशस्थितीचें व राष्ट्रीय संस्थांचें निरीक्षण करून या निबंधात राष्ट्रीय-स्वयंसेवक-संघाची उपयुक्तता दर्शविली आहे.

**तेरावें पुष्प – श्रीसमर्थसंघाचें स्वरूप –** गेल्या ज्येष्ठ शु. १४ स श्रीरामदासी संमेलन भरून श्रीसमर्थसंघ स्थापण्यांत आला. त्या प्रसंगीं अध्यक्ष या नात्यानें नामदार दादासाहेब मावळंकर यांनीं जें भाषण केलें, त्याचा सारांश या पुष्पांत देण्यांत आला आहे. श्रीसमर्थांचा काळ आणि त्यांची शिकवण हीं विचारांत घेऊन तत्त्वनिष्ठा, सदभिरुचि आणि सत्यप्रीति यांच्या बळावर शीलवान् बनून महाराष्ट्रीयांना आपली उज्ज्वल परंपरा टिकवितां यावी व आत्मोन्नति करून घेतां यावी, म्हणून श्रीसमर्थसंघ स्थापण्यांत आला आहे, असें नामदारांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत प्रतिपादन केलेलें आहे.

**चौदावें पुष्प–स्वराज्याच्या महामंत्राचे आद्यगुरु श्रीसमर्थ–** हें पुष्प रा. अनंत विश्वनाथ ऊर्फ बापुराव टिळक यांनीं गुंफिलें आहे. निर्विकार मनानें विचार करणारा श्रेष्ठ प्रतीचा एक विचारवंत पुरुष, अशी रा. बापुरावांविषयीं या प्रस्तावनालेखकाची आदरबुद्धि असल्यामुळें त्याला हें पुष्प विशेष आवडावें, हें स्वाभाविक आहे. या पुष्पाचा सुगंध सर्वत्र दरवळलेला असल्यामुळें त्याचें रहस्य एक दोन वाक्यांत देण्याच्या भरीस न पडतां त्या पुष्पाचा सुवास वाचकांनीं स्वतः घेऊन पहावा, अशी विनंति करून मी पुढचें पुष्प हातीं घेतों. निबंधाच्या उपलया नांवांत हि सर्व कांहीं आलें च आहे.

**पंधरावें पुष्प–गिरिधरांचें अद्भुतरामायण–**रा. सात्यासाहेब करंदीकर हे ज्योतिषशास्त्रज्ञ असल्यामुळें या रामायणांतील मितयांची त्यांनीं या निबंधांत चिकित्सा केली आहे. त्यांनीं दाखविलेला एक योगायोग अपूर्व वाटतो. रामानें सुग्रीवाला किष्किंधेचें राज्य देऊन राज्याभिषेक केला तो ज्येष्ठ शु. १३ ला च आणि श्री शिवछत्रपतींना राज्याभिषेक झाला, तो हि त्या च मितीस !

**सोळावें पुष्प–रामचंद्र पंत अमात्य यांचा अल्प परिचय–** रामचंद्रपंत अमात्य हे श्रीसमर्थांचे अनुग्रहित होते. ते श्रीसमर्थकार्याचे निष्ठावंत अभिमानी होते. त्यांचा आणि श्रीसमर्थसंप्रदायाचा संबंध दर्शविणारीं जेवढीं म्हणून कागदपत्रें वगैरे उपलब्ध आहेत, त्या व इतर साधनांच्या आधारें रा. वासुदेवराव ठाकुर यानीं या लेखांत पंतांचें संगतवार चरित्र रेखाटलें आहे.

**सतरावें पुष्प–विरक्त श्रीसमर्थ–**निवृत्तिधर्म किंवा वैराग्य आणि व्यवहार किंवा राजकारण यात मूलतः विरोध केव्हां हि नव्हता, नाहीं आणि

नसावा, त्याच प्रमाणें भारतीय तत्त्वज्ञानाच्या अनेक विचारप्रवाहांपैकी वैराग्याचा विचारप्रवाह आयुष्याला निरुपयोगी आहे किंवा होतो हा हि भ्रम आहे हे दोन् सिद्धान्त श्रीसमर्थांनी आपल्या तत्त्वज्ञानानें आणि आचारानें कसे सिद्ध केले आहेत, हें रा. नरहर वासुदेव शिदोरे यांनीं आपल्या निबंधात पटवून दिलें आहे.

**अठरावें पुष्प – श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील वाल्मीकि रामायणाची प्रत श्रीसमर्थांच्या च हातची**–असा निर्णय या प्रबंधात रा. गोपाळराव गोगटे यानीं केला आहे वाग्देवतामंदिरानें नेमलेल्या समितीनें " सर्व प्रमाणाचा विचार करता ही प्रत श्री समर्थांच्या च हातची असण्याचा बळकट संभव आहे " असा आपला निर्णय गतवर्षी ज्येष्ठात दिला होता त्या समितींत रा. गोपाळराव स्वत होते च नंतर त्यानीं एकट्यानें अनेक दिवस आणि अनेक तास त्या प्रतीच्या संगतींत खर्च करून, अनेक साधक आणि बाधक प्रमाणाचा विचार करून ही प्रत नि संशय श्रीसमर्थांच्या च हातची आहे, असें या निबंधात सप्रमाण सिद्ध केलें आहे आपल्या निबंधात या प्रतीचें महत्त्व हि त्यांनीं प्रसंगानुसार दाखवून **रामेण रामदासेन लिखितं वाल्मीकिरामायणम्** त्वरित प्रकाशित होण्याविषयीं आपली उत्कट इच्छा व्यक्त केली आहे.

**एकोणिसावें पुष्प – रामचंद्रपंत अमात्यांचा जन्मकाल** – जो रा. ठाकुर यानीं आपल्या वरील १६ व्या निबंधांत अनिश्चित मानला होता, तो या निबंधात रा अनंतदास रामदासी यानीं अनेक प्रमाणाधारें शक १५७१–७२ असावा, असा निश्चित केला आहे

**विसावें पुष्प–नवव्या दशकाचा अन्वय**–हें या हारातील शेवटचें पुष्प होय तें इंदूर येथील रा. महादेव काशीनाथ खेर यानीं गुंफलें आहे नवव्या दशकाच्या दहा हि समासांची परस्परसंगति कशी लागते, तें रा खेर यानीं अत्यन्त मार्मिकपणानें दाखविलें आहे या विवेचनावरून वाचकाच्या प्रत्ययास ती संगति जशी येते, तसाच रा खेर यांचा अधिकार हि प्रत्ययास येत आहे वीस हि दशकाची याप्रमाणें संगति लावून दाखविण्याची रा. खेर यांची महत्त्वाकांक्षा आहे ती सफल होवो, अशी आम्ही प्रार्थना करितों.

असो, अनेकांनी मिळून गुंफलेला हा तिसरा सुमनहार आज श्रीसमर्थ-वाग्देवतेच्या चरणीं साष्टांग नमस्कारपूर्वक अर्पण करून चवथ्या सुमनहारासाठीं फुलें गोळा करण्याच्या उद्योगास आपण लागलें पाहिजे.

धुळें
१८६१ फाल्गुन व. ३

चिटणीस
सत्कार्योत्तेजक सभा



॥ श्रीराम ॥

# श्रीसद्गुरुस्तवन

( वाडाक ६७० वरून )

समर्थ रामदास हा । उदास दास तो पहा ।
जनास ना कळे स्थिती । मनासि ना कळे गती ॥ १

प्रपंच वारिला सळें । विवेक लावला बळें ।
समस्त हेत सारिला । रिपु बळें चि मारिला ॥ २

कुदांत काय यापुडें । कदां न पाहे यांकडें ।
उदास दास नाचती । नभांत घोष गाजती ॥ ३

मला समर्थ दास हा । प्रयोजिला चि या पहा ।
उदास वृत्ति फारसी । मनांत वृत्ति गाइसी ॥ ४

जनांत रामदास रे । बहुत मान्य त्यास रे ।
तया पदीं च वास रे । करीत देवदास रे ॥ ५



श्री

रामदास आणि रामदासी

भाग चौतिसावा

# श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं अर्पिलेला

# तिसरा सुमनहार

---

## ( १ )

## श्रीसमर्थांचा सातपुड्यांतील संचार

( लेखक—रा. त्रिंबक रामकृष्ण गद्रे,
बी. ए., एल्एल्. बी., वकील, अकोला )

जें न देखे रवि तें देखे कवि ।

**परिच्छेदांचे मथळेः**—( १ ) श्रीसंचाराचें भौगोलिक क्षेत्र ( २ ) तीर्थयात्रांचा शोध ( ३ ) बैतुलचें साम्य ( ४ ) माहूर तें बैतुल ( ५ ) कारंजा अथवा करंजपुर ( ६ ) कारंज्याचें रामदास्य ( ७ ) अरोल्यात आगमन ( ८ ) वारींचा हनुमान ( ९ ) एलिचपूरला भेट ( १० ) रामदासी संशोधनाची दिशा

### ( १ ) श्री संचाराचें भौगोलिक क्षेत्र

श्री समर्थांचा सातपुड्यात संचार झाला होता ही निर्विवाद गोष्ट होय. तपश्चर्या संपल्यानंतर ते नाशकाहून निघाले ते थेट काशीस गेले

ही घटना खरी वाटत नाहीं. नाशीक ते माहूर, तेथून कारंजा व अकोला, नंतर वारी व एलिचपूर या मार्गानें ते बैतुलास श्री मुकुंदराजांच्या समाधीच्या दर्शनास गेले. बैतुल येथें त्यांनीं दीर्घ काल मुक्काम करून ते छिंदवाडा बालाघाट भंडारा या भागांतून वैनगंगेच्या कांठीं असलेल्या श्री हरिनाथांच्या अंभोरा येथील समाधीच्या दर्शनार्थ गेले व तेथून रामटेकांतील श्री रामचंद्राच्या दर्शनानंतर ते छत्तिसगड विभागांतील राजीम आदि रघुनाथक्षेत्रांचें दर्शन करीत अमरकंटक वरून सुप्रसिद्ध रामपंथीय संत तुलसीदास यांच्या चित्रकूट स्थानाप्रत गेले. तेथून प्रयाग येथें गंगास्नान करून नंतर रामदास स्वामी वाराणसी येथें गेले असले पाहिजेत. वरील उल्लेखिलेल्या स्थानांपैकीं बहुतेक स्थानें विदर्भमध्यप्रांतांतील असून या प्रांतीं रामदासी संशोधन करण्यास किती अवकाश आहे हें हि समजण्यासारखें आहे. प्राचीन महाराष्ट्र याच विभागांत नांदत होतें व त्याची निर्मिति होत असतांना प्रत्यक्ष श्रीरामप्रभूंचे चरण या विभागास लाभले होते।

## ( २ ) तीर्थयात्रांचा शोध

श्रीसमर्थांनीं कृष्णातीरीं आगमन करण्यापूर्वी व आपल्या अवतार कृत्यास आरंभ करण्याच्या आधीं त्यांनीं केलेल्या तीर्थयात्रांचा शोध होणें अत्यंत अवश्य आहे. त्यांनीं कोणत्या क्रमानें प्रवास केला हें उपलब्ध नाहीं. परंतु त्यांनीं भारतांतील सर्व तीर्थयात्रा केल्या व त्यांत बारा वर्षें घालविलीं याविषयीं मात्र सर्वांचें ऐकमत्य दिसतें. इंदूरशोधन मठामध्यें सांपडलेल्या " तीर्थावळी " त अशा कांहीं स्थळांचा नामनिर्देश आहे. समर्थशिष्य महंत उद्धव यानीं या प्रवासाचें तपशीलवार वर्णन केलें आहे असा उल्लेख समर्थवाक्येनिर्शीत आहे. परंतु हें प्रवासवर्णन अद्याप सापडलेलें नाहीं. " प्रतापकारां " नीं हि तीर्थयात्राविषयाचा तपशीलवार उल्लेख टाळला आहे. भीमस्वामीनीं भक्तलीलामृतांत दहाबारा क्षेत्रांचीं नावें दिलीं आहेत. हनुमंतस्वामींच्या बखरींत तीर्थयात्रांचा उल्लेख आहे. परंतु सातपुड्यांतील संचाराची माहिती अद्याप तरी तत्कालीन किंवा त्यानंतरच्या

श्रीचरित्रकारांनीं दिलेली सांपडत नाहीं. तथापि काशीस पोहोचण्यापूर्वी निदान तीन चार वर्षे तरी रामदास स्वामी सातपुड्यांत म्हणजे विदर्भ मध्यप्रांतांत भ्रमण व तपश्चर्या करीत असले पाहिजेत अशी आमची अनुमानात्मक कल्पना गेल्या तीन चार वर्षांपासून आमच्या मनांत घोळावत आहे व तिच्या पुष्ट्यर्थ कांहीं माहिती हि संशोधकांपुढें ठेवण्याचा आमचा मानस आहे. अधिकारी संशोधकास त्याचा उपयोग झाला व त्यानें श्रीचरित्राचें हें प्रकरण लिहिलें तर आह्मास धन्यता वाटेल.

( २ ) बैतुलचें भाग्य

उमरावती व नागपूर या जिल्ह्यांना चिकटून उत्तरेला सातपुड्याच्या माथ्यावर बैतुल जिल्हा आहे व तो जरी सध्यां "महाकोसळ" मध्यें मोडत असला तरी इतिहास, संस्कृति, भौगोलिक रचना व भाषा या सर्व बाबतींत तो वऱ्हाड नागपूरचाच विभाग आहे. मराठीचे आद्य कवि आणि विवेकसिंधु व परमामृत या ग्रंथांचे कर्ते श्री मुकुंदराज यांची समाधी बैतुलनजीक खेरला या किल्ल्याच्या पायथ्याशीं आहे. मुकुंदराजाच्या विचाराचा व भाषेचा समर्थांच्या ग्रंथांवर व विशेषतः "दासबोधा" वर परिणाम झालेला दिसतो अशी आशंका कित्येक विद्वानांना अलिकडे येऊं लागली आहे व पुण्याचे प्रसिद्ध इतिहास संशोधक प्रो. द. वा. पोतदार, बी. ए. यांनीं "पहिला सुमनहार" या ग्रंथात त्यावर एक निबंध हि लिहिला आहे. संवादपद्धति, भाषासाम्य, "महंती–महंत" असे शब्दप्रयोग, पचीकरण परिभाषेचें साम्य, अशा कित्येक मुद्द्यांनीं प्रो. पोतदारांनीं असें अनुमानिलें आहे कीं "पूर्वसूरि जे मुकुंदमुनि त्याचे ग्रंथ रामदासानीं पाहिले–पढले–असावेत." आह्मी तर एक पाऊल पुढें जाऊन असें ह्मणू इच्छितो कीं, श्री मुकुंदराजांच्या समाधीच्या जवळपास रामदासस्वामींनीं काहीं काळ घालवून मुकुंदराजाच्या वाङ्मयाचा अभ्यास केला व तेथें तपश्चर्या केली. काहीं महिन्यांपूर्वी बैतुलास आम्ही गेलों असता आमचे मित्र व मराठीचे एक प्रसिद्ध जुन्या पिढींतले कवि श्री. गोविंद पांडुरंग देवधर, एम्. ए., एल् एल्. बी.,

यांनीं आम्हांस अशी माहिती दिली कीं, बेतुलच्या अगदीं जवळ समर्थांची तपश्चर्येची जागा अद्याप दाखविली जाते व प्रतिवर्षी भाविक लोक यात्रेच्या निमित्तानें तेथें जमतात. आम्हांस हें ऐकून अति आनंद झाला व आमचें अनुमान दृढ झालें. या पवित्र स्थानाचें छायाचित्र व त्याची विस्तृत माहिती प्रसिद्ध होणें अगदीं अवश्य आहे.

## ( ४ ) माहूर ते बेतुल

रामदासांनीं नाशिकहून निघतांना माहूरास च प्रथम जाण्याचें कां घरें ठरविलें असावें ! याचा उत्तर त्या वेळीं असलेल्या माहूर क्षेत्राच्या महत्त्वांत आहे. फार प्राचीन कालापासून माहूर हें मातापुर या नांवानें देवीचें क्षेत्र आहे. येथील देवी श्री एकनाथस्वामींची हि कुलदेवता होती. माहूर हें दत्तात्रयाचें हि प्रसिद्ध स्थान आहे. महानुभावीय पंथाचें हि हें एक महत्त्वाचें केंद्र आहे. वैष्णव वैराग्यांचे आखाडे हि येथें आहेत. अशा तऱ्हेनें हें एक समर्थांच्या काळीं अध्यात्म विद्यापीठ च होतें. तेव्हां येथील देवतांचें दर्शन घेऊन संतमहंतांचा सहवास कांहीं काळ घडावा व पुढील यात्रेचा कार्यक्रम हि ठरावा अशा हेतूनें समर्थ येथें आले असले पाहिजेत. सातपुड्याच्या संचाराला येथूनच सुरुवात होते. श्रीनृसिंहसरस्वती—ज्यांना श्रीदत्ताचा अवतार च मानण्यांत येतें—त्यांचें जन्मस्थान जें करंजपूर अथवा अकोला जिल्ह्यांतील सध्याचें कारंजा नगर हें हि माहूरपासून फार दूर नाहीं. आज हि माहूरहून पुसद रेल्वे स्टेशन थोड्या मैलांच्या अंतरावर आहे; पुसदहून दारव्हा मार्गानें कारंजास रेल्वेनें येतां येते. माहूरच्या उत्तरेस कारंजा आहे. भौगोलिक दृष्ट्या माहूर विदर्भांत च मोडतें.

## ( ५ ) कारंजा अथवा करंजपुर

अकोला जिल्ह्यातील मुर्तिजापुर तालुक्यांत कारंजा हें एक आज खेडेगांव असलें, तरी तें पूर्वी वऱ्हाडातलें एक अत्यंत भरभराटीचें व व्यापारी महत्त्वाचें आणि अत्यंत श्रीमंत नगर होतें. विदर्भाची आर्यांनीं जी पहिली वसाहत केली ती आश्रम पद्धतीनें केली. अत्रिअगस्तींचे

आश्रम, त्यांतील ऋषिपत्न्या, त्यांतील हजारो अंतेवासी ये निरनिराळ्या विद्यांचें अध्ययन करणारे वृद्ध तरुण व बालब्रह्मचारी यांचें विस्तृत वर्णनें वाल्मिकी रामायणांत आहे. अशा च एका करंज नांवाच्या ऋषीनें करंज येथें एक आश्रम स्थापन केला व ह्या ऋषीचेंच नांव पुढें तेथील तडागाला व त्याच्याजवळ वसविलेल्या गांवाला मिळालें. महाभारतकालीं विदर्भीय आश्रमांचें रूपांतर बलाढ्य क्षत्रियांच्या नेतृत्वाखालीं प्रबल विदर्भ राष्ट्राच्या स्थापनेंत झालें. इ. स. अकराशेच्या सुमारास सर्व दक्षिण व विदर्भ यांचें एक महाराष्ट्र निर्माण होऊन देवगिरी येथें त्याची राजधानी स्थापन झाली. परंतु यादवांचें हें राष्ट्र पुढें अल्लाउद्दीन खिलजीनें बुडविलें व त्यानंतर विदर्भांत बहामनी नांवाचें मुसलमानी राज्य स्थापन झाले. सुमारें पांच सहाशें वर्षे हें मुसलमानी राज्य निर-निराळ्या नांवांनीं टिकलें व नंतर त्याची हुकमत नागपूरच्या पराक्रमी भोसलेकुलोत्पन्न श्रीरामभक्त रघूजी राजे यांच्याकडे आली. या सर्व कालांत कारंजानें सांपत्तिक दृष्टीनें अत्यंत भरभराटीचे दिवस पाहिले. श्रीशिवरायांची हि दृष्टि या गावाकडे वळली व प्रतापराव गुजरासारखा त्यांचा सरदार या गांवच्या व्यापाऱ्यांकडून राष्ट्रनिधि वसूल करण्या-साठीं आला होता. गुरुचरित्रांत करंज ऋषीचें स्थान ह्मणून या गांवाचा उल्लेख आहे. या ऋषींनीं देवीची आराधना करून तिला प्रसन्न करून घेतलें व असें ह्मणतात कीं, तिनें च निर्माण केलेल्या सरोवरांत स्नान केल्यावर त्यांना झालेला रोग दूर झाला. श्रीदत्ताचा दुसरा अवतार श्री नरसिंह सरस्वती यांचा जन्म या च शहरात तेराव्या शतकांत झाला. या वेळीं अखिल भारतवर्षांत हिंदुधर्मावर भयंकर संकट ओढवलें होतें. विजयनगरच्या साम्राज्याचा अद्याप उदय व्हावयाचा होता. महाराष्ट्राच्या साम्राज्याचा नाश होऊन चुकला होता. राज्यसत्ता नाहीं, जबरदस्तीनें बाटविण्याचा सररहा प्रयत्न, स्त्री व धन यांची सुरक्षितता नाहीं, ब्राह्मण्यावर व ते नष्ट करण्याबद्दल करडी नजर, अशा भयावह संधिकालात श्रीनरसिंह सरस्वतीच्या अवतारकृत्याचें अत्यंत महत्त्व आहे. वास्तवयांत च आपल्या

अधिकाराची ओळख व्रतबंधप्रसंगीं आपल्या मातापित्यांना त्यांनीं करून दिली व त्यांना आणखी भावंडे झाल्यावर शुभाशीर्वाद देऊन ते काशीस गेले. ज्या कुळात त्यांचा जन्म झाला ते " काळे " नावाचें कुळ अद्याप कारंजा येथें सुखानें नांदत आहे. उत्तर भारतात संचार करून तेथील परिस्थिति स्वत पाहून श्रीगुरु दक्षिणेत दंडकारण्यात महाबळेश्वरकडे तपश्चर्या करिते झाले. त्यानंतर त्यांनी बेदरपासून फार दूर नाहीं अशा गाणगापूर येथें आपला आश्रम स्थापला व आपल्या शिष्यांच्या द्वारा **महाराष्ट्रधर्माच्या** प्रसारार्थ किंवा संरक्षणार्थ उद्योग प्रारंभिला. मुसलमानांच्या व तद्धर्मीय राजांच्या धर्मवेडास आळा घालून, जनतेंत वर्णाश्रम धर्मविषयीं, तसें च श्रुति–स्मृति–पुराणोक्त सत्कृतींवर दृढ श्रद्धा उत्पन्न करून, हिंदुधर्माची पुन सुस्थापना करण्याचें पवित्र कार्य श्रीनृसिंह सरस्वती यांनीं केलेलें आहे. त्या वेळचा बेदरचा सुलतान अल्लाउद्दिन यास एक स्फोटक झाला होता व तो श्री गुरूंच्या दर्शनानें बरा झाल्यावर त्यानें श्री गुरूंचा अनुग्रह घेऊन धर्माचरणानें राज्य करण्यास प्रारंभ केला " गुरुचरित्र " कार सरस्वती गंगाधर म्हणतात —

विप्रकुळ समस्त देख । संतोषें करिती सर्वा कौतुक ।
राजा झाला विप्रसेवक । आता बरवें राज्यासी ॥ ५०–२१४
ऐसा हा राव असतां । महाराष्ट्र–धर्मी वर्ततां ।
आपला द्वेष सततां । न करिल हा जाण पा ॥ ५०–२३५

श्रीसमर्थांनीं हि महाराष्ट्रधर्म वाढविण्याचा च प्रपंच करून त्या साठीं " मराठा तितुका मेळवावा " हा उपदेश केलेला आहे. तेव्हा माहूरक्षेत्रीं देवदर्शन व सत्संग केल्यानंतर त्यांना कारंजा येथें जाऊन—ज्यांच्या कार्याचा च त्यांनीं पुढें अंगिकार केला त्या श्रीगुरूंच्या जन्मभूमीचें दर्शन घेण्याची अत्यंत उत्कट इच्छा व्हावी हें स्वाभाविक व क्रमप्राप्त आहे माहूरानंतर कारंजा येथें ते त्या च हेतूनें येऊन दाखल झाले.

## ( ६ ) कारंज्याचें रामदास्य

रामदास कारंजा येथें येऊन गेल्यानंतर त्यांच्या चरणानें पावन झालेल्या या नगराचें रामदास्य वाढत च गेलें. या ठिकाणीं आज हि

**दोन रामदासी मठ** विद्यमान आहेत व ते रामदासांच्या दोन पट्टशिष्यांनीं स्थापन केलेले आहेत. मठस्थापना व शिष्यसांप्रदाय वाढविणें हें कार्य त्यांनीं कृष्णातीरीं आल्यानंतर केलें, कीं तीर्थयात्रा करीत असतां च ते चालू ठेवले हा एक विवादात्मक प्रश्न आहे. मठस्थापना शिष्यांनीं गुरूच्या आज्ञेप्रमाणें पुढें केली असें जरी मानलें तरी हि शिष्य सांप्रदाय करणें रामदासांनीं आपल्या तीर्थयात्रेंत च सुरू ठेवलें असले पाहिजे असें त्यांचे एक आधुनिक चरित्रकार श्री. सदाशिव खंडो ऊर्फ आप्पासाहेब आळतेकरांप्रमाणें आम्हास हि वाटतें. [ पहा समर्थचरित्र पृष्ठ १९७ ] कारंजा येथील दोन मठ अनुक्रमें महंत बाळकराम व महंत प्रल्हाद यांनीं स्थापन केले. बाळकरामाची परंपरा अशीः—( १ ) बाळकराम, ( २ ) रोकडराम, ( ३ ) बापुस्वामी, ( ४ ) सखाराम स्वामी, ( ५ ) लक्ष्मण स्वामी, ( ६ ) मारुति स्वामी. यांच्या मठांत पुष्कळसा रामदासी वाङ्मयाचा संग्रह श्री. शंकरराव देव यांना उपलब्ध झाला आहे. बाळकराम यांनीं पुष्कळ कविता केली आहे. त्यांचें टोपण नांव रामटेंगा असें होतें. प्रल्हादांची परंपरा पुढील प्रमाणें.—( १ ) प्रल्हाद, ( २ ) रामचंद्र, ( ३ ) माधव, ( ४ ) रामकृष्ण, ( ५ ) रामचंद्र, नारायण व लक्ष्मण, ( ६ ) जनार्दन लक्ष्मण.

### ( ७ ) अकोल्यांत आगमन

कारंज्याहून समर्थ अकोल्यांत आगमन करते झाले. **अकोल्यांत रामदासी मठ** असून रामदास स्वामी तेथें आले होते अशी मठातील मंडळींची दृढ समजूत आहे. समर्थ शिष्य माधव यांनीं हा मठ स्थापन केला. हा मठ जुन्या अकोला शहराच्या बाहेर नदीच्या पलिकडे त्या वेळीं असलेल्या निर्जन प्रदेशात स्थापिलेला आहे. मठाचे खाजगी व सार्वजनिक असे दोन आवार आहेत. सार्वजनिक भागांत श्रीरामचंद्र व महिषासुरमर्दिनी यांची जवळ जवळ असलेलीं दोन सुंदर पण अनुक्रमें मोठी व लहान अशीं चिरकालीन बांधणीचीं देवालयें

आहेत. धुळ्याचे प्रसिद्ध रामदासी संशोधक श्री. देव यांना आम्हीं हीं देवालयें व मठ दाखविण्यास घेऊन गेलो होतों. तंजावरकडील कारागिरानें घडविलेल्या काळ्या पाषाणाच्या श्री रामचंद्राच्या व सीतामाईच्या मूर्ति या देवळात आहेत. श्रीरामचंद्र धनुर्धारी असून त्याच्या मुखावर उमटलेलें मोहक व मधुर हास्य पाहिल्यावर आपल्या भक्ताना ते भेटीस बोलावीत आहेत कीं काय असा भास होतो. समोर दासमारुतीचें लहानसें देवालय आहे. खाजगी मठात या मठातील महत्ताच्या परंपरेंतील वामाजी महाराजाची समाधी आहे. या ठिकाणीं एक वर्तुलाकृति पुच्छ धारण केलेला काळा मारुति स्थापण्यात आला आहे. मारुतीच्या खालीं पूर्वीं तळघर होतें येथें " उप कालात " वर्णिलेल्या मारुतीच्या देवालयाची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं. सुप्रसिद्ध कादंबरीकार कै. हरिभाऊ आपटे यानीं अशाच एखाद्या मठातील जागा पाहून त्याचें चित्र आपल्या कादंबरींत रेखाटलें असलें पाहिजे. या च परंपरेंतील आणखी एक रामदासी मठ जुन्या मठाजवळ च आहे. या शिवाय एक सार्वजनिक जुनी हनुमन्ताची मूर्ति हि या दोन्ही मठाजवळ उघड्या मैदानावर आहे. या ठिकाणीं पुढें जी वस्ती झाली ती आज " हनुमानवस्ती " या नावानें ओळखली जाते. तरुणाना मैदानी व मर्दानी खेळ खेळण्यासाठीं ही योजना करण्यात आली असावी. जुन्या अकोल्यात नदीच्या काठीं या च रामदासी परंपरेंतील एका महंतानें एक काळा मारुति स्थापन केला व त्याच्या समोर बाल तरुण शारीरिक खेळ आज हि खेळत असतात !

## ( ८ ) नारीचा हनुमान

समर्थ अकोल्याहून येट उत्तरेस सातपुड्यात प्रवेश करते झाले. सह्याद्रि व विंध्याद्रि याना जोडणारा सातपुडा पर्वत आहे व त्याच्या सात पुडावरून त्याला हें नामाभिधान प्राप्त झालें असावें वस्तुत नर्मदेच्या उत्तरेला असणाऱ्या पर्वताच्या रांगा अमरकंटक येथें नर्मदेच्या मुखाजवळ दक्षिणेकडील सातपुड्याच्या रांगाना येऊन मिळतात सातपुड्याच्या तापीच्या दक्षिणेकडील रांगा बालाघाट या नावानें सह्याद्रीला येऊन

भेटतात. ह्मणजे हीं तीन नांवें वस्तुतः एका च पर्वताचीं असून दक्षिणेंत निलगिरीपासून उत्तरेंत अमरकंटकपर्यंत तो पसरलेला आहे. वानर, मावळे, भिल्ल, कोरकू, गोंड, हळव या पार्वतीय बंधूंचें हें निवासस्थान होय. यांचें श्रीरामचंद्र हेंच आवडतें दैवत. रामदासांनीं हि त्यांच्या दर्शनार्थ सातपुड्यांत पदार्पण केलें व आपल्या कोरकू-गोंड बंधूंच्या धार्मिक उन्नतीसाठीं वाण नदीच्या कांठीं डोंगराच्या कड्यावर एका सुरम्य स्थानीं सहा फूट उंचीच्या हनुमंताच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा केली. तेल्हारा व अडगांव या ठिकाणांहून हें स्थान जवळ आहे व तेथें बैलगाडीनें जाण्याची दोन्ही ठिकाणांहून सोय होते. अकोला गॅझेटीअरकारांनीं याचें विस्तृत वर्णन अकोला गॅझेटीअरात ( १९०७ ची आवृत्ति ) दिलें आहे. चाळीस वर्षांपूर्वीं हनुमान दासोबा या नावाच्या एका वैराग्यानें हनुमंताच्या मूर्तीसाठीं मंदिर बांधिलें आहे. जवळ च या वैराग्याची समाधी आहे. फार प्राचीन काळीं द्रौपदीनें येथें हळदीकुंकवाचा समारंभ केला अशी दंतकथा आहे. गॅझेटीअरकाराचा उल्लेख असाः—

" **Wari**—Wari Bhairawagarh is a deserted village on the Wān river in the extreme north-west of Akot taluq. Though remote it is of considerable religious interest, and it is situated amid fine scenery. An image of Hanuman or Māroti, over six feet in height and with a striking face, is said to have been set up 400 years ago by Rāmdās Swāmi, an incarnation of Māroti × × ××× ××× ××× ××× "

— Akola District Gazetteer, page 395

## ( ९ ) एलिचपूरला भेट

सातपुड्यातील आपलें वारी येथील हनुमंताच्या मूर्तीची स्थापना करण्याचें कार्य आटोपल्यावर रामदास स्वामी बैतुल येथे जाताना वाटेवर असलेल्या व त्या वेळीं वऱ्हाडच्या राजधानीच्या वैभवाचा उपभोग घेणाऱ्या एलिचपूर शहराला भेट देण्यास निघाले. एलिचपूर येथें त्यांना एका

सच्छिष्याची जोड मिळाली व ते भोळाराम या नांवानें पुढें प्रसिद्धीस आले. भोळाराम आपल्या गुरुजवळ पुष्कळ वर्षे सेवा करीत होते व त्याच्या मुखातील चावलेला विडा त्याचे गुरु रामदास स्वामी ग्रहण करीत असत, ही कथा सर्वांच्या परिचयाची आहे. एलिचपुरास भोळारामानीं **रामदासी मठ** स्थापन केला व सद्गुरूंच्या आज्ञेनरून समर्थकार्याचा प्रसार करूं लागले. या मठातील मारुतीची मूर्ति ( मुख वगळल्यास ) हुबेहुब समर्थांच्या सारखी आहे असें आमचे मित्र श्री. र. ग. पंडित, बी. ए. यानीं ती मूर्ति समक्ष पाहून आम्हांस समक्ष सांगितलें आहे. बहामनी साम्राज्याचे तुकडे झाल्यावर वऱ्हाडच्या मुसलमानी राज्याची एलिचपूर राजधानी होती व तिचें निरीक्षण करणें आपल्या भावी कार्याला अवश्य म्हणून रामदास एलिचपूरला गेले यांत नवल वाटण्याचें प्रयोजन नाहीं.

## ( १० ) रामदासी संशोधनाची दिशा

वरील टांचणावरून श्रीसमर्थ रामदास स्वामींनीं सातपुड्यांत संचार केला होता या आमच्या अनुमानाला किती सबळ आधार आहे हें दिसून येईल. वेतुळाहून टिंदवाड्यास ( सातपुड्याच्या पठारावरच ! ) मुकुंदराजाच्या गुरूच्या–रघुनाथाच्या समाधीच्या दर्शनार्थ समर्थ गेले. त्यानंतर अंबोरा येथें मुकुंदराजाच्या आजेगुरूच्या–श्रीहरिनाथाच्या समाधीचें दर्शन घेऊन ते नागपुर जवळील प्राचीन क्षेत्र रामटेक येथें श्रीरामचंद्राच्या दर्शनार्थ गेले. त्यानंतर छत्तिसगढांतील रघुनाथजेवाचें दर्शन ( उ. राजीम ) घेऊन अमरकटकावरून ते सुप्रसिद्ध चित्रकूट क्षेत्राला गेले. विदर्भ मध्यप्रांतीय रामदासी संशोधनाची ही एक दिशा आहे व ती संशोधकांपुढें ठेवण्याचें आम्ही धाडस करीत आहोंत. वऱ्हाडांतील एक प्रसिद्ध रामदासी संत महंत देववा यानीं भंडारा येथें एक रामदासी मठ स्थापन केला. याची माहिती आमचे नागपुरचे एक सन्मित्र श्री. दा. के. ऊर्फ दामुअण्णा ओक यानीं भारत इतिहास संशोधक मंडळाच्या चाळ वर्षाच्या समेलनाला नुकतीच सादर केली आहे. या महंत देववाचा अनुग्रह घेणारे रामभक्त

राजे रघूजी भोसले यांनीं विदर्भ मध्यप्रांतांत आपल्या अतुल पराक्रमानें एक महाराष्ट्र स्थापन केलें. कर्नाटकच्या स्वारींत रघूजी राजांना एका रामदासी साधूनें श्री रामचंद्राच्या मूर्ति प्रसाद म्हणून दिल्या होत्या. त्यांच्या कागदपत्रांवर " सीताकांत " हीं अक्षरें असत. त्यांनीं च रामटेकच्या प्राचीन क्षेत्राचा जीर्णोद्धार करून श्रीरामचंद्राच्या मूर्तींची तेथें स्थापना केली. परंतु रघूजी राजांच्या रामदास्याची माहिती देण्याचें हें स्थान नव्हे. तसें च विदर्भमध्यप्रांतांत रामदासी बाणा बाळगणाऱ्या तरुणांच्या संघटनेचा जो एक सध्या प्रयत्न होत आहे तो हि श्री समर्थांच्या सातपुड्यांतील संचाराचा एक प्रसाद च आहे असें कोणी म्हटलें तर त्याबद्दल कौतुक च वाटलें पाहिजे.

अकोला–ता. ६–६–१९३८



( २ )

## मराठ्यांची राजनीति

( लेखक–रा. भास्कर वामन भट, वकील, धुळें )

अनीतिरेव सच्छिद्रं राज्ञो नित्यं भयावहम् ।
शत्रुसंवर्धनं प्रोक्तं बलह्रासकरं महत् ॥ शुक्रनीति अ १–१५

शुक्रनीतीच्या या श्लोकांत राजाच्या ठिकाणीं असणाऱ्या नीतीच्या अभावाचे दुष्परिणाम दर्शवून अप्रत्यक्षपणें तिचें महत्व केव्हढें मोठें आहे याचें शुक्रानें वर्णन केलें आहे. राजसत्ता धारण करणाऱ्या कोणत्या हि राष्ट्रास ( राज्यास ) त्याची राजसत्ता टिकविण्याकरितां राजनीतीच्या ज्ञानाची केवढी आवश्यकता आहे हें शुक्राच्या या वचनावरून दिसून येतें.

सुमारें अडीचशें पावणे तीनशें वर्षांपूर्वी मराठ्यांची राजसत्ता शिवाजी महाराजांनीं महाराष्ट्रांत प्रस्थापित केली त्याचे पश्चात् त्या राजसत्तेचा प्रसार भरतखंडाच्या दक्षिण टोंकापासून उत्तरेकडील अटके पावेतों मराठ्यांनीं केला. शुक्रनीतींतील वरील वचन लक्ष्यांत घेतां महाराष्ट्रांत स्वराज्याच्या सत्तेच्या स्थापनेचें व भरतखंडभर तिच्या प्रसाराचें जें प्रचंड कार्य मराठ्यांनीं केलें तें राजनीति शास्त्राच्या ज्ञानाच्या अभावीं त्यांनीं केल्याचें संभवत नाहीं ही गोष्ट लक्ष्यांत घेतां स्वराज्यस्थापनेच्या काळापासून विशिष्ट प्रकारच्या राजनीतीस अनुसरून मराठ्यांनीं हें कार्य

---

१ या सदरांत शिवाजी महाराजांपासून तों इ. स. १८१८ सालांत पेशवाई समाप्त होऊन महाराष्ट्रांत इंग्रजी सत्ता प्रस्थापित होई पावेतों मराठा राजसत्ताधारी जे जे राजकारणी धुरीण पुरुष होऊन गेले त्यांचा आम्ही समावेश करतो

केलें असलें पाहिजे असें अनुमान करणें युक्त होईल. मराठ्यांनीं स्वराज्य स्थापनेचें व प्रसाराचें महत्कार्य ज्या विशिष्ट प्रकारच्या राजनीतीस अनुसरून केलें त्या राजनीतीसंबंधीं सुचणारे कांहीं विचार या लेखांत आम्ही नमूद करण्याचें ठरविलें आहे.

या विषयाचें विवेचन करतांना मराठी राज्याचे संस्थापक छत्रपति शिवाजी महाराज यांना विशिष्ट प्रकारच्या राजनीतीचें शिक्षण देण्यांत येऊन तीस अनुसरून त्यांनीं स्वराज्याची स्थापना व प्रसार केला किंवा कसें हा प्रश्न प्रथम उपस्थित होतो. या बरोबरच दुसरा एक असा प्रश्न उपस्थित होतो कीं, स्वराज्यस्थापना व त्याचा प्रसार करण्याचे कामीं शिवाजीमहाराजांचे जे अनेक साह्यकर्ते व सल्लागार होते ते राजनीति शास्त्रांत कितपत निपूण होते व ते या शास्त्रांत निपूण होते असें ठरल्यास ज्या विशिष्ट प्रकारच्या राजनीतीस अनुसरून ते वर्तन करीत असत ती राजनीति कोणती, या दोन प्रश्नांविषयीं प्रारंभीं च अल्प चर्चा करणें युक्त आहे. ही चर्चा करतांना मराठ्यांच्या इतिहासाविषयीं प्रमाण समजल्या जाणाऱ्या इतिहासलेखकांनीं या विषयीं प्रदर्शित केलेलीं मतें विचारांत घेणें अवश्य आहे.

सर यदुनाथ सरकार यांनीं, स्वराज्यसंस्थापक शिवाजी महाराज यांच्या चरित्राच्या सन १९२९ सालीं प्रसिद्ध केलेल्या आवृत्तींत, महाराजांसंबंधीं खालील प्रमाणें अभिप्राय व्यक्त केला आहे.

"Shiwaji was illiterate. He learnt nothing by reading. He built up his kingdom and government before visiting any Royal court, civilised city, or organised camp. He received no help or counsel from any experienced ministers or general, but his native genius alone and unaided enabled him to found a compact kingdom and invincible army and a grand and benificient system of administration."

सर यदुनाथाचा हा अभिप्राय ग्राह्य धरल्यास वरील प्रश्नाविषयीं शोध व चर्चा करणे फोल वाटून या खटाटोपात न पडणें बरें असें

कित्येकास वाटण्याचा संभव आहे. वर नमूद केलेल्या दुसऱ्या प्रश्नाविषयीं विचार करताना सर यदुनाथ यांच्या या मतान्वयें कित्येकाचा असा साहजिक रीतीनें समज होण्याचा संभव आहे कीं, स्वराज्यस्थापना करणारे प्रमुख जे शिवाजीमहाराज त्यास च जर विशिष्ट प्रकारच्या राजनीतीचें शिक्षण नव्हतें, तर त्यांचे साथरनें व सल्लागार यांना तरी तिच्या ज्ञानाची आवश्यकता काय होती, व ते एखाद्या विवक्षित प्रकारच्या राजनीतीचे अनुयायी होते असें मानण्याची आवश्यकता तरी काय आहे ?

या प्रश्नाच्या अभ्यासकानें सर यदुनाथ यांच्या वरील अभिप्राया-वरून उपस्थित होणाऱ्या शंका बरोबर आहेत असें समजून स्वस्थ बसणें व या प्रश्नाविषयीं शोध व चर्चा करण्याचें सोडून देणें हें मात्र युक्त होणार नाहीं. यदुनाथानीं शिवाजीमहाराजाविषयीं जरी वरील प्रकारचा अभिप्राय व्यक्त केला आहे, तथापि तत्कालीन इतिहास साधनावरून दिसून येणारी एक महत्वाची गोष्ट येथें नमूद करणें अवश्य आहे.

शिवाजीमहाराज व त्यांचे आश्रयास असलेले लोक राजनीतिनिपुण होते असें ( प्रस्तुत सर्वमान्य समजण्यात येणारे इंग्रजी ) प्रशस्तिपत्र त्या काळच्या इंग्रजी मुत्सद्यांनीं शिवाजीमहाराजाना व त्यांच्या मराठा राजकारणी पुरुषास दिलेलें उपलब्ध झालें आहे ' इंग्लिश रेकॉर्ड्स् ऑन शिवाजी ' या ग्रंथाच्या भाग १ लेखांक २७१ व २८३ मध्यें खालील उल्लेख आढळतात.

लेखांक २७१ मध्यें शिवाजीमहाराजाशीं तहाचें बोलणें करण्या-बाबत स्टीफन यूस्टिक यास सूचना देण्यात आल्या आहेत. त्यात शिवाजीमहाराजाविषयीं खालील अभिप्राय नमूद करण्यात आला आहे

" The confidence wee have of your prudence *encourageth us to recommend this affaire to your* mannagement *wherein you must employ your best care* and caution, for you are to treat with *sevagee, one of the most pollitické princes of these easterne parts,* and for your better direction wee thinke good to give you these following rules. "

लेखांक २८३ त शिवाजीमहाराजांच्या पदरच्या राजकारणी पुरुषांच्या राजनीतिनैपुण्याविषयीं खालील अभिप्राय व्यक्त केलेला आढळतो.

" In fine, as wee before mentioned you have to deale with the *most pollitique people of all these parts* who make a notable observation of the least things which may accidentally passe from you in discourse which may turne to their advantage and therefore you must be very wary of what passes in talke from you that may tend to the weakning of our cause or lessening our reputation; and this caution wee doe more especially recommend to Mr. Ustick, who will be often engaged in discourse with sevagee and his people touching these and other matters, and therefore wee advise him to apply such answers as may most preserve our credit and not give sevagee occasions to undervallue us."

शिवाजी महाराज व स्वराज्य स्थापनेच्या कार्यांतील त्यांचे सल्लागार व साहाय्यकर्ते राजनीतिनिपुण असून इंग्रज मुत्सद्यास चकविण्याऱ्या ऐपतीचे होते हें सर यदुनाथास मान्य असणाऱ्या वरील इंग्रजी आधारावरून व सिद्ध होत आहे. वरील इंग्रजांचे अभिप्राय लक्षांत घेता शिवाजी महाराज व त्यांचे सल्लागार व साहाय्यकर्ते विशिष्ट प्रकारच्या राजनीतीचे अनुयायी असून निरनिराळ्या वेळीं उद्भवणाऱ्या अनेक राजकारणप्रसंगीं ते ज्या राजनीतीचे अनुयायी होते तीस अनुसरून वर्तन करीत असावेत असें मानण्याकडे स्वाभाविकपणें कोणाची हि प्रवृत्ति झाल्याखेरीज राहणार नाहीं.

वरील प्रश्नाचा विचार करणाऱ्याच्या या स्वाभाविक प्रवृत्तीस काहीं ऐतिहासिक आधार सापडतो किंवा कसें याचें आम्ही आता निरीक्षण करतों. आपली पूर्वपरंपरा लक्षात घेतली असता नाना विद्यांची जोपासना व त्यासंबंधाचें वाङ्मय संस्कृत भाषेंत आपल्या पूर्वजांनीं निर्माण करून ठेवलें आहे. राजनीतिशास्त्रासंबंधाचें वाङ्मय संस्कृत भाषेंत विपुल आहे.

महाभारताच्या शांति पर्वांत राजनीतीवर ग्रंथ लिहिणारा आद्य ग्रंथकार जो ब्रह्मदेव त्यानें राजनीतीवरील विस्तृत ग्रंथाची रचना केल्यापासून त्या शास्त्राविषयींच्या ग्रंथांचे संक्षेप कसकशा रीतीनें व कोणी केले याचें दिग्दर्शन केलेलें आढळतें. राजनीति शास्त्रांचा शेवटचा संक्षेप शुक्रांनीं एक हजार अध्यायांत केला असें महाभारतांत नमूद केलें आहे. शुक्रांचा हा ग्रंथ प्रस्तुत काळीं अस्तित्वात नाहीं. शुक्रनीतिसार या नांवानें प्रसिद्ध असलेला एक ग्रंथ हल्लीं उपलब्ध आहे व तो ग्रंथ शुक्रांनीं केलेल्या ग्रंथाचें सार असावें असें ह्मणण्यास प्रत्यवाय नाहीं. महाभारतांत राजनीतींत अंतर्भूत होणाऱ्या निरनिराळ्या विषयांचें जें दिग्दर्शन केलें आहे तें लक्षांत घेतलें असता राजनीतीच्या विस्ताराविषयींची आपल्या पूर्वजाची कल्पना कोणत्या प्रकारची होती हें आपणास दिसून येतें. प्रस्तुत काळ'च्या एखाद्या पाश्चात्य विद्वानानें राजनीतीवर जर एखादा मोठा ग्रंथ रचला असता तर त्यानें या ग्रंथांत जितक्या विषयांचा समावेश केला असतां तितके सर्व विषय महाभारतातील वर्णनांत नमूद केलेले आढळतात. महाभारतकाळापासून इसवी सनाच्या अकराव्या शतकापावेतों भरतखंडात अनेक क्षत्रीय राजे निरनिराळ्या प्रदेशांवर राज्य करीत होते. हे राजे आपल्या राज्याचा कारभार वरील राजनीतीस अनुसरून करीत असले पाहिजेत हें उघड आहे. अकराव्या शतकापासून भरतखंडास पारतंत्र्य प्राप्त झालें व मुसलमानाची राजकीय सत्ता या देशावर प्रस्थापित झाली. तेव्हापासून भरतखंडातील लोकास राजनीतीच्या ज्ञानसंपादनाची आवश्यकता न राहिल्यामुळे हे लोक या शास्त्राच्या ज्ञानास पारखे झाले.

महाराष्ट्रात मुसलमानांचा प्रवेश इसवी सनाच्या बाराव्या शतकांत होऊन त्यांची या प्रदेशावर राजसत्ता तेराव्या शतकापासून टप्पयाने प्रस्थापित झाली. मुसलमानाची राज्यसत्ता प्रस्थापित झाल्यावर राजकारणात महाराष्ट्रीयाना भाग घेण्याची संधी वंचित राहिल्यामुळे भरतखंडाच्या इतर प्रांतातील लोकाप्रमाणें महाराष्ट्रातील लोक हि राजनीतिशास्त्राचे ज्ञानास पारखे झाले.

तेरावें शतक म्हणजे ज्ञानेश्वराचा काल तेव्हांपासून रामदासांच्या काळापावेतों महाराष्ट्रांतील हरिकियानिरूपण करणाऱ्या संत पुढाऱ्यांनीं वेदांत, तत्त्वज्ञान, भक्ति, योग, रामायण, भारत, भागवत व अन्य पौराणिक ग्रंथ इत्यादि ग्रंथांतील आख्यानें व कथा यांविषयीं संस्कृत ग्रंथांच्या आधारें मराठी ग्रंथरचना करून मराठी वाङ्मयांत फार मोठी भर टाकली या काळांतील संतमंडळींचा राजकारणाशीं फार अल्प संबंध असल्याकारणानें व मोक्ष हें त्यांचें ध्येय असल्यामुळें त्यांचें लक्ष संस्कृत भाषेंतील राजनीती-विषयक वाङ्मयाकडे बिलकुल वेधलें गेलें नाहीं अध्यात्म व भक्ति हे जे त्यांचे आवडीचे दोन विषय यासंबंधीं त्यांनीं मराठींत फार मोठी ग्रंथ-संपत्ति निर्माण करून ठेवली आतां दर्शविलेल्या या कारणामुळें ज्ञानेश्वरापासून तों रामदासाचे काळापावेतों राजनीतीचीं तत्त्वें ज्यांत ग्रथित केलीं आहेत असा एखादा स्वतंत्र गद्य अथवा पद्य ग्रंथ मराठींत रचला गेल्याचें आढळत नाहीं या काळांत महाराष्ट्र देश ज्या मुसलमानी बादशाहाचे राजकीय सत्तेखालीं होता त्याच दरबारीं सजनसिंह, लुखजी जाधवराव, मालोजी, शहाजी, चतुर साबाजी, मुरार जगदेव, आक्काण्णा, मादाण्णा असे कांहीं थोडे महाराष्ट्रीय व कानडी राजकारणी पुरुष होते या पुरुषांचा तत्कालीन राजकारणाशीं साक्षात् संबंध असल्यामुळें राजनीति शास्त्राचें ज्ञान त्यांना अवगत असलें पाहिजे असें अनुमान करणें अयुक्त होणार नाहीं परंतु इतकें मात्र निश्चितपणें विधान करण्यास प्रत्यवाय नाहीं कीं, राजनीतीविषयीं म्हणण्यासारखें वाङ्मय मराठींत निर्माण झालें नाहीं तथापि या काळांत शुक्रनीतींतील "यत्र नीतिबले चोभे तत्र श्रीस्सर्वतोमुखी ॥ १–१७ " या वचनाचा 'शक्ती युक्ती जये ठाईं । तेथ श्रीमंत धावता ' ॥ स्फु प्र ६७ ३० हा मराठी अनुवाद करणारे समर्थ रामदास यांनीं दासबोधांत राजकारणाविषयीं उत्कृष्ट विवेचन वर च ठिकाणा केलेले आढळत

मूर्ख लक्षण २ १, पढतमूर्ख लक्षण २ १०, श्रवण भक्ति ४ १, दास्य भक्ति ४ ७, श्रवण निरूपण ७ ८, सिकवण निरूपण ११-३,

सार विवेक ११-४, राजकारण ११-५, महत लक्षण ११-६, उपदेश निरूपण ११-९, निस्पृह वर्तणूक ११-१०, येनसिकवण १२-९, उत्तम पुरुष १२-१०, सिकवण १३-१०, निस्पृहलक्षण १४-१, भिक्षा १४-२, चातुर्यलक्षण १४-६, चातुर्यलक्षण १५ १, निस्पृहव्यापलक्षण १५-२, चातुर्य विवरण १५ ६, श्रवण निरूपण १७-३, उत्तम पुरुष १८-६, जनस्वभाव १८ ७, येन निरूपण १९-७, उपाधिलक्षण १९-८, राजकारण १९-९, विवेकलक्षण १९ १०

दासबोधातील या शिकवणी शिवाय राजनीतीपर निश्चित स्फुट प्रकरणें रामदासांनीं लिहिलीं आहेत. समर्थांच्या स्फुट प्रकरणातील खालील ओव्यात युक्तनीतीतील निश्चेत तत्त्वांचें सार थोडक्यात दिलेले आहे. नमुन्यादाखल या ओव्या आम्ही येथें देतों

' सार समार शक्तीनें । शक्तीनें शक्ति भोगिजे ।
शक्त तो सर्व हि भोगी । शक्तीहीण दरिद्रता ॥ २९ ॥
शक्तानें मिळती राज्यें । युक्तीनें येन होतसे ।
शक्ती युक्ती जयें ठाईं । तेथें श्रीमंत धावती ॥ ३० ॥
युक्ती ते जाड यत्न । विशक्तांसा तुळणा नसे ।
आचुक चुकेना काळें । त्याचीं राज्यें समस्त हि ॥ ३१ ॥
युक्तीनें चालती सेना । युक्तीनें युक्ती वाडवा ।
सकर्मीं आपणा रक्षी । रक्षी सेना परोपरीं ॥ ३२ ॥
उदंड धामतीचीं कामें । मर्द मारूनि जातसे ।
नामर्द काय तें रक्षी । सदा दुश्चात व्याकुळी ॥ ३३ ॥
किल्यानें बुडती राज्य । स्वदेशीं अमेचिना ।
युक्ता ना शक्ता ना वेगा । चोर रात्री अमेचिना ॥ ३४ ॥
वेदादी बेंकड सेना । कारवारा च चोरटे ।
धणामा राज्यें राजी । कदा कार्यी घडे चि ना ॥ ३५ ॥
चोरटी होरटी तुंदें । नामर्दे त्याच इंद्रिती ।

चोंटीचे दुरी घालावे । मारावे राजकारणें ॥ २६ ॥
सेवकां आवरूं नेणें । तो राजा मूर्ख जाणिजे ।
मूर्खांचें राज्य राहेना । कोणाचें कोण ऐकतो ॥ २७ ॥
लोकांसी राखणें राजी । तें राज्य प्रबळे चळें ।
चंद वेवंद जाणावे । ताव ताव परोपरी ॥ २८ ॥
खळ खोंचर काटावे । तंदुळ्यासारिखे खडे ।
खरें तें आदरें घ्यावें । खोटें सर्वत्र टाकिजी ॥ २९ ॥
सगट सारिखें जेथें । तेथें होते बराबरी ।
सार गार फळेना कीं । जाणते नेणते जनीं ॥ ४० ॥
कांहीं येक परीक्षावें । शोधावें बहुतांपरी ।
नेटके कार्य साधावें । रोधावें कुटिल्या जना ॥ ४१ ॥

नमुन्या दाखल दिलेल्या या ओव्यांतील राजनीतीविषयक शिकवणीच्या स्वरूपाची अन्य शिकवण समर्थवाङ्मयांत अनेक ठिकाणीं आढळते. परंतु विस्तारभयास्तव प्रस्तुत स्थळीं त्या शिकवणीसंबंधाचे समग्र उतारे देण्याचा मोह टाळणें च युक्त आहे. राजनीतीविषयक वाङ्मयाचे बाबतींत त्या काळाची वस्तुस्थिति जरी या प्रकारची होती तथापि राजनीति शास्त्रावरील ग्रंथाशीं परिचय असलेले संस्कृतज्ञ पंडित त्या काळीं राजदरबारीं असल्यामुळें व तत्कालीन राजकारणी पुरुषांचा या पंडितांशीं सहवास असल्यामुळें त्यांना राजनीतिशास्त्रांतर्गत तत्त्वें विदित होत असावींत असें अनुमान करण्यास त्या काळच्या प्रकाशित साधनांचा वरा च आधार आहे.

राधामाधवविलासचंपू या राजवाड्यांनीं प्रसिद्ध केलेल्या ग्रंथांत शिवाजी महाराजांचे वडील शहाजी राजे यांचे दरबारांत अनेक संस्कृतज्ञ पंडित असल्याचा उल्लेख आहे. प्रस्तुत तंजावर येथील सरस्वतीमहाल लायब्ररींत जें ग्रंथभांडार आहे तें तंजावरच्या भोंसले घराण्यास नायक राजघराण्यापासून प्राप्त झालें आहे. नायक राजे हे प्राचीन संस्कृत विद्येचे

मोठे भोक्ते व अभिमानी होते. संस्कृत वाङ्मयाच्या अनेक निरनिराळ्या शाखांचे ग्रंथ या ग्रंथालयात त्यांनीं जतन करून ठेविले होते. शहाजी राजे यांचे मुलगे व्यंकोजी राजे यांचे ताब्यात तंजावरचें राज्य गेल्यावर ही ग्रंथसंपत्ति त्यांचे मालकीची झाली व नायकराजांची वरील परंपरा तंजावरच्या भोंसले घराण्यानें चालू ठेवून त्या ग्रंथालयात अनेक संस्कृत व मराठी ग्रंथांची भर टाकली शहाजी राजांच्या दरबारात असलेल्या विद्वान संस्कृतज्ञ पंडितांचा या ग्रंथालयातील संस्कृत भाषेतील राजनीतींच्या ग्रंथांशीं चांगला परिचय असावा असें विधान करण्यास हरकत नाहीं. परमानंदकृत शिवभारत ग्रंथ या च ग्रंथालयाच्या संग्रहात उपलब्ध झाला आहे. परमानंदकवि हा शहाजी राजे व शिवाजी महाराज यांचे समकालीन होता. त्यानें केलेल्या शिवभारत ग्रंथात राजनीतीविषयीं उल्लेख अध्याय सोळा, श्लोक तीन ते चोदा, सतरा ते एकेचाळीस, सेहेचाळीस ते पंचावन व एकसष्ट ते त्रेसष्ट यात आले आहेत या शिवाय अध्याय अठ्ठावीसमधील श्लोक तेहेतीस ते पन्नास या श्लोकात हि राजनीतीविषयक उल्लेख आले आहेत निजापूरकरानीं शहाजी राजे यास कैद केल्यावर त्यांची सुटका करण्याकरिता सिंहगड किल्ला विजापूरचे बादशाहास देण्याचा करार करून त्यांनीं आपली सुटका करून घेतली, सिंहगड किल्ला देण्यात शहाजी राजे यानीं चूक केली असे शिवाजीमहाराजांचें मत होतें व त्यांचा व सोनोपंत डबीर यांचा या विषयीं झालेला संवाद या सोळाव्या अध्यायात वर्णिला आहे हा सर्व संवाद वर वर वाचून पाहिला असता परमानंद कवीनें स्वतःचे संस्कृत श्लोक बनवून शुक्रनीतींतील राजनीतीविषयक तत्वें या संवादात ग्रथित केल्याचें दिसून येतें. शिवभारतातील शिवाजी महाराजांचा वरील संवाद ज्या सोनोपंतावरोबर झाल्याचें दर्शविलें आहे, ते सोनोपंत म्हणजे शहाजी राजे यानीं पुण्याकडे शिवाजीराजांची रवानगी त्यांचे वयाचे बारावे वर्षी केली त्या वेळीं त्यांचे बरोबर पाठविलेल्या मुत्सद्यांपैकीं एक होते तंजावरचे बृहदीश्वराचे देवळात मराठ्यांच्या इतिहासाचा जो शिलालेख आहे त्या शिलालेखात स्वराज्याची

राजधानी कोठें करावयाची याविषयीं शिवाजी राजांबरोबर या च सोनोपंताचा झालेला संवाद वर्णिला आहे. सोनोपंतानें रायगडसारखें दुर्गम स्थल स्वराज्याच्या राजधानीकरितां पसंत करावें असा शिवाजीराजांना सल्ला दिला व त्या सल्ल्यास अनुसरून शिवाजीराजांनी रायगडचा डोंगर हस्तगत करून त्या ठिकाणीं आपली राजधानी केली असें या शिलालेखात नमूद केलें आहे. शिवाजीमहाराजाच्या जन्मापूर्वीं शाहाजीनें आपला प्रवेश विजापुर दरबारात करून घेतला व निजामशाहीत त्याचेकडे असलेला पुण्याच्या जहागिरीचा प्रदेश त्यानें विजापूरचे बादशाहाकडून मिळविला. त्यानंतर त्या प्रदेशाच्या राज्यकारभाराचे बाबतींत त्यानें कोणत्या प्रकारची व्यवस्था केली याचें दिग्दर्शन शिवदिग्विजय बखरींत खालीलप्रमाणें केलेलें आढळतें.

" समागमें जिजाऊ साहेब आणावी तरी सात आठ महिन्यांची गरोदार जाली याजमुळें शिवनेरीस दादोजी कोंडदेव याजकडे पाठविली. विजापुरीं सरदारीचा बंदोबस्त शके १५४८ प्रमाथीनाम संवत्सरीं जहाला. बाईजवळ बाळकृष्णपंत हणमंते नारो निमल याचे चुलत बंधु, शंकराजी नीळकंठ व रघुनाथ बल्लाळ कोरडे तीन असामी परम विश्वासू दिल्हे. ते कोणते प्रकारचे येविशीं:—

श्लोक

कुलीनाः श्रुतसंपन्नाः शुचयश्चानुरागिणः ।
शूरा धीराश्च नीरोगा नीतिशास्त्रविशारदाः ॥

सचिव म्हणजे कारभारी कुलीन, शास्त्रवेत्ता, आचारशील, पापभीरु, शूर, धैर्यवंत, शरीरें सुदृढ, नीतिज्ञ, जाणता, कुशाग्र बुद्धिप्रज्ञाविशेषीं, रागद्वेषविरहित, सत्यवक्ता, प्रीतिकारक, निश्चयी, ज्याचा दृढ विकल्प स्वप्नींही टाळक नाहीं, आप्त, सुन्हद बधुवर्ग इत्यादि सेवकजन समानरूपी भावना येविशींचे चालावयाचे धारणेचा श्लोक याचा अर्थ —राजा जो तो सेवक जन यास मित्राचेपरि लोकाप्रत दाखवितो. हे मित्र जे त्याजला बंधूच केवळ असें दर्शवितो. बधु याजला संपूर्ण अधिकारीच हे

याजव्यतिरिक्त व्यवस्था होत नाहीं असें लोकांस भासवितो. आपणांस जसें ठेवितात तसें राहतों. स्वयें आपण आपले छंदें करून त्याजकारणें देतों हें या अन्वयें समानत्व सर्वांशीं ठेवून राजकार्याचे ठायीं तिळःप्राय मिजाज न दाखवितां कोशवृद्धि व धान्याची चाळना पाहून अनुकूळ त्यांशीं स्नेह व प्रतिकूळ त्यांशीं विचारणा करावी. राजा अव्यवस्थित चालत असल्यास त्यांतें समाधानवाक्यें धर्ममार्गी वर्तनावें. तरी राजाच्या सचिवाचें कोणते प्रकारचें वागणें असावें येविशीं:—

श्लोक

स किं सखा साधु न शास्ति योऽधिपं हितान्न यः संशृणुते स किं प्रभुः ।
सदानुकूलेषुहि कुर्वते रतिं नृपेष्वमात्येषु च सर्व संपदः ॥

याचा अर्थः—सर्व प्रकारें सचिवानीं राजास उत्तम प्रकारच्या नीतींनीं, युक्तिप्रयुक्तीनीं सन्मार्गी वर्तनावें; तरीच सचिवत्व नाहीं तरी नानारूपी निरर्थक स्वामीनीं सचिवाचें ऐकोन सन्मार्गे चालवें. न चाले तरी हा स्वामीस धिःकार असो. एवं उभयता राजा आणि मंत्रि एकारूप वर्तले असतां प्रीतिरूप संपदा अनुकूळ होतात. विरुद्धातीं नाश होतो.

हें जाणून सदोदित मनुष्य उत्तम अनुत्तम याचें लक्ष ठेवून जसा कोशवृद्धिविषयीं जमाखर्च पहावा तसेंच आसमंतात शत्रुमित्र प्रबलाप्रबळ यांची बातमी रात्रंदिवस ठेवावी. कृशानु म्हणजे अग्नि लहान म्हणों नये. तसेंच शत्रु अल्प म्हणों नये. अशा नीतींचे त्रिवर्ग कारभारी चागले शहाणे करें याजला बाईसाहेबाजवळ ठेविले. " (पृष्टांक ५० ते ५२)

या उताऱ्यावरून राजनीतिनिपुण पुरुष शहाजीचे पदरीं असून शिवाजीमहाराजाच्या जन्मा पूर्वीच पुणेप्रांताचा जहागिरीचा जो प्रदेश शिवाजी महाराजाच्या स्वराज्याचा आद्य घटक व्हावयाचा होता त्या प्रदेशाच्या राज्यकारभारास्तव त्याने त्याच्या पदरीं असलेल्या राजनीतिनिपुण पुरुषांची नेमणूक केल्याचें दिसून येतें.

मल्हार रामराव चिटणीसकृत शिवाजीमहाराजाच्या सप्त प्रकरणात्मक चरित्रांत अष्टप्रधान सस्था, अरिमित्र, द्वादश मंडळ, निग्रह, यान, आसन,

इत्यादि अवस्था, साम, दान, भेद, दंड इत्यादि योजना, या संबंधाचें विवेचन शुक्रनीतींतील एतत् विषयासंबंधीं केलेल्या विवेचना सारखें हुबेहुब आहे. शिवकालीन राजनीतीविषयक बुधभूषण या नांवाचा छत्रपति संभाजी महाराजांनीं रचलेला ग्रंथ प्रसिद्ध आहे. या ग्रंथांत निरनिराळ्या राजनीतीविषयक मुद्यासंबंधाचीं वचनें विषयवार एकत्रित केलीं आहेत. रामचंद्र नीळकंठ अमात्य याची राजनीति ( आज्ञापत्र ) हा शिवकालीन राजनीतीविषयक ग्रंथ अयंत बहुमोल व अप्रतीम आहे. या ग्रंथांत शिवाजीमहाराजांच्या राजनीतीचें साक्षात् त्यांस घडलेल्या दर्शनाचे वर्णन त्यानें केले आहे. या ग्रथांत हि कित्येक ठिकाणीं प्राचीन राजनीतीच्या तत्वाचा अनुवाद केलेला आढळतो. मराठी भाषेंतील राजनीती-च्या वाङमयाच्या दृष्टीनें या काळांत झालेले हे प्रयत्न नामांकित कोटींत घालतां येणार नाहींत. अशा प्रकारचे प्रयत्न त्या काळीं कां झाले नाहींत या विषयीं थोडा विचार केला असतां याचा उलगडा होणें कठीण नाही. या काळांत उदयास आलेले नामांकित राजकारणी पुढारी परकीय सत्ता नष्ट करून स्वराज्याची स्थापना करण्याचे कामांत साक्षात् गुंतले असल्यामुळें राजनीतिशास्त्रावर ग्रंथ निर्माण करण्यास त्यांना फुरसत मिळाली नसावी असें दिसतें.

आतां पावेतों दर्शविलेल्या शिवकालीन राजनीतीविषयक वाङ्मयाचा विचार करितां शिवाजीमहाराज व त्याचे साह्यकर्ते व सल्लागार याचा शुक्राच्या राजनीतीशीं परिचय असावा व ते त्या राजनीतीचे अनुयायी असावेत असें विधान करणे युक्त दिसतें. शिवाजीमहाराजांच्या पश्चात् स्वराज्याचा विस्तार सर्व भरतखंडभर करण्यात आला. हें कार्य अनेक मराठा राजकारणी व युद्धकुशल पुरुषानीं केले. विशिष्ट प्रकारच्या राजनीति शास्त्राचें ज्ञान या पुरुषाना असल्याविना त्यांनीं हें महत् कार्य केलें असें विधान करणें सयुक्तिक होणार नाहीं. पेशवाई काळात रचलें गेलेलें राजनीतीविषयक वाङ्मय उपलब्ध झालें आहे. हें वाङ्मय हि नामांकित कोटींत पडण्यासारखे नाहीं. अशा प्रकारचें वाङ्मय या

काळात हि निर्माण न होण्याचें कारण असें कीं, त्या काळांतील राजनीतिनिशारद सर्व मराठा राजकारणी पुढारी मराठ्याचे सत्तेचा प्रसार सर्व भरतखडभर करण्यात अहर्निश चूर झालेले होते. वाङ्मयरचनेस चित्ताचें स्वास्थ्य व एकात याची आवश्यकता असते. या गोष्टी त्या काळच्या मराठा राजकारणी पुरुपास मिळणें दुरापास्त होतें. वर्षांतील सहापासून आठ महिने परप्रातात स्वाऱ्या करण्यात या पुरुपाचा काळ खर्ची पडत असे. पावसाळ्याचे चार महिने काय तें स्वास्थ्य या लोकाना मिळे. इतक्या थोड्या अवधींत वाङ्मय रचनेचें कार्य या लोकाचे हातून न झालें तर त्यात आश्चर्य करण्यासारखें काहीं च नाहीं असें कबूल करणें भाग आहे.

पेशवाई लयास जाऊन इ. स. १८१८ सालीं महाराष्ट्रात इंग्रजाची राजसत्ता प्रस्थापित झाल्यापासून प्रस्तुत काळ पावेतों महाराष्ट्रातील लोकाना गुलामगिरी प्राप्त झाल्यामुळें त्याचा राजकारणाशीं प्रत्यक्ष सबध येण्याचे बद पडलें. यामुळें राजनीतिशास्त्राच्या ज्ञानाचा महाराष्ट्रातील लोकात पूर्ण लोप झाला. इंग्रजी राज्य सुरू झाल्यावर त्यानीं पाश्चात्य धर्तीचें शिक्षण महाराष्ट्रातील लोकास देण्यास सुरवात केली. राष्ट्राच्या उत्कर्पास उपयुक्त असें जें शिक्षण खास इग्लंडातील लोकास देण्यात येतें,त्या शिक्षणापैकीं अगदीं क्षुद्र असा जो,राज्यकारभार सुरळीतपणें चालविण्याकरिता लागणारे कारकून तयार करण्यास उपयुक्त असा भाग, तेवढा च त्यानीं इकडे सुरू केला. या शिक्षणपद्धतींत आपलें प्राचीन वाङ्मय व विद्या याचें ज्ञान आपल्या लोकास देण्याची यत्किंचित हि सवड ठेवण्यात आली नाहीं. याचा परिणाम असा झाला कीं, गेल्या सत्तरीं वर्पांत महाराष्ट्रातील लोक त्याची पुरातन सस्कृति व विद्या याच्या ज्ञानास पूर्णपणें पारखे झाले आहेत. प्रस्तुतच्या विश्वविद्यालयाच्या अनेक पदव्या धारण करणाऱ्या हजारो सुशिक्षित तरुणात आपल्या प्राचीन विद्येचें ज्ञान असणारे शेकडा पाच हि विद्यार्थी सापडणें दुर्घट आहे. इंग्रजी राज्याची स्थापना झाल्या पासून प्राचीन सस्कृति व विद्या याची

माहिती देणारे कित्येक मराठी ग्रंथ संस्कृत ग्रंथांचे आधारें रचलेले या काळांत प्रसिद्ध झाले आहेत. राजनीतिविषयक संस्कृत वाङ्मय विपुल असून हि या विषयावर एक हि नामांकित ग्रंथ अद्याप पावेतों मराठींत कोणा हि विद्वानानें लिहिलेला प्रसिद्ध झाला नाहीं. नाहीं म्हणावयास कौटिल्याचे अर्थशास्त्राचे मराठी भाषांतर अलिकडे प्रसिद्ध करण्यांत आलें आहे. महाराष्ट्रांतील तरुणांस देण्यांत येणाऱ्या दूषित शिक्षणाचा हा परिणाम आहे. कारणें कोणतीं हि असोत, परंतु एवढी गोष्ट मात्र निश्चित आहे कीं, राजनीतिविषयक ज्ञानाची आपल्या तरुण पिढीस यत्किंचित हि ओळख राहिली नाहीं. आपल्या देशाच्या उच्च दर्जाच्या राजकारणाशीं महाराष्ट्रांतील लोकांचा अगदीं अल्प संबंध असल्यामुळें राजनीतिनिपुण ही पदवी देण्याच्या ऐपतीचे पुढारी महाराष्ट्रांत फार च थोडे निर्माण झाले आहेत.

महाराष्ट्रांतील लोकांत राजनीतीच्या ज्ञानाच्या अभावाविषयींचें आतांपावेतों जें विवेचन केलें आहे तें लक्ष्यांत घेतां एके काळीं राजकारण-पटु ही पदवी ज्या आपल्या पूर्वजांना पाश्चात्य मुत्सद्यांनीं दिली त्यांचे जे आपण वंशज त्यांचे ठिकाणीं या महत्वाच्या विषयाच्या ज्ञानाचा अभाव व्हावा ही अत्यंत शोचनीय गोष्ट आहे. अलिकडे इतिहाससंशोधनाची आपल्या राजकीय उत्कर्षास कारणीभूत होणारी सदूलालसा आपल्यांत उत्पन्न झाली आहे. तिचा आपल्यांतील सुशिक्षित तरुणांनीं जर चिकाटीनें अवलंब केला तर आतां च वर्णिलेली शोचनीय स्थिती सुधारणें दुरापास्त नाहीं. गेल्या पन्नास वर्षांत मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें विपुल प्रमाणांत सालोसाल प्रसिद्ध होत आहेत. या साधनात आपला इतिहास, राजकारण, समाज, धर्म, व्यवहारनिर्णय, अर्थ, नीति, तत्वज्ञान, इत्यादि अनेक विषयांसंबंधाची बहुमोल व नानाविध माहिती उपलब्ध झाली आहे. आपल्या राष्ट्राच्या पूर्व चरित्राची यथातथ्य माहिती मिळविण्यास या साधनांसारखें दुसरें उत्कृष्ट साधन आपणास उपलब्ध होणें शक्य नाहीं. अशा प्रकारची अनुकूल स्थिती प्राप्त झाली असतां आपल्यांतील

सुशिक्षित लोकांपैकीं फार थोडे लोक या साधनांचा परामर्श घेऊन आपल्या राष्ट्राच्या वरील नानाविध अंगाचें विश्वसनीय चित्र तयार करण्यास उद्युक्त झाल्याचें क्वचित आढळतात. याचें कारण एक च दिसतें, व तें हें कीं, हा विषय रुक्ष असल्या कारणानें व यात मनरंजन होण्यासारखें कांहीं च नसल्यामुळें या बहुमोल साधनाकडे कोणी ढुंकून हि पाहण्यास तयार नाहीं. त्याली सुशाली व मनरंजन प्राप्त होण्यास्तव गावोगावीं अनेक संस्था उदयास आलेल्या दिसतात. परंतु राष्ट्राच्या उत्कर्षास कारणीभूत होणारी वरील कार्य करण्यास्तव नवीन संस्था उदयास आल्याचें क्वचितच आढळतें. तरी या पुढें या विषयासंबंधीं आपण अनास्था बाळगणें अक्षम्य आहे.

स्वराज्याची प्रभात सुरू झाली आहे. प्रत्यक्ष स्वराज्य अवतीर्ण झाल्यावर प्राचीन भारतीय राजनीतींत जी बहुमोल तत्वें ग्रथित केलीं आहेत त्याचा च आश्रय आपणास पर शत्रूपासून स्वराज्याचें रक्षण करण्याकरिता करावा लागेल ही गोष्ट निश्चित आहे. राजकारणात अहिंसा आणि सत्य याचा आश्रय कांहीं विशिष्ट कारणाकरिता नैमित्तिक म्हणून स्वीकारण्यात आला आहे. राजनीतीच्या नित्य तत्वात निरपेक्ष अहिंसा व निर्भेळ सत्य यास स्थान नाहीं. जन्मतः मानवी प्राणी, मग तो आफ्रिका खंडातील रानटी निग्रो असो अथवा सुधारलेला समजला जाणारा पाश्चात्य राष्ट्रातील येशू ख्रिस्ताचा भक्त अगर पौरस्त्य राष्ट्रांतील गौतम बुद्धाचा पीतवर्णी मानव असो, तो हिंस्र पशूपेक्षा हि क्रूर असतो ही गोष्ट प्रस्तुत काळीं साक्षात् आपल्या डोळ्यासमोर घडत असलेल्या इतिहासावरून दिसून येते. अशा प्रकारच्या मानवांनीं भरलेल्या या जगात अहिंसेचा व सत्याचा अनुयायी बनून राहाणं, मग तो कृत, त्रेता, द्वापार आणि कलि यापैकीं कोणतें हि युग असो, दुरापास्त आहे. जोंपर्यंत इंग्रजाची राज्यसत्ता या देशावर दृढपणें प्रस्थापित असल्यामुळें अहिंसा व सत्य या तत्वाची कास धरणें युक्त व श्रेयस्कर आहे. परंतु ही सत्ता डळमळू लागली कीं, व्यास व शुक्रादि आपल्या प्राचीन ऋषींनीं

राजनीतीचीं जीं नित्य तत्वें ग्रथित करून ठेविलीं आहेत त्याचाच आश्रय स्वप्राणरक्षणार्थ आपणास केल्यावाचून गत्यंतर नाहीं. ज्या काळीं हिंदी मेंदूंनीं बनविलेल्या प्रस्तुत काळीं पाश्चात्य राष्ट्रं वापरीत असलेल्या शस्त्रास्त्राच्या साह्यानें हिंदी अधिकाऱ्याच्या हुकमतीखालीं हिंदी शिपायाच्या सैन्याकडून आपल्या या देशांतील लोकांचें व या देशांतील राजसत्तेचें रक्षण केलें जाईल तेव्हा च या आपल्या देशात खरें स्वराज्य अवतीर्ण झालें असें ह्मणतां येईल. प्रस्तुत आपणास जें स्वराज्य मिळाल्याचा भास होत आहे त्यापेक्षा या पुढें अवतीर्ण होणारें स्वराज्य भिन्न स्वरूपाचें आहे. हें खरें स्वराज्य त्वरित प्राप्त होण्याचीं चिन्हें अद्याप पावेतों आपल्या या देशात दृग्गोचर होऊं लागलीं नाहींत. तथापि परमेश्वरी कृपेनें हें खरें स्वराज्य प्राप्त झाल्यास मात्र आपल्या प्राचीन राजनीतीचें पूर्ण ज्ञान आपल्या स्वराज्याची सत्ता टिकविण्यास्तव अत्यंत आवश्यक आहे. या ज्ञानाच्या अभावीं शुक्रनीतीचें जें वचन या लेखाचे मथळ्यावर दिलें आहे त्यांत वर्णन केल्याप्रमाणें आपली स्थिती होऊन परमेश्वरी कृपेनें मिळालेलें स्वराज्य, निजलेला मनुष्य जागा झाल्यावर त्यास स्वप्नांत दिसलेलें स्वराज्य जसें विलयास गेलेलें दिसतें, तशा प्रकारें विलयास गेलेलें पहाण्याचा अनुभव आपल्यास आल्यावाचून राहणार नाहीं व या च कारणाकरिता ज्या प्राचीन राजनीतीचा एके काळीं स्वराज्य स्थापन करणाऱ्या आपल्या पूर्वजांनीं आश्रय केला तिचा अभ्यास आपल्या सारख्या स्वराज्यकांक्षेच्छु लोकांनीं करणें युक्त आहे.



( ३ )

॥ श्रीरामसमर्थ ॥

## श्रीसमर्थांचे चमत्कार

( लेखिका — श्री. शारदाबाई साठये, जी. प. धुळें )

**लोकांस होतो चमत्कार । लोक मानिती साचार ।**
**परंतु याचा विचार । पाहिला पाहिजे ॥ १०–७–४**

श्रीसमर्थचरित्र वाचल्यानंतर प्रथम दर्शनी च श्रीसमर्थांच्या चमत्कारपूर्ण जीवनानें माझें मन वेधलें; म्हणून मी हा विषय घेतला.

' चमत्कार ' म्हणजे एखादी अपूर्व गोष्ट, पूर्वी कधीं न घडलेली किंवा आपणाला जिचा उलगडा होत नाहीं, कार्यकारण भाव कळत नाहीं, अशी गोष्ट ' चमत्कार ' या सदरा खालीं येते.

आपण आपल्या सभोंवार नजर टाकली तर ही सर्व सृष्टि चमत्कारपूर्ण आहे, असें आपणास भासतें. दिनमान, ऋतु, पुष्पें, फळें, वगैरेकडे नजर टाकली कीं, मनाला एक मोठें कोडें च पडतें आणि विस्मयानें उद्गार निघतात कीं,

चमत्कृतिनिधान ही कृति तुझी जगाच्या पी ।

आणि या च विस्मयित दृष्टीनें, समर्थचरित्राकडे पहावेंसें वाटलें, कारण तेथ हि श्रीसमर्थांच्या जन्मापासून अखेरपर्यंत चमत्कार भरलेला आहे असें आपणांस आढळून येतें.

श्रीसमर्थांच्या घराण्यांत तेवीस पिढ्या रामउपासना होती व समर्थांच्या वडिलांना, सूर्याजीपंतांना प्रभुरामचंद्रजींनीं दर्शन देऊन प्रसाद दिला होता. अशा एकनिष्ठ उपासनेचें फळ म्हणून च कीं काय, समर्थांचा जन्म, रामनवमीच्या दिवशीं, रामजन्माच्या च वेळीं झाला. समर्थजीवनांतील हा पहिला चमत्कार मला वाटतो.

दुसरा त्याहून हि अद्‌भूत चमत्कार म्हणजे, विवाहाचे वेळीं " सावधान " शब्द ऐकतां च सावध होणें हा होय. बिचाऱ्या मातेला काय माहित कीं, नारायण शब्दश आज्ञा पाळील म्हणून ? पण मातेची अवज्ञा न करतां, आपल्या ज्ञादाला न चुकतां, समर्थांनीं वेळीं च सावध होऊन, आपल्या खऱ्या अवतारकार्याला आरंभ केला. हा चमत्कार असा आहे कीं, याला कोठें च तुलना नाहीं. तुम्ही कितीं हि पुराणें धुंडाळा, परमेश्वराचे अवतार पहा, साधुसंतांचे अवतार पहा, इतिहास वाचा, समर्थांच्या पूर्वी व नंतर हि या चमत्कारा सारखा चमत्कार आपणास कोठें च आढळणार नाहीं.

आणि म्हणून च, केवळ विस्मयानें, कुतुहलानें, समर्थकृत चमत्काराकडे पहाण्याचा मीं प्रयत्न केला आहे, जिज्ञासू म्हणून या विषयाची चर्चा करण्याचें धाडस करीत आहे. अधिकारी म्हणून ठाम मत देण्याची पात्रता माझी नाहीं.

समर्थकृत चमत्काराकडे तीन दृष्टीनें पहातां येईल. ( १ ) श्रद्धेनें, भक्तियुक्त अंतःकरणानें, ( २ ) हेटाळणीच्या दृष्टीनें व ( ३ ) चिकित्सक दृष्टीनें. अंधश्रद्धेनें पाहिलें तरी त्यांत असत्याचा किंवा विस्मयाचा लवलेश हि सांपडणार नाहीं. तेथें चमत्काराकडे पहाण्याची दृष्टि निराळी च होते व विचाराला जागा रहात नाहीं हेटाळणीच्या दृष्टीनें पहावयाचें तर " यांत कांहीं सत्य नाहीं, सव झूट आहे " असें मानावयाचें ! पण असें तरी मानण्याला आधार काय ? उलट चिकित्सक दृष्टीनें व आधुनिक शास्त्राच्या आधारें हे चमत्कार सत्य आहेत कीं नाहींत हें पहाणें च कांहींसें मनोरंजक होईल, त्या दृष्टीनें त्यांत सर्व च सत्य

सांपडेल असें नाहीं, पण सर्व च असत्य म्हणण्याचें धाडस मात्र खचित करता येणार नाहीं.

समर्थकृत चमत्काराकडे वळण्यापूर्वी समर्थांची भूमिका किंवा अवतारकार्य काय आहे हें पहाणें अगदीं च अप्रस्तुत होणार नाहीं. वास्तविक अवतारकार्य प्रसिद्ध च आहे, पण विषयाच्या प्रस्तावनेसाठीं थोडीशी पुनरावृत्ति झाल्यास हरकत नाहीं.

श्रीसमर्थांनी च १०-४ मध्यें म्हटलें आहे कीं,

नाना अवतार धरणें । दुष्टाचा संहार करणें ।
धर्म स्थापायाकारणें । विष्णूस जन्म ॥ ४१
म्हणोन धर्मस्थापनेचे नर । ते हि विष्णूचे अवतार । इत्यादि.

" यदा यदा हि धर्मस्य " हे गीतावचन हि सर्वश्रुत च आहे. पण दशावतारापैकीं बौद्धावतारीं परमात्म्यानें स्वत काहीं च न करता दुसऱ्याकडून करवून घेणें हें च ध्येय स्वीकारलेलें दिसतें, तदनुरूप दुष्टाचा संहार करणें हें कार्य शिवाजीराजे याचेकडे सोंपवून धर्मस्थापनेचें कार्य समर्थांकडे दिलेलें दिसतें.

श्रीसमर्थांची व शिवाजीराजे याची भेट केव्हा झाली या वादात शिरण्याचें येथें प्रयोजन नाहीं. समर्थांचें स्वतंत्र अस्तित्व सिद्ध होण्यास, त्याचें स्वतंत्र कार्य पुरेसें आहे. शिवाय श्रीसमर्थांचें विविध वाङ्मय पाहून हि, समर्थांच्या विशिष्ट ध्येयाची कल्पना येते.

' तुम्हासी जगोद्धार करणें आहे ' असें श्रीरामचंद्रानीं च समर्थांना आज्ञापिलें होतें. समर्थ जन्मत च सिद्ध होते, पण पुरश्चरण, भरतखंडपर्यटण होईपर्यंत कार्यास सुरवात केली नाहीं. आत्मप्रत्यय घेतल्याशिवाय, परिस्थितीचें प्रत्यक्ष निरीक्षण केल्याशिवाय, स्वानुभव घेतल्याशिवाय कार्य हातीं घेणें त्याना उचित वाटलें नाहीं. समर्थांनीं स्वराज्यासाठीं मुख्यत धर्मकारण आरंभिलें, आणि भेंडला अवघा महाराष्ट्र त्यांनीं जिवंत केला. समर्थांच्या चमत्कारात हा चमत्कार सर्वांत मोठा होय. श्रीदृग्गानें भारतीय

युद्धाच्या वेळीं, क्षणभर मोहवश झालेल्या अर्जुनाला उपदेश करून कर्तव्योन्मुख केले, त्यापेक्षा हि समर्थांनीं केलेलें कार्य मी जास्त महत्वाचें समजतों. कारण सुज्ञाला समजतीच्या गोष्टी समजावण्यापेक्षा मूर्खाला सन्मार्गावर आणणे अधिक कष्टाचें व महत्वाचे आहे.

श्रीसमर्थांच्या पूर्वीच्या साधुसंतांनीं केलेले चमत्कार व समर्थांनीं केलेले चमत्कार यात फरक नाहीं जादुगाराच्या हातचलाखीच्या खेळानीं आपण क्षणभर फसतों, मनाला मोह पडतो, गारुड्याच्या पुंगीनें विषारी नाग सुद्धा डोलू लागतो, मग आपल्या अलौकिक सामर्थ्यानें, शिवाला गोड मोहिनी घालून सन्मार्गावर आणण्याचे ज्याचें व्रत, त्याच्या हातून असे काहीं चमत्कार झाल्यास त्यात अशक्य असें काहीं च वाटत नाहीं.

श्रीसमर्थांच्या लौकिक दृष्ट्या मानले जाणाऱ्या चमत्काराकडे आता वळू.

श्रीसमर्थकृत चमत्काराचे ठोकळ मानानें तीन चार भाग पडतात. ( १ ) भक्तानीं स्मरण करता च त्याना दर्शन देणें, ( २ ) मृत प्राणी जिवंत करणें, ( ३ ) पाहिजे तेथें पाहिजे तेवढी पाकसिद्धता तयार करणें, व ( ४ ) अनेक रूपें धारण करणें, ल्हान होणें, जळांत रहाणें वगैरे वगैरे.

पहिल्या प्रकारात शिवाजीमहाराजाना अनेक वेळा दिलेलें दर्शन, मातोश्रींना दिलेलें दर्शन, शिवाजी राजे याचे समवेत भाषण चाललें असताना राजापूरकर मुजे सावकार याचे बुडते जहाजास आधार देण्यास जाणें, वगैरे चमत्काराचा समावेश होतो. आपण योगसामर्थ्य मानतों, आत्मा देह सोडून संचार करतो हें हि मानतों पाश्चात्य शास्त्रात Telepathy किंवा thought passing या क्रियेला महत्व आहे व त्याचें प्रत्यहीं व्यवहारात प्रत्यंतर येतें.

जैसा भाव जयापासीं । तसा देव तयासी ।
जाणे भाव अंतरसाक्षी । प्राणि मात्राचा ॥ ३–१०–१३

हें वचन प्रसिद्ध च आहे. आपली उत्कट भावना जेथें आहे तें कार्य तडीस जातें च. कित्येक वेळां स्नेह्यांना किंवा आप्तेष्टांना पाठविलेलीं पत्रें एकमेकांस एका वेळीं पोंचतात; एखाद्या व्यक्तीचें स्मरण होतां च भेट होते वगैरे प्रकार परिचयाचे आहेत. पदार्थविज्ञान शास्त्रांत Wireless Telegraphy, रेडियो, टेलिव्हिजन वगैरे गोष्टींनीं याला पुष्टी च मिळते. वातावरणांतील हवेच्या आकुंचनप्रसरणानें या गोष्टी शक्य आहेत हें सिद्ध होतें. मानसशास्त्रांत Visual Image मानसदर्शन याला महत्व दिलेलें आहे. लहान मुलांना त्यांच्या विचारांप्रमाणें प्रत्यक्ष पदार्थ दिसतात व तीं एकटीं च हंसत खेळत असतात हें आपण पहातों. मानसशास्त्रांत हे सर्व 'सुप्त' मनाचे खेळ आहेत, असें सांगितलें आहे. समर्थदर्शनाची शिवाजीराजांना तळमळ लागली होती व त्यामुळें स्वप्नांत त्यांना दर्शन झालें व प्रसाद मिळाला; या सर्व मानसिक क्रिया आहेत यांत शंका नाहीं.

याबद्दल खुद्द समर्थ काय म्हणतात हे पहाण्यासारखें आहे.

आकाशमार्गी गुप्तपंथ । जाणती योगीये समर्थ ।
इतरांस हा गुह्यार्थ । सहसा न कळे ॥ १-९-५

योगसामर्थ्य मानल्यावर, योगी म्हणजे ज्ञानी हे सर्व शास्त्रपारंगत असतात हें मानणें ओघानें च येतें; शिवाय त्याला आधुनिक शास्त्राची जोड मिळते. मग हें सर्व अशक्य कसें म्हणावें?

योग्यांच्या सामर्थ्याबद्दल श्रीसमर्थ म्हणतात :

येक माहानुभाव विख्यात । येक भक्त जाले ख्यात ।
येक सिद्ध अकस्मात । गगन वोळगती ॥ १-१०-६
येक येक चि बहुधा होती । येक देखत चि निघोनि जाती ।
येक बैसले असता चि भ्रमती । नाना स्थानीं समुद्रीं ॥ ८
येक भयानकावरी बैसती । येक अचेतनें चालविती ।
येक प्रेतें उठविती । तपोबळेंकरूनी ॥ ९ इत्यादि.

भक्तिभावानें व तपसामर्थ्यानें परमात्मास्वरूप पावलेले हे योगी जन, यांना त्रैलोक्यसंचार म्हणजे घरांतून उठून ओटीवर येण्यासारखें च आहे. त्यांतून समर्थ म्हणजे मारुतीचा अवतार—मारुति म्हणजे मरुताचा पुत्र—त्यांना गगनसंचाराला अडथळा कोण करणार ?

चमत्काराचा दुसरा भाग योगसामर्थ्यानें मृत प्राणी जिवंत करणें हा होय. ही सर्व सचेतन सृष्टि परमेश्वरी अंशानें भरली आहे. लीलाप्रिय परमात्मा अनेक रूपांनीं नटला आहे, हें आपण मानतों; आत्मा अमर आहे व तो ईश्वरी अंश आहे व ' आत्मवत् सर्व भूतानि ' असें मानणारे हे योगी जन आहेत, यांना मृताला सचेतन करणें अशक्य कसें होईल ? समर्थांनीं उद्धवस्वामींच्या पिलाला जिवंत केलें; मृत घार व घोडा जिवंत केला; मातेला दिव्य दृष्टि दिली; श्रीरामाच्या मूर्ति घडविणाऱ्या कारागिराला दिव्यदृष्टि दिली; यांत अविश्वसनीय असें कांहीं च वाटत नाहीं. महान तपस्वी विश्वामित्रानें, केवळ तपसामर्थ्यानें प्रतिसृष्टि निर्माण करण्याची धमकी प्रत्यक्ष परमात्म्याला दिली होती. केवढी ही निष्ठा ? व केवढा हा आत्मप्रत्यय ? निद्रित महाराष्ट्राला नव जीवन देऊन, ज्यांनीं कर्तव्योन्मुख केलें व आज हि ज्यांच्या वाङ्मयामृतानें नव चैतन्य लाभेल, अशा समर्थ विभूतीला जगांत अशक्य काय आहे ?

तथापि या चमत्काराचा अंगीकार समर्थांनीं फार थोड्या वेळा च केला आहे. जयरामस्वामींनीं प्रेत उठविलेलें पहातां च त्यांनीं स्पष्ट च सांगितलें कीं, ' बाबारे, अशीं मृत मनुष्यें उठवूं लागशील तर तुझ्या दाराशीं प्रेतांचा ढीग पडेल, सृष्टिक्रमाविरुद्ध कांहीं हि करणें नलगे. ' या वचनावरून त्यांनीं जें केलें तें लोकशिक्षणार्थ व क्रमप्राप्त झालें म्हणून च केलें, आपली वडेजावी वाढविण्यासाठीं केलें नाहीं हें स्पष्ट च होतें.

तिसरा भाग अन्नसामुग्री सिद्ध करण्याचा. एकदां शिवाजीराजे श्रीसमर्थांना भेटण्यास आले, त्या वेळीं दोन प्रहरचा समय होता. ' भोजन करून जा ' असें समर्थांनी सांगितलें. राजाच्या बरोबर दोन हजार सैन्य,

घोड्यांसुद्धां होतें. समर्थांनीं कल्याणस्वामीस आज्ञा केली कीं, ' पलिकडील गुहेच्या तोंडावरचा दगड काढ. ' त्याप्रमाणें करता च आत पाटपाणीसुद्धा सर्व पूर्ण तयारी. ' हें कसें झालें ' म्हणून राजानीं विचारता च ' तुकाराममहाराजाना हें विचारावें ' असें समर्थांनीं सांगितलें.

पुढें राजे तुकाराम महाराजाकडे गेले. तेथें तर चंद्रमोळी घरात, भक्तिभावानें भजन चाललें होतें, पण अतरींची खूण जाणून राजाना सुग्रास भोजन दिलें, घोड्याना दाणावैरण सुद्धा दिली. राजानीं पृच्छा करता च निवेदन केलें कीं, " सिद्धी ह्या आमच्या दासी आहेत म्हणून त्याना नेहमीं राबविणें हें ब्रीद नाहीं; तुम्हास प्रचिती दिसली. "

या संबधीं श्रीसमर्थांनीं च म्हटलें आहे ( ह बखर पा. २१६ ), " ईश्वरप्राप्ति होण्यासाठीं निस्सीमपणें दास्य करीत असता, या सिद्धि येऊन नानाप्रकारें मोह घालून, गुतवू पहातात, परतु त्याच्या मोहात न गुतता निरतर ईश्वरध्यानात मग्न राहिल्यास, ईश्वर आपल्या दासाना ईश्वरपण देतो, ते प्राप्त झाल्यावर धनी होऊन कोणते हि कार्य केलें असता बाधक होत नाहीं, पण धनीपणा न घेता कार्य केल्यास बाधक होतें. धनी होऊन कार्य करणाऱ्या साधूचा अंत लागत नाहीं " हें समर्थवचन अत्यंत मननीय आहे.

• *ज्या प्रमाणें Thought Passing या क्रियेला आपण महत्त्व देतों, त्या च प्रमाणें " वस्तूची स्थलकालपरत्वें स्थानभ्रष्टता होणें शक्य आहे, म्हणजे मानसिक सामर्थ्यानें वस्तु निर्माण करणें शक्य आहे, मात्र त्या कोठल्या ना कोठल्या तरी कमी झाल्याशिवाय राहाणार नाहींत. "* अशा तऱ्हेचे उद्गार एका सद्‌-गृहस्थानें काढल्याचें मला आठवतें व ते सत्य वाटतात, कारण इच्छाशक्तीला मानस शास्त्रात फार महत्त्व आहे आणि म्हणून ' where there is a will, there is a way ' ही म्हण प्रचारात आली असावी. पदार्थविज्ञानशास्त्रात सामर्थ्याला ( force ) फार महत्त्व आहे. मनासारखी प्रबळ शक्ति दुसरी कोणती आहे ?

श्रीसमर्थांचे चुनडी तीर्थ प्रसिद्ध आहे. पुराणात भीष्म रणांगणावर शरपंजरीं पडले असता, अर्जुनानें बाण मारून त्याना पाणी पुरविल्याचें सर्वांना विदित च आहे हें त्या वेळीं, वरुणास्त्राच्या सामर्थ्यानें शक्य झालें. सध्या विसाव्या शतकात हि भूगर्भशास्त्रज्ञ आपल्या ज्ञानानें व बोअरिंग मशीनच्या साह्यानें, पाण्याचा झरा निर्माण करू शकतो व तो जगातील लोकाना चमत्कार वाटतो हि. सर्वज्ञानपरिपूर्ण अशा समर्थांना, अन्न निर्माण करणें किंवा जल निर्माण करणें वगैरे चमत्कार करणें अगदीं शक्य होतें.

समर्थ–कालीन परिस्थिति आजच्या पेक्षा भिन्न होती. लोकाची मनोवृत्ति अध्यात्माकडे अधिक झुलती होती. आज पाश्चात्य राष्ट्रांच्या आधिभौतिक मनोवृत्तीचा ठसा आपणावर अधिक आहे, म्हणून हे चमत्कार अशक्य वाटतात. पुढारलेल्या म्हणविणाऱ्या राष्ट्रांत हि हे च आहे. जीझस ख्राईस्टच्या चरित्रात चमत्कार काय थोडे आहेत ? जुन्या ग्रीक रोमन गोष्टी आपल्या रामायणभारतातील गोष्टींप्रमाणें च ततोतंत आहेत व आपणाप्रमाणें च त्याचें वैशिष्ट्य कमी होत चाललें आहे. मनुष्यप्राणी अधिक बुद्धिमान् झाला आहे, मानवी शोधाना व चमत्काराना अधिक महत्त्व दिलें जात आहे, कारण, ते सिद्ध करता येतात म्हणून, पण कांहीं एक मर्यादेपलिकडे हे जाऊ शकत नाहींत. आधुनिक काळात अधश्रद्धा कमी होऊन विचार वाढला आहे, तार्किक बुद्धि वाढली आहे, म्हणून अशा चमत्काराकडे हेटाळणीच्या दृष्टीनें पहाणारा वर्ग निर्माण झाला आहे. तथापि श्रीसमर्थांचें चरित्र या चमत्कारासाठीं प्रसिद्ध नाहीं हें आपण जाणतों च. समर्थचरित्र घडलें व तें लिहिलें गेलें त्या वेळीं लोकाचा चमत्कारावर विश्वास होता. हे चमत्कार म्हणजे भूतचेष्टा नव्हत, जादूचा खेळ नव्हे, तर त्या लिलाप्रिय भगवताच्या लिला आहेत हें सर्वमान्य होतें. पूर्वावतारात रामकृष्णांनीं जे चमत्कार केले, ते च समर्थांनीं केले. मृत प्राणी जिवंत केल्याचीं उदाहरणें रामायणभागवतात अनेक आहेत. धर्मकर्मविमुख झालेल्या अर्जुनाला, जो उपदेश भगवंतानीं केला, तो च उपदेश सोप्या भाषेंत पण

अधिक जोरदारपणानें निद्रित व कर्तव्यविन्मुख झालेल्या महाराष्ट्राला समर्थांनीं केला. यावरून त्याच्या भूमिकेचें, अवतारकार्याचें महत्त्व अधिक प्रामुख्यानें नजरेंत येतें. आणि या च दृष्टीनें समर्थवाङ्मयाचा अभ्यास झाला पाहिजे. समर्थवृत्त व समर्थकालीन वाङ्मय नुसतें प्रसिद्ध होण्यात मतलब नाहीं, त्याचा तुलनात्मक अभ्यास झाला पाहिजे, त्यातील वैशिष्ट्य लोकांच्या नजरेस आलें पाहिजे, असें वाटतें.

शेवटीं समारोपादाखल इतकें च म्हणता येईल कीं, श्रीसमर्थांकडे म्हणजे च समर्थवाङ्मयाकडे चिकित्सक बुद्धीनें पहा, केवळ अवतारी पुरुष म्हणून न पहाता राष्ट्रगुरु या नात्यानें पहा. कारण समर्थांचें "व्यक्तिमत्त्व" फार मोठें होतें. तें केवळ अध्यात्मिक नव्हते किंवा तात्त्विक नव्हतें तत्वज्ञानाला व्यवहाराची जोड होती व अध्यात्माला राजकारणाची जोड होती आणि म्हणून च राष्ट्राचे गुरु होण्यास ते त्या वेळीं व आता हि सर्वथैव लायक होते आणि आहेत.

समर्थांसारख्या विभूतींनीं भूषविलेल्या महाराष्ट्राला निराश होण्याचें कारण नाहीं. 'नर करणी करे तो नरका नारायण हो जाय' हें समर्थांनीं आपल्या आचारानीं व विचारानीं सिद्ध करून दाखविलें आहे. प्रयत्न आणि तपश्चर्या हे च व्यक्तीच्या उन्नतीचें खरें रहस्य आहे, हें समर्थचरित्रावरून आपणास स्पष्टपणें पहावयास मिळते. समर्थचमत्काराकडे हि या च दृष्टीनें पहावयाचें. आजच्या शास्त्रीय युगात अभ्यासानें मनुष्य एकेका दालनात प्रभुत्व मिळवितो, पण श्रीसमर्थांनीं प्रभुकृपेनें विविध दालनात पारंगतता मिळविली व म्हणून 'समर्थ' हें नामाभिधान त्याना प्राप्त झालें. अशा समर्थांच्या चरित्राचा अभ्यास आपल्याकडून व्हावा अशी माझी इच्छा आहे. दुसऱ्यास सांगण्याची माझी पात्रता नाहीं.

हें वाग्सुमन आजच्या शुभ दिवशीं श्रीसमर्थचरणीं अर्पण करण्याची संधी दिल्याबद्दल श्रीसमर्थवाग्देवतामंदिराच्या चालकाची मी ऋणी आहें.

१८६० ज्येष्ठ शुद्ध १२

( ४ )

## श्रीसमर्थांच्या उपदेशाची चतुःसूत्री

( लेखक – रा. ज. स. करंदीकर, संपादक केसरी, पुणें )

श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या आयुष्यांतील प्रचंड कार्याचें आणि त्यांच्या अखंड उपदेशाचें रहस्य थोडक्यांत सांगणें अशक्य आहे. तथापि महाभारताचें सार जसें ' श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रंथकोटिभिः ' असें म्हणून व्यासांनीं सांगितलें किंवा आचार्यांच्या सगळ्या उत्तर मीमांसेचें तात्पर्य ' चतुःसूत्री ' म्हणून प्रसिद्ध असलेल्या चार सूत्रांत जसें सांगण्यांत येतें, त्याप्रमाणें समर्थांच्या अलौकिक कार्याचें व उपदेशाचें हि सार चार शब्दांत सूत्ररूपानें सांगतां येईल. समर्थांच्या उपदेशाची ही चतुःसूत्री

शक्ति, युक्ति, भक्ति, मुक्ति

ही होय. या चार शब्दांत समर्थांची सगळी शिकवण सांठविलेली आहे. समर्थांनी शक्तीचा, युक्तीचा, भक्तीचा आणि मुक्तीचा उपदेश केला. त्यांचा उपदेश एकांगी तर नव्हता च नव्हता. पण तो केवळ दुरंगी किंवा तिरंगी हि नसून चतुरंगी असा च होता. हें च त्यांच्या उपदेशातलें वैशिष्ट्य होय. समर्थांनीं मुक्तीचें ध्येय कधीं हि आपल्या डोळ्यापुढून दूर होऊं दिलें नाहीं. पण त्या मुक्तीचें ध्येय गाठण्यासाठीं शक्ति, युक्ति, भक्ति यांचा साधन म्हणून उपयोग अवश्यमेव आहे ही गोष्ट ते कधीं हि विसरले नाहींत. समर्थांची शिकवण पायाशुद्ध आणि दूरदर्शीपणाची असल्यानें त्यांनीं या साधनांत हि क्रम लावून आधीं शक्ति, मग युक्ति आणि त्यानंतर भक्ति याचा उपदेश केला. अर्थात च शक्तीचा उपदेश आबालवृद्ध सर्वांना च असल्यानें तो उपदेश सर्वांहून व्यापक होता.

युक्ति व भक्ति याना हि उपदेश त्यानीं सर्वांना केला नाहीं असें नाहीं. तथापि शक्तीशिवाय युक्ति फुकट हे ओळखून आणि शक्तिप्राप्ति सर्वांच्या आटोक्यांत आहे हें जाणून त्यानीं शक्ति संपादण्याचा उपदेश सर्रास केला. शक्तीच्या उपासनेसाठीं च त्यानीं वज्रदेही हनुमान आणि रामवरदायिनी भवानी यांची भक्ति महाराष्ट्रांत विशेष जोरानें प्रचलित केली. शारीरिक बळाकडे तुच्छतेनें पाहण्याची तत्पूर्वीची प्रवृत्ति होती, ती बदलण्यासाठीं त्याना शक्तिसंपादनाचा उपदेश आग्रहपूर्वक निकरानें करावा लागला. यासाठिंच समर्थांच्या वचनांत ठिकठिकाणीं शक्तीचें महत्त्व वर्णिलेलें आढळतें. या संबधाचे त्याचे विचार मननीय आहेत.

## शक्ति स्तोत्र

शक्तीनें पावती सुखे । शक्ति नस्ता विटंबणा ।
शक्तीनें नेटका प्राणी । वैभवें भोगितां दिसे ॥ स्फु. प्र. २६

क्षीण पुसे अशक्ताला । रोगीसे बराडी दिसे ॥ २७
शक्ती तो सर्वही सुखें । शक्ती आनंद भोगवी ॥ २८

सार संसार शक्तीनें । शक्तीनें शक्ति भोगिजे ।
शक्त तो सर्वहि भोगी । शक्तीवीण दरिद्रता ॥ २९

शक्तीनें मिळती राज्यें । युक्तीनें यत्न होतसे ।
शक्ती युक्ती जये ठाईं । तेथे श्रीमंत धावती ॥ ३०

उदंड सत्त्वाचीं कामें । मर्द मारुनि जातसे ।
नामर्द काय ते कर्ता । सदा दुश्चीत व्याळची ॥ ३३

असो हें बोलणें जाळें । युक्तीवीण कामा नये ।
युक्तीला पाहिजे शक्ती । तस्मात शक्ती प्रमाण हे ॥ ४२

मुक्त केल्या देवकोटी । सर्वहि शक्तीच्या बळें ॥ ४३
धकाधकीचा मामला । कैसा घडे अशक्ताला ।
नाना बुद्धा शक्ताला । म्हणोन शिकवाव्या ॥

शक्तीचें असलें स्तोत्र इतरत्र क्वचित च आढळेल. ऐहिक अभ्युदयार्थ च तेवढी शक्तीची गरज आहे असें नाहीं. परमार्थांत हि शक्तीची गरज आहे. समर्थ म्हणतात—

हरिभजन कराया पाहिजे दृढ काया ।

हरिभजन करावयाचें म्हटलें तरी शरीर बळकट पाहिजे च. एवंच प्रपंच वा परमार्थ, कोणता च हेतु अशक्ताच्या हातून तडीस जात नाहीं, याकरितां च शक्ति–सामर्थ्य–संपादन करण्यावर समर्थांचा एवढा कटाक्ष होता. शक्तीची अवहेलना समर्थांनीं कधीं हि केली नाहीं.

शक्तिनंतर दुसरें साधन युक्ति. युक्ति या शब्दांत बुद्धि, विवेक, विचार या सर्वांचा समावेश होतो. ' बुद्धीविण माणूस काचें ' हें ओळखून च ' बुद्धि दे रघुनायका ' अशी त्यांनीं प्रार्थना केली. बुद्धि, युक्ति, विवेक, विचार याची योग्यता, समर्थ किती मानीत याची कल्पना येण्याला, त्यांनीं हे शब्द आपल्या ग्रंथांत सर्वत्र कसे अखंड वापरले आहेत ते पाहिल्यास पुरें होईल.

खबर्दार वरा राजा । विवेकी सर्व साक्षेपी ॥
आज्ञेनें सर्वही चाले । तेणें सौख्य बहुजना ॥
सर्वांची वाहवी चिंता । बुद्धिवंत करावया ॥
नाना वस्त्रें नाना भूषणें । तेणें शरीर शृंगारणें ॥
विवेकें विचारें राजकारणें । अंतर शृंगारिजे ॥
मुख्य यत्न विचाराचा । विवेकें श्लाघ्य सर्वही ॥
वेयानें कार्य साधेना । विवेकें कार्य साधते ॥
कीर्ती पाहों जातां सुख नाहीं । सुख पाहतां कीर्ती नाहीं ॥
विचारेंविण कोठेंच नाहीं । समाधान ॥
म्हणोनी सांगाती असावें । मानत मानत शिकवावें ॥
हळू हळू शेवटा न्यावें । विवेकानें ॥

परमार्थी आणि विवेकी । त्याचें करणें मानें लोकीं ॥
विवेकामध्यें सापडेना । ऐसें तो कांहींच असेना ॥
तिनुक्यांची अंतरें धरावीं । विवेकें विचारें भरावीं ॥
जिकडे जग तिकडे जगन्नायक । कळला पाहिजे विवेक ॥
या कारणें आचार शुद्ध । त्या उपरी विचार शुद्ध ॥
वीतरागी आणि सुबुद्ध । ऐसा पाहिजे ॥
आधीं राखावा आचार । मग पाहावा विचार ॥
आचार विचारें पैलपार । पाविजेतो ॥
उदंड प्रगटला विचार । धर्मस्थापना तदनंतर ॥
बहुत जनासी चाळवी । नाना मंडळें हाळवी ॥
ऐसी हे समर्थ पदवी । विवेकें होते ॥
तऱ्हे भरोच नये । सुचावे नाना उपाय ॥
नव्हे ते चि करावे कार्य । दीर्घ प्रेत्ने ॥
आधीच शिकोन जो शिकवी । तोचि पावे श्रेष्ठ पदवी ।
गुंतल्या लोकांस उगवी । विवेक बळें ॥
महंतें महंत करावे । युक्ती बुद्धीनें भरावे ॥
जाणते करोन विखरावे । नाना देशीं ॥

आतां 'मनोबोधातील' काहीं उतारे पहा—

( १ ) विचारूनि बोले विवंचूनि चाले । १३२
( २ ) विवेकें देहेबुद्धि सोडोनि द्यावी ।
( ३ ) विचारें बरें अंतरा बोधवीजे । ४१
( ४ ) जनीं जाणता भक्त होऊनि राहे ।
( ५ ) विवेकें तजावा अनाचार हेवा । ६९
( ६ ) विवेकें क्रिया आपुली पाळावी ।
( ७ ) विवेकें मना आवरी स्थानभ्रष्टा ।
( ८ ) विवेकें अहंभाव यातें जिणावें । ११०
( ९ ) विचारें तुझा तू चि शोधून पाहे ॥ ११४

( १० ) विवेकें अहंभाव हा पालटावा ।
( ११ ) विवेकें सदा सस्वरुपीं भरावें । १४५
( १२ ) विवेकें तदाकार होऊनि राहे ।
( १३ ) विवेकें तये वस्तुची भेटि घ्यावी । १७०
( १४ ) विवेकें तरी सस्वरुपीं मिळावी ।
( १५ ) विवेकें विचारें विवंचून पाहे ।
( १६ ) जनीं भक्त ज्ञानी विवेकी विरागी ।

असे उतारे शेकडों दिले तरी ते संपावयाचे नाहींत. या उताऱ्यांवरून समर्थांच्या उपदेशांत बुद्धीला—विचाराला—केवढें प्राधान्य होतें तें दिसून येईल. ज्याला विवेकाची दृष्टि नाहीं त्याची समर्थांच्या दृष्टींत मनुष्य-कोटींत गणना च होत नसे.

आतां तिसरें जें भक्तीचें सूत्र त्याचा विचार पाहूं. मनुष्य शक्तिवान झाला, युक्तिवान झाला तरी तो जर भक्तिवान नसेल तर समर्थांच्या दृष्टीनें तो कच्चा च ठरत असे. कारण भक्तीच्या सामर्थ्याशिवाय शक्ति व युक्ति या लंगड्या होत. मानवी सामर्थ्याला दैवी सामर्थ्याची जोड मिळाल्याखेरीज कोणतें हि अद्भुत कार्य होऊं शकत नाहीं आणि हें दैवी सामर्थ्य भक्तीविना साध्य होऊं शकत नाहीं.

बुद्धिवान पुरुष तात्विक दृष्ट्या सर्व गोष्टी जाणूं शकेल, पण संकट प्रसंग आला असता " प्रसंगें वर्तता आलें । यथातथ्य चि सूचलें " यात वर्णिलेली जी प्रसंगावधानाची बुद्धि तें ' देणें ईश्वराचें ' होय. तें कांहीं मानवी सामर्थ्य नव्हे. संकटकाळीं अचूक उपाय सुचण्याला जी स्फूर्ति लागते ती ' मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ' या गीतोक्त श्लोकांत वर्णिल्या प्रमाणें ईश्वरी प्रेरणेनें च येते, आणि ईश्वरी प्रेरणा भक्ताला च होते, अभक्ताला होऊं शकत नाहीं.

देव भक्तांचें रक्षण करतो, असें जें म्हणतात, तें कसें करतो ? या विषयीं भारतकारांचा अभिप्राय असा—

न देवा दंडमादाय रक्षन्ति पशुपालवत् ॥
यंतु रक्षितुमिच्छन्ति बुध्या संविभजन्ति तम् ॥

म्हणजे देव कांहीं गुराख्याप्रमाणें काठी घेऊन भक्तांचें रक्षण करीत नाहींत, तर त्याला अचूक प्रेरणा करतात आणि त्या प्रेरणेच्या जोरावर तो संकटांतून तरून जातो. शिवाजी महाराज आग्रा येथें अवरंगजेबाच्या तावडींत सांपडले असतां त्यांना बिनतोड युक्ति सुचली आणि पाहरेकऱ्यांचा त्या च वेळीं बुद्धिभ्रंश झाला, या गोष्टी ईश्वरी प्रेरणेनें नव्हेत तर काय केवळ मानवी प्रेरणेनें झाल्या ? म्हणून महाभारतकारांचा च अनुवाद करून समर्थ म्हणतात—

बुद्धि देतो सेवकाला । बुद्धीनें पार पावली ॥

याकरिता च संकटांतून तरून जाण्याचा उपाय म्हणून समर्थ नेहमीं ' उपासना, उपासना ' असा च उपदेश करीत असत. भक्तीच्या बळावर प्रचंड कार्यें कशी पार पडतात या विषयीं समर्थ लिहितात—

भक्ताचा साभिमानी तो । बुद्धिदाता परोपरी ॥
उभा चि पाठिसीं देवो । जेव्हां तेव्हां क्षणक्षणा ॥
भक्ताला काय उणे रे । देव त्रैलोक्य वर्तवी ॥
दया हे थोर देवाची । भक्ताला वज्रपंजर ॥

अशा या भक्तीच्या सामर्थ्याचा अनुभव स्वतः समर्थांनीं घेतला होता, म्हणून च ते इतक्या खातिरीनें सांगत आहेत. ' आधीं केलें मग सांगितलें ' असा च त्यांचा दंडक असल्यानें स्वानुभवानें त्यांनीं

पटल्याशिवाय ते अक्षर हि बोलत नाहींत. भक्तीच्या सामर्थ्याची प्रचीति आपणास कशी आली याविषयीं समर्थ म्हणतात—

समर्थे अंगिकार केला । नाना संकटीं रक्षिला ॥
जें जें मनें अभिलाषिलें । तें तें समर्थे पुरविलें ॥
मज दीनास वाढविलें । मर्यादे वेगळें ॥
समर्थे रामदास एका । नवाजिलें ॥

दुसरे एके ठिकाणीं समर्थ म्हणतात—

सेवकु मानवीयाचे । कष्टती बहुतापरी ॥
सेविला देव देवाचा । तेणें मी धन्य जाहलो ॥

अशा प्रकारें रामभक्ति केल्यावर समर्थांच्या अंगीं जें अचाट सामर्थ्य आलें त्या प्रत्ययाच्या आधारें त्यांनीं पुढील निर्भयपणाचे उद्‌गार काढले आहेत.

राघवाचीं पदें मानसीं धरीन । विश्व उद्धरीन हेळामात्रें ॥
राघवाचा वर पावलों सत्वर । जनाचा उद्धार करावया ॥
हेळामात्रें मुक्त करीन या जना । तरी च पावना राघवाचा ॥
राघवाचा दास मी झालो पावन । पतीत तो कोण उरों शकें ॥
मुखीं राम नाम । काळ घालूं पायातळीं ॥
म्हणोन आम्ही रामदास । रामचरणीं आमुचा विश्वास ॥
कोसळोन पडो हें आकाश । परी आणिकाची वास न पाहो ॥
बोलता भवानी माता । महींद्र दास्य इच्छिती ॥
बोलणें हें प्रचीतीचे । अन्यथा वाउगें नव्हे ॥

अशा प्रकारचे आत्मप्रचीतीचे धन्योद्गार रामदासाच्या तोंडून निघाले ते भक्तीच्या च बळावर. वास्तव अत्यल्प मर्यादित अशा मानवी

शक्तीला अचाट व अमर्याद सामर्थ्याची जोड मिळण्याला भक्तीसारखें अन्य साधन नाहीं हें ओळखून च समर्थांनीं ठिकठिकाणीं भक्तीचें स्तोत्र गायिलें आहे.

समर्थांच्या चतुःसूत्रींपैकीं शक्ति, युक्ति, भक्ति या तिहींचा विचार येथवर झाला. शेवटचें जें **मुक्तीचें** सूत्र त्याचें विवरण फारसें करावयास नको. समर्थांना म्लेंछांचें ‘ बहुता दिवसांचें माजलें बंड ’ मोडून टाकून ‘ देवा ब्राह्मणां ’ चें रामराज्य स्थापन झालेलें पहावयाचें होतें आणि त्याकरितां त्यांनीं अटोकाट प्रयत्न केला. ऐहिक स्वातंत्र्याखेरीज पारलौकिक स्वातंत्र्य ( मोक्ष ) हि मिळत नाहीं अशी समर्थांची खात्री होती. म्हणून ते केवळ पारलौकिक मुक्तीच्या नादीं न लागतां ऐहिक स्वातंत्र्याच्या नादीं लागले होते. आणि ज्या वेळीं शिवाजी महाराजांचा राज्याभिषेक झाला त्या वेळीं च त्यांनीं म्लेंछांची सत्ता नामशेष झाली असें म्हणून ‘ आनंदवनभुवनी ’ त अत्यंत निस्पृहतेचे उद्गार काढले आहेत.

उदंड जाहलें पाणी । स्नानसंध्या करावया ॥

एका आख्यानांत त्यांनीं आपल्या ध्येयाचें चित्र हुबेहूब रंगविलें आहे. चंद्रगुप्त सार्वभौम राजा झाला तरी आर्यचाणक्याची पर्णकुटी काहीं सुटली नाहीं. त्याचप्रमाणें शिवाजीचा राज्याभिषेकोत्सव झाला तरी समर्थांची झोळी काहीं दूर झाली नाहीं इतक्या निःस्पृहतेनें ते समरांगणापासून अलिप्त असले तरी त्यांना पारलौकिक मुक्ती प्रमाणें च ऐहिक मुक्तीचें, म्हणजे राष्ट्रीय स्वातंत्र्याचें महत्त्व यथार्थतेनें कळलें असल्यामुळें त्यांच्या ‘ मुक्ति ’ शब्दांत ऐहिक व पारमार्थिक अशा उभयविध ध्येयांचा समावेश होत असे. म्हणून च त्यांचा उपदेश प्रवृत्ति व निवृत्ति या दोहोंना हि

लागूं पडेल असा च समतोलपणाचा व समंजस असे. याचा मासला म्हणून त्यांची कवित्वाची च व्याख्या पहा—

जेणें सुबुद्धि लागे । जेणें पाखांड भंगे ॥
जेणें विवेक जागे । या नांव कवित्व ॥

अशी एक व्याख्या देऊन लगे च ते पुढें म्हणतात—

जेणें सद्वस्तु भासे । जेणें भास हा निरसे ॥
जेणें भिन्नत्व नासे । या नांव कवित्व ॥

त्याच प्रमाणें—

म्हणोनी सावधपणें । प्रपंचपरमार्थ साधणें ॥
ऐसें न करितां भोगणें । नाना दुखें ॥

यांत त्यांनीं प्रपंच व परमार्थ दोन्हीं साधण्याचा उपदेश केला आहे.

ऐसा तो शाहणा लोकीं । तयाची संगती धरी ॥
धरितां सौख्य होताहे । प्रवृत्ती निवृत्तीकडे ॥
रामदासी ब्रह्मज्ञान । सारासार विचारणा ॥
धर्मस्थापनेसाठीं । कर्मकांड उपासना ॥

यात धर्मस्थापनेसाठीं नुसत्या ब्रह्मज्ञानाचा उपयोग होत नाहीं, त्याला कर्मकांड व उपासना पाहिजे असे स्पष्ट बजावलें आहे.

सकळ गुणामध्ये सार । तजविजा विवेक विचार ॥
जेणें पाविजे पैल्यार । अत्रपत्रीचा ॥

यात अत्रीचा व परत्रीचा असा दुहेरी पैल पार गांठण्याचा उपाय उपदेशिला आहे.

राम उपासना आहे । हे रामवरदायिनी ॥
सत्य ते चालते सर्व । प्रवृत्ती निवृत्ती करे ॥
प्रपंच अथवा परमार्थ । प्रचीतीवीण अवघे व्यर्थ ॥
प्रलयज्ञानी तो समर्थ । सकळांमध्ये ॥

अशीं अनेक उदाहरणें दाखवितां येतील. सर्वांचा इत्यर्थ इतका च कीं, समर्थांच्या वाङ्मयात उभयविध मुक्तींचा उपदेश केलेला आहे.

एतावता शक्ति, युक्ति, भक्ति, मुक्ति हीं समर्थांच्या सांप्रदायाची चतु सूत्रीं होय. या चतु सूत्रींच्या बळावर च त्यानीं स्वत च्या आयुष्यात तर महत्कार्य केलें च, पण मागाहून येणाऱ्या लोकांच्या मार्गदर्शकत्वासाटीं, समर्थांनीं ही च चतु सूत्री सांगून ठेवली आहे. तिच्यातील रहस्य ओळखून वागणाऱ्यास अत्रीं व परत्रीं मुक्तीचा लाभ निश्चयेंकरून होईल.



॥ श्रीरामसमर्थ ॥

# श्रीसमर्थांवरील आरती

( लेखक – एक श्रीसमर्थसेवक, पुणें )

चाल – आरति भुवनसुंदराची०

आरति समर्थस्वामींची । सज्जनगिरीविश्रामाची ॥ धृ० ॥

मारुतिअंशा सर्वेशा । जन्म तव रामनौमि दिवसा ।
मातापितरा तोषविलें । खेळ हि विचित्र खेळियले ।
नवल हें अद्भुत तुम्हि केलें । सांगण्या पेकण्यासि झालें ।

( चाल ) ब्राह्मणिं अंतर्पट धरितां ।
सुस्वरानें मंगल गातां ।
सकळ मिळोनी सावध म्हणतां ।
मायापाश झुगारीला। निसटुनि गोदातटिं आला ॥ १ ॥ आरति० ॥

येउनि टाकळि क्षेत्रासी । राहिले द्वादश वर्षासि ।
करुनी घोर तपश्चर्या । घेतले श्रीरामा साह्या ।
करुनी सर्व तीर्थयात्रा । निरखिले भूमाता त्रस्ता ।

( चाल ) तेणें कष्टि तुम्ही झाला ।
भूमातेला स्वतंत्र करण्या ।
ब्राह्मण्यातें स्थापित करण्या ।
अगणित मठारंभ केले । भारतीं मारुति स्थापियले ॥२॥ आरति०॥

अनुग्रह नृपा शिवा केला । ज्यातें भवानि साह्याला ।
त्यांसह स्वराज्य स्थापियलें । सकल जन आनंदित केले ।
नृपें पदीं राज्य अर्पियेलें । कृपेसह त्यास पुन्हां दिधलें ।

(चाल) स्थापुनि महाराष्ट्रधर्मा ।
इहपर सौख्या मार्ग दावुनी ।
भक्तजनांच्या हातीं दिधलीं ।
श्रीमत् दासबोध ग्रंथा । सुजन हो धरा धर्म पंथा ॥ ३ ॥ आरति० ॥

अगणित शिष्य तुम्हीं केले । सेवेनें कृतार्थ ते झाले ।
शिष्यवर उद्धव कल्याण । देणु आम्हा माउलींना ।
दयाळा धांव पाव सत्वरा । पांडिलो तुम्ही कृपा छाया ।
(चाल) किंकर पदरज हा विनवी ।
मायामोहा दूर करोनी ।
तव सेवेसी मम मन लावी ।
याविण इच्छा दुजी नाहीं । दयाळा नमन तुझे पायीं ॥ ४ ॥ आरति० ॥



( ६ )

## श्रीसमर्थ आणि संघटण

( शंकर श्रीकृष्ण देव यांच्या एका प्रवचनाचा सारांश )

श्रीसमर्थ तुम्हास ठाऊक आहेत. आज, त्यांनी केलेल्या संघटणेचा, तेवढा च विचार करावयाचा आहे. तो विचार यथार्थ व्हावा म्हणून मला आणि तुम्हाला, हल्लींचा काळ विसरून त्या काळांत, शरीरानें नाहीं तरी मनानें, जाऊन पडलें पाहिजे. तो काळ म्हणजे मी विशेषतः त्यांच्या तीर्थाटणाचा काळ डोळ्यापुढें आणतो. शके १५५४ ते १५६६ म्हणजे इ. स. १६३२ ते १६४४ हा तो काळ होय. शाहाजहान बादशहाची कारकीर्द चालू होती. बापाला कैदेंत टाकून व भावाचा वध करून औरंगजेब बादशहा अजून तख्तारूढ व्हावयाचा होता. देवालयें उद्ध्वस्त होत होतीं, लालुचीनें किंवा जबरदस्तीनें लोक बाटविले जात होते, स्त्रियांची अब्रू सुरक्षित नव्हती, त्यांच्या अब्रूचें रक्षण करण्याचें सामर्थ्य हि जनतेत उरलें नव्हतें, अशी हीन, दीन स्थिति हिंदु लोकांची झाली होती. काशीपासून रामेश्वरापर्यंत व द्वारकेपासून जगन्नाथापर्यंत तीर्थाटणाच्या निमित्तानें संचार करीत असतां, अत्याचाराचीं शेकडो उदाहरणें श्रीसमर्थांच्या कानावर येत व नजरेस पडत. ती स्थिति ऐकून आणि पाहून त्यांच्या अंतःकरणात कालवाकालव होई. या स्थितीचा शेवट झाला पाहिजे, असा त्यांनी मनाशीं निर्धार केला.

शेवट कसा व्हावा ? प्रेमानें आणि उपदेशानें, विचारविनिमय करून राजसत्तेच्या धोरणात फरक पडेल काय, असा त्यांना विचार पडला. राजसत्तेचें स्वरूप काय आहे, तें त्यांनीं अजमावून पाहिलें. दोन

गोष्टी त्यांना स्पष्ट दिसल्या : एक, त्या सत्तेचा मूळ हेतु च मुळीं सारा हिंदुस्थान देश यवनमय करावयाचा असा होता व दुसरीं, तो हेतु साध्य करण्यांत जुलुमाचा बिनदिक्कत उपयोग करावयाचा. अशा स्थितींत प्रेमाला, सलोख्याला, तडजोडीला, विश्वासाला, न्यायाला, नीतीला, माणुसकीला कांहीं वाव आहे, असें त्यांना वाटलें नाहीं. कोणत्या हि उपायांनीं हिंदुसमाज संघटित झाल्यावांचून तरणोपाय नाहीं, असा त्यांनीं सिद्धान्त ठरविला.

*संघटण हा शब्द आपला अलिकडचा आहे, श्रीसमर्थांचा शब्द* समुदाय हा होय. समुदाय करणें हें त्यांच्या संप्रदायाचें प्रमुख अंग होय. तो रामदासी च नव्हे, जो समुदाय करीत नाहीं. समुदाय करण्याविषयीं त्यांनीं किती तरी परोपरींनें शिकविलें आहे. कोणाला हि एक च गोष्ट सांगावयाची तर ती समुदाय करण्याविषयीं ते सांगत. श्रीमत् दासबोधांत व इतरत्र, समुदाय करण्याविषयीं त्यांचा कटाक्ष कितीं होता, याचीं प्रमाणें कोणास हि सहज आढळतील. समुदायाविषयीं मी बोलूं लागलों म्हणजे मला अकराव्या दशकाचे पांचवा आणि दहावा असे दोन समास व बाराव्याचा दहावा समास हटकून आठवतात. हे तिन्ही समास मला मुखोद्गत आहेत. आपण ते घरीं गेल्यावर मुद्दाम काढून वाचण्याची कृपा केली पाहिजे. ११ व्याचा ५ वा म्हणजे रामदासी संप्रदायाच्या लक्षणांचा च समास होय. तो जरूर पहा. त्या लक्षणांनीं युक्त ते च खरे रामदासी, बाकीचे सारे केवळ वेषधारी होत. नुसते वेषधारी असते तरी पुरवलें असतें, पण पुष्कळ वेळां आपल्या वर्तनानें ते संप्रदायाला दूषण आणीत असतात. म्हणून मी नेहमीं विनंति करीत असतो कीं, हल्लींच्या काळाकडे कोणी बघूं च नये, मूळ च गाठावें. ११ व्याचा १० वा समास म्हणजे श्रीसमर्थांचें आरंभीआरंभींचें आत्मचरित्र होय. तें अवश्य पहा. त्यांत त्यांनीं शिकविलें आहे

उत्तम गुण तितुके घ्यावे । घेऊन जनास शिकवावे ।
उदंड समुदाये करावे । परी गुप्तरूपें ॥

याप्रमाणे समुदाय करण्याचा ज्यास हव्यास असेल त्याच्या ठिकाणीं कोणते दोन मुख्य गुण असावे लागतात, ते त्यांनीं ११ व्या ११ व्यांत सांगितले आहेत :

आतां समुदायाकारणें । पाहिजेती दोनी लक्षणें ।
श्रोतीं येथें सावधपणें । मन घालावें ॥

जेणें बहुतांस घडे भक्ति । ते हे रोकडी प्रबोधशक्ति ।
बहुतांचें मनोगत हातीं । घेतलें पाहिजे ॥

या च संबंधांत त्यांचें तें एक पत्र फार च महत्त्वाचें आहे. त्यावरून समुदायाविषयीं त्यांची आतुरता तर प्रकट होत च आहे, पण समुदाय कां आणि कसा करावा या विषयींची त्यांची जी शिकवण त्या पत्रांत आहे, ती त्यांच्या अंतरंगावर चांगला च प्रकाश पाडते. श्रीसमर्थ राजकारणी पुरुष होते किंवा नव्हते, याविषयीं जो कित्येकांना मोह पडत असतो, तो या एका पत्रानें सुद्धा नष्ट झाला पाहिजे.

सांप्रदायिक विविध विषयांत तें पत्र पुष्कळ वर्षांमागें प्रसिद्ध केलें होतें. पहिल्या दोन तीन ओव्या औपचारिक असून नंतर श्रीसमर्थ पहिली आज्ञा करितात ती समुदाय करण्याविषयींची होय :

कांहीं समुदाव करणें । येविषयीं आलस्य न करणें ।
आलस्य करितां उदंड उणें । दिसेल परमार्थीं ॥
सोईऱ्याधाईऱ्याचीं मुलें । तीक्ष्ण बुद्धीचीं सखोलें ।
तयासी बोलणें मृद बोलें । करीत जावें ॥

त्याचा संसार समाचार । पुसत जावा विस्तार ।
उदंड सांगतां तत्पर । होऊनि ऐकावें ॥

दुःख ऐकतां दुःख जातें । त्याचें दुःख हलु होतें ।
मग तें सर्व चि धरितें । मित्रभावें ॥

निकट मैत्री बरी होतां । मग त्यासी न्यावें येकांता ।
म्हणावें रे भगवंता । कांहीं तुम्हीं भजावें ॥

पूर्वी देव पूजिला नव्हता । म्हणोनि आली दरिद्रता ।
याकारणें अनंता । कांहीं तुम्हीं भजावें ॥

अशा रीतीनें त्या तीक्ष्ण बुद्धीच्या आणि खोल अंतःकरणाच्या तरुणांना तुमचा ओढा लागला, ते तुमचे झाले, म्हणजे मग त्यांना मंत्रोपदेश द्या, आणि इतक्यानें भागलें नाहीं, नंतर त्यांना आमच्याकडे–हुजरकडे–पाठवा.

मान्य होतां जप सांगावा। मग तो इकडे पाठवावा।
मग नयाचा नकळ योवा। उगवूं आम्ही ॥

मग त्यांच्या ठिकाणीं आणखी कांहीं किल्मिष राहिलें असल्यास, ठोकूनठाकून साफ करून आमच्या मनास येईल तिकडे त्यांना संचारार्थ पाठवूं. अशा शिकवणीनें तरबेज झालेले हजारों शिष्य श्रीसमर्थांनीं साऱ्या भरतखंडभर पसरविले होते! केवढें कार्य त्या तरुणांनीं त्या काळांत केलें असेल, याची कल्पना करा, पुरावा मागूं नका!! सगळा कारभार जेथें गुप्तपणें चालवयाचा, तेथें प्रत्यक्ष पुरावा कोठून आणाना! इ. स. १६३८ चा तो काळ होता, १९३८ चा नव्हता, हें लक्ष्यांत घ्या.

भयभीत होऊन दुर्बल बनलेल्या समाजाला धीर देऊन सबळ करण्याला, समुदाय करणें–संघटित होणें–हा रामबाण तोडगा श्रीसमर्थांनीं योजिला व त्याचा अंमल साऱ्या भरतखंडभर चालू केला. सबंध देशांत त्या वेळीं असें एक हि मोठें ठिकाण, क्षेत्राची जागा, राजधानीचें शहर किंवा ऐतिहासिक महत्त्वाचे स्थळ नव्हतें, कीं जेथें किंवा ज्याच्या जवळपास श्रीसमर्थांचा मठ व त्या मठांत नियोजित केलेला एक एक महंत नव्हता. या महंतांपैकीं क्वचित् च एखाद दुसरा तत्प्रांतीय असे, बाकी बहुतेक महाराष्ट्रीय असत, ही बाब लक्ष्यांत ठेवण्यासारखी होय.

श्रीसमर्थ हे खरे पहिले बृहन्महाराष्ट्रीय होत. त्यांच्या पूर्वीं चारी धामें किंवा बारा ज्योतिर्लिंगें कोणी केलीं नव्हतीं, असें नाहीं, परंतु धर्मरक्षणार्थ श्रीमत् शंकराचार्यांनंतर श्रीसमर्थांशिवाय दुसऱ्या कोणी एवढा मोठा व्याप केला नव्हता. बृहन्महाराष्ट्र हा शब्दप्रयोग आजचा आहे, त्या वेळीं नव्हता. पण खरा बृहन्महाराष्ट्र त्या काळीं निर्माण झाला होता, आज नुसतें तें नांव योजिलें जात आहे.

दिल्ली, कानपुर, लखनौ, कलकत्ता इत्यादि शहरीं केवळ पोटासाठीं नोकरीच्या निमित्तानें कांहीं महाराष्ट्रीय जाऊन राहिल्यानें या शहरांचा जर बृहन्महाराष्ट्रांत समावेश करावयाचा, तर या च शहरांना बृहन्मद्रास कां मानूं नये, याचें समर्पक उत्तर देणें कठीण जाईल. किंबहुना, त्या भागाला बृहन्महाराष्ट्र म्हणण्यापेक्षां बृहन्मद्रास च मानणें जास्त युक्त होईल ! दोघे हि केवळ पोटासाठीं च आज तिकडे गेले आहेत, पण दोन्ही प्रांतांतून तिकडे जाऊन राहिलेल्या लोकसंख्येकडे पाहिल्यास एका महाराष्ट्रीयाला दहा मद्रासी, कदाचित् पंधरा वीस, पण कमी नाहीं, असें प्रमाण पडेल. कलकत्त्या जवळच्या टाटांच्या जमशेटपूरला अन्नासाठी दोन तीनशें महाराष्ट्रीय गेले असतील, तर मद्रासी तीन चार हजार गेलेले आहेत ! मग कोणत्या हक्कानें त्या प्रदेशाला आपण बृहन्महाराष्ट्र म्हणून संबोधणार ?

मेलेल्या राष्ट्राचें बृहद्राष्ट्र होत नसतें. आपला देश सोडून केवळ अन्नासाठीं दुसऱ्या देशांत गेलेले आणि केवळ अन्नासाठीं च तेथें राहिलेले लोक, कोणत्या हि अर्थानें, त्या देशाचे साहेब म्हणजे धनी होऊं शकत नाहींत. तसें नसतें तर साऱ्या जगाचा हि आज बृहन्महाराष्ट्रांत समावेश करण्याला आम्हांस अडचण पडली नसती. धार्मिक, बौद्धिक, आर्थिक, राजकीय, यापैकीं कोणती तरी एक सत्ता प्रस्थापित केल्यावांचून परप्रांतावर हक्क सांगतां येईल, असें मला वाटत नाहीं. सर्व भरतखंडभर मठ स्थापण्यांत श्रीसमर्थांचा हेतु याप्रमाणें चतुर्विध सत्ता स्थापण्याचा होता, हें सिद्ध करणें सुलभ आहे. प्रकट हेतु धार्मिक होता, त्याच्या अनुषंगानें बौद्धिक आणि त्याच्या पोटांत बाकीचे दोन हेतु होते.

सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला ॥

अशी कल्पांत वेळ आलेली पाहून

मऱ्हाटा तितुका मेळवावा । आपुला मऱ्हाष्टधर्म राखावा ॥

असा त्यांनीं संघटित होण्याविषयीं उपदेश चालविला व त्यासाठीं जरूर तर

मुद्दक पटवावा बुडवावा । धर्मस्थापनेसाठीं ॥

पण

म्लेंच्छसंहार करावा । जिकडे तिकडे ॥

हें साध्य साधल्यावाचून राहू नये, त्याशिवाय धर्मरक्षण होणार नाहीं, असें त्यांनीं निक्षून सांगितलेलें आहे

तात्पर्य, हें सर्व बृहन्महाराष्ट्रीय राजकारण होय व तें श्रीसमर्थांनीं केलें म्हणून मी त्यांना पहिले बृहन्महाराष्ट्रीय समजत असतो

---

## ( ७ )

## श्रीसमर्थ आणि ब्राह्मण्य

### ( दुसऱ्या पक्षा प्रवचनाचा सारांश )

*ब्राह्मण्य ही अविनाशी वस्तु असली पाहिजे, अशी माझी समजूत झाली आहे* असें पहा, या ब्राह्मण्यावर सारें जग उलटलेलें दिसतें आणि तें हि आज काल नाहीं, तर न जाणों, जगाच्या आरंभापासून, भगवंतानें चातुर्वर्ण्य सृष्ट केल्यापासून, तरी सुद्धा ब्राह्मण्य टिकून च असावें, बुडू नये, तेव्हां काय समजावें ? पुराणकाळांत आणि ज्ञात इतिहासांत असा काळ दिसत नाहीं कीं ज्या वेळीं ब्राह्मण्यावर जग उलटलेलें नव्हतें

समाज तरी किती अल्प, मी त्रैराशिक मांडून पाहिलें नाहीं, पण जगाच्या लोकसंख्येंत हजारांत एक व आपल्या देशांत शंभरांत एक तरी ब्राह्मण आहे का नाहीं, कोण जाणे त्यावर इतके आघात होत असतां व तो इतका चिमुकला वर्ग असतां, त्याला बुडवू म्हणून संतापानें, द्वेषानें, मत्सरानें इतरांचे—घरच्यांचे आणि बाहेरच्यांचे हजारो वर्षांपासून अव्याहत प्रयत्न चालू असतां तें नष्ट होत नाहीं इतकें च नव्हे, तर तें वारंवार डोकें वर काढतें व सर्वांच्या टोंक्यावर बसतें, यास काय म्हणावें ? या देशांतील १०० पैकीं ९९ नीं व जगांतील १००० तील

९९९ नीं त्या एकाला सारखें पाण्यांत पहावें, त्यावर उठावें, त्याच्या नाशाचे पद्धतशीर अखंड प्रयत्न करावे, तरी त्या एकानें पावित्र्यांत सर्वांच्या वर असावें व अखेरीस सर्वांना आपल्या चरणापाशीं लोटांगण घालावयास लावावें, हा काय चमत्कार म्हणावा ! फार काय, पण थोडा जास्त विचार केला तर असें हि चमत्कारिक दृश्य दिसते कीं, हजारांतला आणि शंभरांतला तो एक स्वतःच्या च नाशाला प्रवृत्त होतो, आपण नष्ट व्हावें म्हणून सारखा धडपडत असतो, डोक्यांत राख घालीत असतो, गळ्यांतलें जानवें तोडून पहातो, गर्धरें उपसूं लागतो ! इतकें करून हि, तो पाहतो तों त्याच्यांतलें ब्राह्मण्य नष्ट न होतां वाढीस च लागलेलें त्यास आढळतें !

म्हणून मी ठरविलें, ब्राह्मण्य ही अविनाशी वस्तु आहे. आणि आतां श्रीसमर्थांच्या त्या वचनांची बरोबर उपपत्ति लावतां येते.

गुरु तो सकळांसी ब्राह्मण । जर्‍ही तो जाला क्रियाहीन ।
तरी तयासी च शरण । अनन्यभावें असावें ॥
असो ब्राह्मणा सुरवर वंदिती । तेथें मानव बापुडे किती ।
जरी ब्राह्मण मूढमती । तरी तो जगद्वंद्य ॥

पांचव्या दशकाच्या पहिल्या समासांतील या ओव्या वाचून पुष्कळ सत्त्वशील अब्राह्मण साशंक होत असतात आणि तामसी तर मन्यराजाला नांवें ठेवीत असतात. वरील विचारसरणीनें सर्व विचारवंतांचें आणि सत्त्वशीलांचें समाधान होईल, असा मला भरवसा वाटतो. ब्राह्मणांनीं मात्र आचार उपासना सोडण्याला आणि पुस्तकांचें गांठोडें बांधून तें खुंटीवर टांगण्याला श्रीसमर्थांची परवानगी मिळाली, असें समजूं नये. उलट स्नानसंध्यादि सदाचार आणि विद्यार्जन याविषयींची आपली जबाबदारी वाटते, असें त्यांनीं समजावें.

या ब्राह्मण्यरक्षणावर श्रीसमर्थांचा मोठा कटाक्ष असे. १५६६ त कृष्णातटाशीं गेल्यानंतर व १५७० त चाफळ्यास श्रीरामाची स्थापना

होण्यापूर्वी त्यांनीं पंचदशींच्या पूजाऱ्यांना जें तें अति गोड पत्र पाठविल्याचें प्रसिद्ध आहे, त्यात त्यांनीं जो पंचविध शुद्धमार्ग सांगितला, त्यात ब्राह्मण्यरक्षणाचा समावेश केलेला आहे

> शुद्ध उपासना विमल ज्ञान । वैराग्य आणि ब्राह्मण्यरक्षण ।
> गुरुपरंपरेचें लक्षण । शुद्ध मार्ग ॥
> ऐसें हें पंचधा बोलिलें । इतुकें पाहिजे यत्नें केलें ।
> म्हणिजे सफळ हि पावलें । म्हणे दासानुदास ॥

या च क्रमात जरी नाहीं, तरी या च पाच गोष्टी ग्रन्थराज दासबोधात हि एका ठिकाणीं आल्या आहेत, त्यावरून या पंचविध शुद्ध मार्गाविषयीं त्यांना किती आग्रह वाटत असे, तें दिसतें. चवथ्या दशकातील कीर्तनभक्तींत श्रीसमर्थ आज्ञापितात

> ब्राह्मण्य रक्षावें आदरें । उपासनेचीं भजनद्वारें ।
> गुरुपरंपरा निर्धारें । चलों च नेदावी ॥
> करावें वैराग्यरक्षण । रक्षावें ज्ञानाचें लक्षण ।
> परम दक्ष विचक्षण । सर्व हि साभाळी ॥

येथें ब्राह्मण्यरक्षणाला पाचात पहिलें स्थान दिलें आहे. ही प्रत्येक बाब अति चिंतनीय आहे. श्रीसमर्थांचे म्हणविणारानीं या पंचविध शुद्ध मार्गाचें मनन, चिंतन, परिपालन किती सांगोपांगें केलें पाहिजे, तें मी सांगायास पाहिजे, असें नाहीं. त्या पंचविध शुद्ध मार्गानें जाणाऱ्या महापुरुषाचें आपणास दर्शन घडेल काय? कोठें, केव्हा घडेल?

> पूर्वजाच्या पुण्यकोटी । संग्रह असिल्या गांठीं ।
> तरी च ऐसीयाची भेटी । होये जनासी ।

श्रीसमर्थांच्या वेळीं ब्राह्मणाची जी हीन स्थिति झाली होती, ती पाहून श्रीसमर्थांनी वाटलेले दु:खोद्गार प्रसिद्ध आहेत.



( ८ )

## श्रीमत् दासबोधांत
## " बहुधा अध्यात्म निरोपण निरोपिलें "
### तें कां ? व कसें ?

( लेखक-रा. गोपाळ रावजी गोगटे, बी. ए., एल् एल्. बी. भुसावळ )

ग्रंथराजाचे प्रारंभीचे समासांत जो एकंदर ग्रंथाचा आढावा घेतला आहे त्यांत नवविधा भक्ति आणि ज्ञान । बोलिलें वैराग्याचें लक्षण । बहुधा अध्यात्म निरोपण । निरोपिलें ॥ १।१।३ असें सांगितलें आहे. दासबोधांत अध्यात्मावर येवढा भर रामर्थानीं कां दिला, हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे.

समर्थांचे वेळीं भरतखंडाची जी अवनत स्थिति झाली होती ती घालविण्याकरितां, ' समुदाय करणें, ' हा रामबाण उपाय, समर्थांनीं योजिला व त्याचा अंमल सर्व भरतखंडाभर मठ व त्या मठांत मठपति स्थापून चालू केला, ही महत्त्वाची गोष्ट समर्थभक्त श्रीयुत शं. श्री. देव, यांच्या प्रवचनाचा जो सारांश, ' रामदास आणि रामदासी ' मासिकाच्या गेल्या १९८ व्या अंकांत प्रसिद्ध झाला आहे, त्यावरून सर्वांचे निदर्शनास आली असेलच. ठिकठिकाणच्या मठावर नेमिले जावयाचे हे मठपति, किती थोर अधिकाराचे पुरुष असावेत, याबद्दलची समर्थांची योजना निश्चित होती. त्यांनीं आपले योजनेप्रमाणें मठपती निवडून तयार करून त्यांस

युक्तियुद्धीनें भरून त्यांची नेमणूक आपले हयातींत केली च, परंतु पुढें हि मार्गदर्शक व्हावी म्हणून ती योजना दासबोधांत अन्तर्भूत केली. मठपती धूर्त, तार्किक, विचक्षण, सावध, साक्षपी, दक्ष, प्रज्ञावंत, प्रबोधशक्तीचा अमूक राजकारणी, वगैरे अनेक गुणसंपन्न असला तरी पूर्ण निस्पृहपणें व नि.सीम त्यागबुद्धीनें त्याला लोकसंग्रहाचें जें कठिण काम तें पूर्णपणें साधणें शक्य नाहीं हें समर्थ जाणून होते. म्हणून मठाधिपतींनें, आत्मज्ञान संपादन केल्याशिवाय, तो त्या पदाला योग्य नव्हे, असें त्याचें मत होतें. अध्यात्माची बैठक नीट बसली तरच लोकसंग्रहार्थ कर्मयोगाचरण नीट घडू शकतें, एरव्हीं नाहीं, हें त्यास पटलें होतें, म्हणूनच दासबोधात, इतर विषयाचे मानानें, अध्यात्मावर त्यांनीं जास्त भर दिला म्हणजेच 'बहुधा अध्यात्मनिरोपण निरोपिलें'. आत्मज्ञानी झालेले असे मठपती जों पर्यंत मठाचा प्रपंच चालवीत होते, तोंपर्यंत सर्व भरतखंडात कसें चैतन्य संचरत होतें, व ती अध्यात्माची बैठक जाताच मठ व मठपती यांची काय दुर्दशा झाली, हें लक्षात आणलें म्हणजे, समर्थांचा आत्मज्ञानी मठपती करण्याबद्दल येवढा कटाक्ष कां होता, हें चटकन् लक्षात येतें. ज्ञानोत्तर निष्काम बुद्धीनें मठपतींनीं केलेला मठाचा प्रपंच राष्ट्रोद्धारक झाला व तद्विपरीत होत असलेला आजचा मठाचा प्रपंच लाजनास्पद झाला आहे. असो. याप्रमाणें, बहुधा अध्यात्म निरोपण का केलें याचें उत्तर झालें. आतां दुसऱ्या प्रश्नाचा विचार करू.

## अध्यात्मज्ञानाचें एवढें श्रेष्ठत्व कां

अध्यात्म म्हणजे आत्म्यासबंधाचें. आत्म्यासबंधाच्या ज्ञानास येवढी श्रेष्ठता का आहे, याचा विचार करता असें दिसून येतें कीं, जें अज्ञेय आहे तें समजून घेण्याची मनुष्य प्राण्याची धडपड, आज अनंत कालापासून चालू आहे. त्यात अगदीं आपल्या सभोंवार दिसणारे, आपल्या आगापर्यंत येऊन भिडणारे, चमत्कार कसे घडतात हें समजून घेण्याची प्रत्येकाची आतुरता असते. आणि आत्म्याचे अधिष्ठानावर घडणाऱ्या

चमत्काराइतके अनंत व विलक्षण चमत्कार दुसरे कोणतेच नाहींत. परंतु त्या आत्म्याचें ज्ञान होणें तर फारच दुरापास्त आहे. तथापि त्या प्रयत्नांचीहि किंमत फार आहे. हल्लींचा जगविख्यात शास्त्रज्ञ आइन्स्टीन म्हणतो कीं:—

**To work with the like-minded in the pursuit of the ever-unattainable is my goal of Life.**

जें सदा अप्राप्य राहणार, त्याच्यासाठीं, समविचारी जनासमवेत, प्रयत्न करीत राहाणें, हें माझ्या आयुष्याचें अन्तिम ध्येय आहे.

भगवन्तांनीं गीतेंत, ' ज्ञान ' म्हणजे काय याचें उत्तर अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्वज्ञानार्थदर्शनमेतज्ज्ञानमिति प्रोक्तं ( अ० १२ श्लो० ११ ) असें देऊन ' अज्ञानं यदतोन्यथा ', असें सुद्दाम वजावलें आहे. म्हणजे अध्यात्मज्ञान नित्य आहे, अशी बुद्धि होणें व तत्वज्ञानाच्या सिद्धांताचें परिशीलन, यास ज्ञान म्हटलें आहे. तदितर तें अज्ञान होय. भगवंतांनीं अध्यात्मविद्या ही आपली विभूतीच आहे असेंहि सांगितलें आहे. समर्थांनीं ५।६।१ मध्यें असेंच प्रतिपादिलें आहे. 'ऐक ज्ञानाचें लक्षण। ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान।' असें सांगून, ५।५ मध्यें अनेक तऱ्हेच्या ज्ञानांची स्वतंत्रच लांब यादी देऊन, त्याबद्दल 'तरी ते कौशल्यता परी ज्ञान। म्हणोंचि नये॥' असा स्पष्ट अभिप्राय दिला आहे. छांदोग्यांत ( ६।१ ) व ( ७।१ मध्यें ) श्वेतकेतूची, व नारद सनत्कुमाराची, जी कथा दिली आहे, त्यांत तरी, इतर ज्ञानें आत्मज्ञानापुढें अगदीं तुच्छ आहेत, हें च दर्शविलें आहे.

आचार्य ब्रह्मसूत्रावरील आपल्या भाष्याच्या प्रस्तावनेंत सांगतात कीं, एवमयमनादिरनन्तो नैसर्गिकोऽध्यासो......... कर्तृत्व भोक्तृत्व प्रवर्तकः। अस्यानर्थ हेतोः प्रहाणाय आत्मैकत्वविद्याप्रतिपत्तये सर्वे वेदान्ता आरभ्यन्ते—
अस्यानर्थ हेतोः प्रहाणाय आत्मैकत्वविद्याप्रतिपत्तये सर्वे वेदान्ता आरभ्यन्ते—
म्हणजे कर्तृत्वभोक्तृत्वाचे चक्रांत फिरविणारा, जो हा अनादि, अनन्त, नैसर्गिक असा अविद्येमुळें होणारा, अध्यास, त्याचा आत्मविद्येनें नाश करून, जन्ममरणपरंपरेपासून प्राण्यांनीं मुक्त व्हावें, म्हणून तर सर्व उपनिषदांचा प्रारंभ आहे. समर्थहि म्हणतात कीं:—

अभ्यासश्रवणें पावावें । परब्रह्म तें ॥ ६।२।२५
तत्काळचि लाभ होतो । प्राणी संसारीं सुटतो ।
संशय अवघाचि तुटतो । जन्ममरणाचा ॥ ६।९।२८
याचि जन्में येणेंचि काळें । संसारीं होइजे निराळें ।
मोक्ष पाविजे निश्चळें । स्वरूपाकारें ॥ ६।९।२९

तेव्हां, येवढा परब्रह्मप्राप्तीचा या मोक्षाचा लाभ ज्याच्या योगानें होतो, त्याची योग्यता किती वर्णावी ! आणि म्हणूनच यमानें नचिकेताला, संसारात लोभनीय वाटणाऱ्या मूल्यवान वस्तू, शतायुष्य, पुत्रपौत्रादि, पशु, हिरण्य, पृथ्वीचें राज्य, इत्यादि देऊं केलीं असता, नचिकेतानें त्या सर्वांचा धिक्कार करून, यमापासून आत्मज्ञान प्राप्त करून घेण्याचा, आपला हट्ट, काहीं केल्या सोडला नाहीं याच आत्मज्ञानाकरिता याज्ञवल्क्याची स्त्री मैत्रेयी इनें, पतानें देऊं केलेला ऐहिक संपत्तीचा विभाग न घेता आत्मज्ञानाचा बोध पतीपासून करून घेतला तसेंच अनेक चक्रवर्ती राजानीं सर्व राज्यलक्ष्मीचा त्याग करून, समित्पाणी होऊन गुरूस शरण जाऊन, स्वतःस कृतार्थ करून घेतलें आहे. पाश्चात्य तत्ववेत्ता Will Durant हा आपल्या Mansions of Philosophy नावाचे ग्रंथात लिहितो कीं —

What is the nature of the world what are its constituents & structure, its ultimate substance and laws ? We would rather know the answers to these *questions than posses all the goods of the earth*

या विश्वाचें स्वरूप काय ? हें कशाचें व कसें बनलें, याचें मूळ द्रव्य काय, याचे नियम काय आहेत ? जगातील सर्व संपत्तीचा अव्हेर करूनहि वरील प्रश्नाचीं उत्तरें मिळाल तर आपणास पाहिजे आहेत. *असो हें आत्मज्ञान विचारानेंच होतें*

आचार्य सांगतात—नोत्पद्यते विनाज्ञान विचारेणान्य साधनैः ( अपरोक्षानुभूती श्लो ११ ) समर्थांचें हेंच सांगणें आहे ' येकांतीं विवेक करावा । आत्माराम वोळखावा ॥' १९।६।३० प्रयगजात एकातात

विचार दीर्घकाळपर्यंत करण्याबद्दल अनेक वचनें आहेत. या आत्मज्ञानाच्या प्रांतात जपादि साधनांचा कांहीं उपयोग नाहीं असें वजाऊन सांगितलें आहे.

### विचाराचे मुख्य प्रश्न कोणते

हे प्रश्न फक्त ४ च आहेत ते असे.

कोऽहं कथमिदं जातम् । कोवैकर्ताऽस्य विद्यते ॥
उपादानं किमस्तीह । विचारः सोऽयमीदृशः ॥ अपरोक्षानुभूती श्लो. १२

याचा अर्थ—( १ ) मी कोण ? ( २ ) हें ( विश्व ) कसें निर्माण झालें ? ( ३ ) याचा कर्ता कोण ? ( ४ ) कोणत्या द्रव्याचें हें बनविलें ? अध्यात्माचा विचार म्हणून ज्याला म्हणतात तो ह्या प्रकारचा होय.

या प्रश्नांचा आपल्याकडील महान् महान् ऋषींनीं अनेक शतकांपासून, दीर्घकाळ एकांतात विचार करून त्यांना सुचलेली उत्तरें दिलेली आहेत. आपल्या विचाराची प्रणाली ही अनेकांनीं स्पष्टपणें सांगितली आहे. त्या ऋषींचे हे विचार फार प्राचीन काळापासून, " शिष्यैः प्रशिष्यैः सच्छिष्यैः " अशा परंपरेनें आलेले, आपणास आजहि इच्छा असल्यास, अवगत होत आहेत. ऋग्वेदांतील ' नासदीय सूक्त ' हें अशा विचाराचें, सर्व जगांत प्रथमचें असें आविष्करण आहे.

रहस्यकार लोकमान्य टिळक, या सूक्ताबद्दल योग्य अभिमानानें लिहितात—" अचिन्त्य वस्तूच्या गहन रानात मनुष्याची बुद्धि सात्विक सत्तेच्या व निर्मळ प्रतिभेच्या जोरावर सिंहा प्रमाणें निर्भयपणें संचार करून त्यातील अतर्क्य गोष्टी यथाशक्ति कशा निश्चित करीत असते, याचें हें उत्कृष्ट उदाहरण असून, ऋग्वेदांत हें सूक्त आढळून येतें, हें खरोखरीच आश्चर्य होय. या सूक्तातील विषयाचे पुढें ब्राह्मण, उपनिषदें व त्यानंतरचे वेदान्तशास्त्रावरील ग्रंथ यांत आमचेकडे, आणि अर्वाचीन काळीं पाश्चिमात्य देशात कान्ट् वगैरे तत्वज्ञान्यांनीं पुष्कळ सूक्ष्म परीक्षण केलें आहे. परंतु ऋषींच्या शुद्ध बुद्धीस, या सूक्तांत ज्या परमसिद्धांतांचें

स्फुरण झालेलें आहे, तेच सिद्धांत प्रतिपक्षास विवर्तवादासारखीं योग्य उत्तरें देऊन अधिक दृढ, स्पष्ट, किंवा तर्कदृष्ट्या निःसंदेह करण्यापलीकडे, अद्याप कोणाचीच मजल गेलेली नाहीं व जाण्याची फारशी आशाहि नको " ( गीतारहस्य पान २५५ ). या ल्हानशा उताऱ्यांत लोकमान्यांनीं आजपर्यंतच्या विचारांचा थोडक्यांत आढावाच काढला आहे.

आत्मज्ञान विचारप्रवर्तक असा, आचार्यांनीं सुचविलेल्या, या चार प्रश्नांचा ऊहापोह, समर्थांनीं आपले प्रयात, विशेषतः दासबोधांत यथास्थित केलेला आहे. दासबोधातील निम्मेहून जास्त भाग, वरील प्रश्नाचे विवेचना करितांच खर्च झालेला आहे. पुनरावृत्ति करूनहि तोच तो विषय दृढ ज्ञान व्हावें म्हणून, वेगवेगळ्या प्रसंगानें त्यांनीं स्पष्ट केला आहे. असो.

### पहिला प्रश्न–मी कोण ?

दासबोधांत १।१।९ मध्यें, आपण कोण हा निश्चयो । बोलिला असें । असें समर्थ सांगतात. त्यांनीं केलेल्या विवरणाचा सारांश या मासिकातच पूर्वी प्रसिद्ध झालेल्या ' आत्मनिवेदन ' या निबंधात सांगून झाला आहे. चारी देह व पाच कोश यांच्या पलिकडला असा, प्रश्न करणारा जो तूं, तो ब्रह्मच आहेस, तत्वमसि या महावाक्याचा मथितार्थ तोहि तूं च आहेस, परमात्मा तो तूं चि जाण । असें या प्रश्नाचें थोडक्यात उत्तर आहे. हल्लीं या मासिकांतून ' एकवीस समासी ' म्हणून श्रीकृत लघु काव्यात एक अति सुंदर प्रकरण प्रसिद्ध होत आहे, त्याचे तेराव्या समासात—

शिष्या ऐके रे मीपण । पुसिलें सांगतों तयाची खूण ।

असा प्रारंभ करून मी कोण या प्रश्नाचें उत्तम विवेचन केलें आहे. समर्थ सांगतात जगात, लटिक्या ' मीपणाचें ' खोटें नाणें जवळ बाळगल्यामुळें–म्हणजे देहबुद्धी दृढ केल्यामुळें–सर्व प्राणी जन्ममरणाचे चक्रांत सापडले आहेत. अज्ञानीं

लटिकें मीपण खरें मानलें । परी त्याचें मूळ नाहीं शोधिलें ।

पण

; ज्यासी मीपण खोटें वाटलें । तेंही पाहोनि स्वसुख घेतलें ।
त्याचें बदलून दिधलें । मीपण रत्न ईश्वरें ॥ १२ ॥

इतका अप्रतीम लाभ या मीपण शोधनाचा आहे. हें जें लटिकें 'मीपण, प्रत्येकानें आपल्यापाशीं बाळगलें आहे, तें उडविण्याची युक्ति अशी:—
' तुचां जाणसी त्यावेगळें असिजे । '

त्यान्ही देहे च्यारी वाचा । पंचभूतें त्रिगुणांचा ।
इंद्रिय चाळक तया मनाचा । जाणता तूं होसी कीं ॥ ४८ ॥
च्यान्ही अवस्ता पांचवी उन्मनी । वृत्ती निवृत्ती याळागुनी ।
यासी हि जाणतोसी कीं म्हणी । लटिकें बोलसी ॥ ४९
आतां थेरें मन घालूनी पाही । मीपणासी हि जाणतोसी कीं नाहीं ।
जाटिल्यासी हि जाणतोसी राहीं । उगा चि आतां ॥ ५०
जाटिल्यासी हि जाणितलें । ऐसें जरी तुज कळलें ।
तरी कळल्यावेगळें राहिलें । तें चि स्वरूप तुझें ॥ ५१

असो.

येथें हस्तामलकाचार्यांची गोष्ट आपण लक्षांत ठेवण्यासारखी आहे. हे जन्मापासून आठ वर्षे पर्यंत मुळींच बोलले नाहींत. तेव्हां आईबापांना चिंता पडली कीं, या मुलास गायत्री मंत्र उच्चार शक्य नसल्यामुळें द्विजत्व कसें प्राप्त व्हावें ? शंकराचार्य त्यांचे गांवीं आले असतां आईबापांनीं त्या मुलावर कृपा करण्याची त्यास विनंती केली. शंकराचार्यांनीं त्या बाळकाचा अधिकार जाणला. संसारांत बोलत बसणें म्हणजे वाचारंभण—वाणीला नुसता शीण देणें आहे म्हणून हा बालक बोलत नाहीं, गायत्री मंत्रानें येणाऱ्या ब्राह्मणत्वाच्या पलिकडला हा आहे व आईबापास त्याचा हा थोर अधिकार न समजल्यामुळें हा मुका निपजला म्हणून ते कष्टी झाले आहेत, हें पाहून त्यांची चिंता दूर करण्याकरितां हस्तामलकास आचार्यांनीं पहिला प्रश्न असा केला कीं:—
' कस्त्वंशिशो ' ? त्या बाळकानें उत्तर दिलें:—

नाहं मनुष्यो न च देवयक्षौ न ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्रः ।
न ब्रह्मचारी न गृही वनस्थो भिक्षुर्नचाहं निजबोधरूपः ॥

वर समर्थांनी 'त्याचें वदद्न दिधलें । मीपण रन ईश्वरें ।' असें जें म्हटलें आहे तें हें असें असतें एकदरींत मी कोण या प्रश्नाचें "मी सच्चिदानंद स्वरूप आहे" हें खरें उत्तर आहे. मी अमुक नांवाचा गोत्राचा अमुक देशीचा वगैरे हें उत्तर चूक.

दुसरा प्रश्न–कथमिदं जातम्–हें सर्व कसें झालें ?

समर्थांनीं हा प्रश्न असा मांडला आहे

( १ ) तरी हे उत्पत्ति कैसी जाली । १०।४।५

( २ ) ब्रह्म खडेना अखंड । मधीं नाहीं दुसरें वंड ।
तरी कैसें हें ब्रह्मांड । सिरकलें मधें ॥ ९।९।३

( ३ ) निरावेवीं कैसें जाले चराचर । ८।२।१

हें विश्व कसें झालें, या प्रश्नाचीं अनेकांनीं अनेक उत्तरें दिलीं आहेत. व जो तो आपलें उत्तर बरोबर असा वाद घालीत बसला आहे. यामुळें ( १ ) नैय्यायिकाचा आरंभवाद, ( २ ) सांख्याचा गुणपरिणामवाद, ( ३ ) अद्वैत वेदान्त्याचा विवर्तवाद अथवा मायावाद, ( ४ ) बौद्धांचा विज्ञानवाद, हे व असे अनेक वाद उपस्थित झालेले आहेत. व ते त्या त्या मताच्या पुरस्कर्त्यांनीं अंगिकारून आपआपल्या पक्षाचें मंडण करून, इतर मार्गाचें खंडण केलेलें आहे. पंचदशींत, विद्यारण्यांनीं, "द्वैतविवेक" या प्रकरणात हीं मतांतरें कशीं असतात हें स्पष्ट करून सांगितलें आहे. जिज्ञासूंनीं, मूळ दर्शनें, अगर पंचदशीचा हा भाग व गीतारहस्यांतील–कपिलसांख्य व क्षराक्षर विचार, व विश्वाची उभारणी संहारणी, हे भाग वाचून त्याचा बोध करून घ्यावा. खंडण मंडणाची सशास्त्र पद्धत ब्रह्मसूत्रावरील शांकरभाष्यात पहाण्यास सापडते. असो. श्रुतिवचनें सर्वांनींच प्रमाण मानिलीं आहेत ही एक ध्यानात ठेवण्यासारखी बाब आहे. श्रुतींतल्या उल्लेखावरून या प्रश्नाचीं उत्तरें पाहावीं त्यात हि

एकवाक्यता सापडणें कठीणच पडतें. यजुः शाखेच्या ' श्वेताश्वतर ' मध्यें मायावी ईश्वर सृष्टि करतो, असें सांगितलें आहे तर ऋग्वेदांत–सृष्टीच्या पूर्वी हें जग आत्माच होतें, ' मी आतां सृष्टी करावी ' अशी त्याला इच्छा झाली व हे सर्व लोक संकल्पानें निर्माण केले असें सांगितलें आहे. तित्तिरि श्रुतींत मीच प्राण्याकरितां बहु व्हावें अशा इच्छेनें ब्रह्मानें तप करून त्यानें सर्व जगत् निर्माण केलें असें ठरविलें आहे. सामवेद्यांचें म्हणणें कीं हें पूर्वी सत् च होते त्यानें पुष्कळ व्हावें असा विचार केला, आणि तेज उदक अन्न व अंडजादि देह उत्पन्न केले. अथर्ववेदीय श्रुतीचें म्हणणें कीं, ज्याप्रमाणें अग्नीपासून ठिणग्या उत्पन्न होतात, त्याप्रमाणें अक्षर संज्ञक परमेश्वरापासून नाना प्रकारचे जड व सजीव पदार्थ उत्पन्न झाले. ही मतमतांतरें पाहून–श्रुतिर्विभिन्ना स्मृतयोपिभिन्ना नैको० या श्लोकाची आठवण होऊन मनुष्य गोंधळांत पडतो.

वर जीं मतमतांतरें अगर अनेक वाद सांगितले त्यांची परस्परांपासून भिन्नता कशी, प्रत्येकानें कोणत्या श्रुतीच्या आधारावर आपलें मत उभारलें, हें पाहात बसण्याचें हें स्थळ नव्हे व मला तें काम साधणार हि नाहीं. मला समर्थांनीं या वादांपैकीं मायावाद अंगिकारला असें दाखवावयाचें आहे व मायावादाचा अंगिकार करून प्रथमच्या तीन प्रश्नांचीं त्यांनीं काय उत्तरें दिलीं येवढेंच सांगावयाचें आहे.

## विवर्तवाद ऊर्फ मायावाद

विवर्तवादांतूनच मायावादाची कल्पना उद्भवली आहे. तेव्हां विवर्तवाद काय आहे तो पाहूं. " अतत्वतोऽन्यथा प्रथा विवर्त इत्युदाहृतः । " तत्वांत फरक न होतां नुसत्या स्वरूपात जेव्हां बदल होतो, तेव्हां त्याला विवर्त म्हणतात, जसें मूळ सोनें त्याचा अलंकार. याप्रमाणें मूळ जें एकमेवाद्वितीय ब्रह्म होतें – निर्गुण होतें – त्याचें सगुण ब्रह्म, मूळ तत्वांत फरक न होतां, बनलें, व या सगुण ब्रह्मापासून पुढें क्रमाक्रमानें आकाशादि सर्व सृष्टि उत्पन्न झाली. हें जें सगुण ब्रह्म बनलें तो केवळ आभास आहे, किंवा भ्रम आहे. आता भ्रम म्हटला

म्हणजे त्याला थोडा तरी सत्याचा आधार लागतोच. तो आधार ब्रह्म वस्तूचाच असतो. याप्रमाणें ब्रह्म हें पारमार्थिक सत्य असून, जगाचा दिसणारा देखावा हा प्रातिभासिक आहे गीतारहस्यांत लोकमान्य सांगतात कीं " दुर्बिणीनें एखाद्या ग्रहाचें खरें स्वरूप निश्चित केल्यावर नुसत्या डोळ्यास दिसणारें त्या ग्रहाचें स्वरूप डोळ्याच्या दुर्बलतेमुळें आणि अति दीर्घ अंतरामुळें उत्पन्न झालेला नुसता देखावा आहे, असें ज्योतिषशास्त्र स्वच्छ सांगतें. कोणतीही गोष्ट नेत्रादि इंद्रियांना प्रत्यक्ष गोचर होते, येवढ्याच कारणावरून ती स्वतंत्र सत्य वस्तू मानता येत नाहीं, हें यावरून उघड होतें मग तोच न्याय अध्यात्मशास्त्रास लागू करून ज्ञानचक्षुरूप दुर्बिणीनें निश्चित केलेलें निर्गुण परब्रह्म तेवढें खरें, व ज्ञान शून्य चर्मचक्षूस गोचर होणारें नामरूप या ब्रह्माचें कार्य नसून इंद्रियांच्या दुर्बलतेनें होणारा नुसता भ्रम आहे, मोहात्मक देखावा आहे, असें म्हणण्यास हरकत काय ? " ( गीतारहस्य पान २३५ ) असें हें मायावादाचें स्वरूप आहे व वरील प्रमाणें तें प्रस्थापितही केलेलें आहे.

समर्थांचा या वादाबद्दल उल्लेख—म्हणौनि हें मायाभ्रमणें । सृष्टि मिथ्या कोटिगुणें । वेद शास्त्रें पुराणें । ऐसीं च बोलती ॥ ६।६।४६ ॥ साधुसंत महानुभाव । यांचा ऐसा चि अनुभव । पंचभूतातीत देव । सृष्टि मिथ्या ॥ ६।६।४७ ॥ द ६ स ५ यांत ब्रह्म व माया यांचें यथास्थित निरूपण केलें आहे. त्यांत मायेचीं म्हणून जेवढीं लक्षणें सांगितलीं आहेत तेवढीं सर्व तिनें होणाऱ्या भ्रमाला अनुसरून आहेत माया सगुण साकार । माया सर्वस्व विकार । माया जाणिजे विस्तार । पंचभूतांचा ॥ ७।१।५५ ॥ माया दृश्य दृष्टीस दिसे । माया भास मनासि भासे । माया क्षणभंगुर नासे । विवेकें पाहातां ॥ ५६ ॥ *माया बहुरूपी बहुरंग । ५८ ॥ माया सृष्टीची रचना । माया आपुली कल्पना । ५९ ॥* तैसें निश्चळ परब्रह्म । चंचळ माया भासला भ्रम। १०।१०।११ ॥ ब्रह्म जें का सनातन। तेथें माया मिथ्या-भान । विकल्प भासे ॥ ८।२।२ ॥ द. ८ स ३ मध्यें मायेचें स्वरूप

मिथ्या कसें आहे हें विस्तृतपणें सांगितलें आहे. तेसें स्वरूप हें संचलें। असतां वाटे गुणा आलें। ऐसें कल्पनेसि गमलें। परी तें मिथ्या ॥ ८।३।४७ ॥ माया पाहातां मुळीं च नसे। परी हे साचाऐसी भासे। उद्भवे आणि निरसे। आभाळ जैसें ॥ ५० ॥ ऐसी माया उद्भवली। वस्तु निर्गुण संचली। अहं ऐसी स्फूर्ति जाली। ते चि माया ॥ ५१

असो. माया ही मिथ्या आहे, भ्रम आहे, व तो निर्गुण ब्रह्माच्या अधिष्ठानावर होतो, व अधिष्ठानाचें ज्ञान होतांच तो सर्व भ्रम नाहींसा होतो, हें समर्थांनीं अनेक ठिकाणीं सांगितलें आहे. त्यांचें मायानदीचें द. ११ स. ७ मधील वर्णन जसें उत्कृष्ट काव्याचा एक नमुना आहे, तसेंच मायेची कल्पना करून देण्याचें एक उत्तम साधन आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. एकवीससमासीच्या १४ व्या समासांत मायेबद्दल थोडक्यांत समर्थ सांगतात कीं'—अरे शिष्या माया कैची। हे धन्या वंध्यापुत्राची। पुत्र चि नाहीं मा त्या कन्येची। वार्ता कोठें ॥३३॥ माया मायिक आभासे। तुझिये कल्पनेसी च दिसे। देहीं देहबुद्धी वसे। म्हणोनिया ॥ ३७ ॥

असो. 'कथमिदंजातम्' या दुसऱ्या प्रश्नास समर्थांचें उत्तर आहे, तें असें कीं–हें दिसणारें सर्व विश्व हा भ्रम आहे, निर्गुण ब्रह्मावर भासणारा हा देखावा आहे–विवर्त आहे–हें सर्व मिथ्या आहे, मुळीं झालेलेंच नाहीं. **यावरून समर्थांनीं मायावाद अथवा विवर्तवाद अंगिकारला आहे असें स्पष्ट दिसतें.** वर जो प्रारंभीं गीतारहस्याचा उतारा दिला आहे त्यांत " विवर्तवादासारखीं योग्य उत्तरें देऊन " असें लोकमान्य म्हणतात, यावरून त्यानांहि तो वाद मान्य वाटला असें दिसतें.

## तिसरा प्रश्न – कर्ता कोण ?

समर्थांचे शब्दांत सांगावयाचें तर–

( १ ) ब्रह्मांड कोणें केलें। कासयाचें उभारलें। १०।८।२३

( २ ) श्रोता ह्मणे वक्तयासी। कोण कर्ता निश्चयेंसीं। सकळ सृष्टि ब्रह्मांडासी। कोणें केलें ॥ १३।८।१

दुसऱ्या प्रश्नाचें वर जें विवेचन केलें आहे त्यावरून हा प्रश्नच शिल्लक राहू शकत नाही हें ओघानेंच आलें कार्य हें कर्त्यानंतरचेंच असणार तें सगुणात आलें व निर्गुणाला तर कर्तव्य घडत नाहीं मग कर्तव्यता कोणाला चिकटवावयाची अशी अडचण येऊन पडते

जें जें कर्तयानें केलें । तें तें त्याउपरी जालें ।
कर्त्यापूर्वी आडळलें । न पाहिजे कीं ॥ १३।८।२६
निर्गुणास कर्तव्य न घडे । सगुण जाल्यात सापडे ।
आता कर्तव्यता कोणेकडे । बरें पाहा ॥ ३०

याचा परिहार समर्थ करतात तो असा —

लटिक्याचा कर्ता कोण । हें पुसणें चि अप्रमाण ।
म्हणोनि हें चि प्रमाण । जें स्वभावें चि जालें ॥ ३१
येथें कर्ता चि दिसेना । प्रत्यये आणावा अनुमाना ।
दृश्य सत्यचें असेना । म्हणोनिया ॥ ३४
केलें तें अवघें च लटिकें । तरी कर्ता हें बोलण चि फिकें ।
वक्ता म्हणे रे विवेकें । बरें पाहा ॥ ३५

चवथा प्रश्न — उपादान किमस्ति

समर्थांचे शब्दांत सांगावयाचें म्हणजे—

( १ ) कासयाची कोणें केली । १०।४।५

( २ ) कासयाचा उभारल । १०।८।२३

कोणताहि पदार्थ तयार व्हावयाला ज्याचा पदार्थ तयार होतो तें घटक द्रव्य, व जो पदार्थ करतो असा कर्ता असे असावे लागतात उदाहरण, घट तयार होण्यास मृत्तिका पाहिजे, त्या मृत्तिकेचा घट बनविला जातो. व कुलाल—कुंभार तो बनवितो या घटनिर्माणक्रियेंत, मृत्तिका व कुलाल हीं दोन्हींही कारणें लागतात त्यात मृत्तिकेला उपादान कारण म्हणतात, व कुलालाला निमित्त कारण, असें म्हणतात याप्रमाणें हें जग निर्माण करण्यास कोणचें द्रव्य घेतलें व तें त्या द्रव्यानें घडविण्याचें काम कोणी केलें याचें वरील प्रश्नास उत्तर पाहिजे आहे.

सृष्टीच्या पूर्वी एकटें सत् होतें, दुसरें कांहींही नव्हतें. व ईक्षणानें त्या सत् ब्रह्मापासून ब्रह्मानेंच ही सृष्टी उत्पन्न केली असें कांहींचें मत असून, प्रथमपासून पुरुष व प्रकृति अशीं दोन तत्वें होतीं व त्यांचे-पासून सृष्टि निर्माण झाली असे मानणारे सांख्य मताचे लोक आहेत. ते गुण परिणामवाद मानितात.

काणाद हे जगाचें मूळ कारण परिमाणू होत असें मानितात. असंख्य परमाणूंचे संयोगास प्रारंभ झाला, म्हणजे सृष्टी निर्माण होते, यास ते आरंभवाद म्हणतात.

अद्वैत वेदान्ती हे मूळद्रव्य सत अथवा ब्रह्म आहे असें धरून त्यावर अनेक पालटणाऱ्या देखाव्याचा अध्यारोप होतो असें मानतात. या अध्यारोपाला अधिष्टान ब्रह्मच आहे. तेव्हां ब्रह्माच्या अधिष्टानावर जो हा अध्यारोप होतो तो मायेमुळें, म्हणजेच प्रकृतीमुळें होतो. हिलाच मूळमाया म्हणतात. समर्थांनीं विश्वाच्या उभारणीचा जो द. १३ स. ३ लिहिला आहे त्यांत—

परब्रह्म असतां निश्चळ । तेथें संकल्प उठिला चंचळ ।
तयासी बोलिजे केवळ । आदिनारायेण ॥ ३ ॥
मूळमाया जगदेश्वर । त्यासी च म्हणिजे षड्गुणेश्वर ।
अष्टधा प्रकृतीचा विचार । तेथें पाहा ॥ ४

तसेंच

ऐसी आत्मस्थिती संचली । तेथें माया कैसी जाली ।
जैसी आकाशीं वाहिली । झुळुक वायोची ॥ ६।३।१२
आकाश असता निश्चळ । मधें वायो जाला चचळ ।
तैसी जाणावी केवळ । मूळमाया ॥ ८।२।२७
रूप वायोचें जालें । तेणें आकाश मगलें ।
ऐसें हें सत्य मानलें । नवचे किं कदा ॥ २८
तैसी मूळमाया जाली । आणि निर्गुणता संचली ।
मेणें दिसते तुटली । मागील आशंका ॥ २९

याप्रमाणें वायूचें उत्पन्न होणें किंवा गगनांत आभाळ येणें किंवा आकाश निळें दिसणें, चंद्र आभाळामुळें धावतोसा दिसणें वगैरे अनेक दाखले देऊन शेवटीं समजूत घातली कीं,

> तैसें स्वरूप हें संचलें । असतां वाटे गुणा आलें ।
> ऐसें कल्पनेसि गमलें । परी तें मिथ्या ॥ ४७

असो. अशा प्रकारची ही मूळमाया झाल्यावर पुढें तिचा पसारा कसा होत जातो याचें दिग्दर्शन केलें आहे.

> ऐसी मूळमाया जाली । तिच्या पोटा माया आली ।
> मग ते गुणा प्रसवली । म्हणोनि गुणक्षोभिणी ॥ ८।४।२
> पुढें तिजपासान कोण । सत्त्वरजतमोगुण ।
> तमोगुणापासून निर्माण । जालीं पंचभूतें ॥ ३

यापुढें पंचीकरणाचा मोठा भाग लागतो त्यावरीं वर्ते आपणास कांहीं कर्तव्य नाहीं.

मुण्डकोपनिषदात एकच ब्रह्म निमित्त व उपादान कारण कसें असू शकेल ? अद्वैत राखून हें द्वैत कसें सिद्ध करता येईल या शंकेला यथोर्णनाभिः सृजते गृह्णते च० ( मु. ७।१।१ ) हा दृष्टांत दिला आहे. जसा कोळी आपलें शरीरापासून तंतु उत्पन्न करून ते पुन्हा आपल्यातच आवरून घेतो, अथवा पृथ्वीपासून वनस्पति उत्पन्न होतात, अथवा जिवंत पुरुषापासून केश व लव उत्पन्न होते—म्हणजे त्यांना ते पदार्थ उत्पन्न करावयास वेगळें कांहीं उपादान कारण लागत नाहीं; त्याप्रमाणें या अविनाशी ब्रह्मतत्त्वापासून विश्व उत्पन्न होतें, असें सांगून शंकेचा परिहार केला आहे आमच्याकडील ऋषींनीं दीर्घ विचार करून ही उत्तरें दिलीं. त्यांना सर्व भिस्त तर्कावर ठेवावी लागली आहे. अलिकडे भौतिकशास्त्राची फार वाढ झालेली आहे व पाश्चात्यांचें त्या शास्त्रावर फार परिशीलन झालेलें आहे. नाना प्रकारच्या उपकरणांनीं सज्ज अशा प्रयोगशाळेंत अखंड प्रयोग चालवून या विश्वाच्या ( Constituents ) मूलद्रव्यांचा

शोध लावण्याचे शिस्तवार प्रयत्न चालले आहेत. परंतु त्यांची काय वाट लागली पाहा. Will Durant या ग्रंथकाराचे यापूर्वी वर येऊन गेलेल्या उताऱ्यांतील प्रश्न, वर उद्धृत केलेल्या अपरोक्षानुभूतींतील ४ प्रश्नांसारखेच जवळ जवळ आहेत; त्यासंबंधीं तो म्हणतो :

The more we learn, the less we know. Every advance reveals new mysteries & new uncertainties. The molecule discloses the atom The atom discloses the electron. The electron discloses the quantum. The quantum defies and overleaps all our categories & all our laws. *Education is a progress in the art of doubt* ( Mansions of Philosophy by Will Durant, page 54 ). म्हणजे जितकें अध्ययन जास्त तितकें निश्चित ज्ञानापासून दूर, असें होत आहे. प्रगतीच्या म्हणून वाटणाऱ्या प्रत्येक टप्प्यावर नवीनच कोडीं येऊन पडतात व नवीनच संशय उभे राहतात. प्रथम मॉलिक्युल् हें मूळ द्रव्याचें स्वरूप म्हणून त्यावर स्थिर होतो, तों त्यांतून ॲटम् निघाला, त्यांतून पुढें इलेक्ट्रॉन् निघाला, त्यांतून आतां क्वांटम् निघाला. ह्या येड्या क्वॅांटमला कसलाच कांहीं धरबंद नाहीं आणि जातगोत नाहीं. एकंदरींत ज्ञानाची प्रगति म्हणजे संशयचक्रांत भ्रमण्याची प्रगति असें म्हणण्याची वेळ आली आहे. जग कोणी कशाचें बनविलें वगैरे प्रश्नांबद्दल हा ग्रंथकार स्पष्टच कबुली देतो कीं—Let us resign ourselves to inevitable failure.........because it is not reasonable to expect that the part should ever understand the whole.

आपली तर्कशक्ती चालू शकत नाहीं अशी कबुली देणें प्राप्त आहे व याचें खरें कारण हें आहे कीं, अपूर्णानें पूर्णाचें ज्ञान मिळण्याची हाव धरली आहे ती सफळ होणें शक्य नाहीं. हे त्या लेखकाचे उद्गार

अस्तिचा देही मांपाचा डोळा । पाहेन म्हणे ब्रह्माचा गोळा ।
तो ज्ञाता नव्हे आंधळा । केवळ मूर्ख ॥ ६।८।२६

ही समर्थांची ओवी वाचूनच तो काढीत आहे असें वाटतें.

आचार्यांचें उत्तर या प्रश्नाला आहे तें असे.

उपादानं प्रपञ्चस्य ब्रह्मणोऽन्यत्र विद्यते ।

तस्मात्प्रपंचोऽयं ब्रह्मैवास्ति न चेतरत् ॥ अपरो. श्लो. ४५

प्रपंचाचें उपादान कारण ब्रह्माहून अन्य नाहीं. तस्मात् हा सर्व प्रपंच ब्रह्मच आहे. अन्य कांहीं नाहीं. आकाशापासून देहापर्यंत जेवढा म्हणून प्रपंच आहे, त्या सर्वांचें मायेनें कल्पित झालेल्या ब्रह्मावांचून अन्य कांहीं एक कारण नाहीं. अर्थात् परमाणूंना किंवा प्रकृतीला जगत्कारण ठरविणारे नैयायिक व सांख्य यांचें प्रतिपादन श्रुतिबाह्य आहे. ( बापट शास्त्री यांचें वरील श्लोकावर विवरण पा. ५१।५२ )

असो. आतांपर्यंत झालेल्या विवरणाचा सारांश असा कीं ( १ ) समर्थांना मठाधिपती आत्मज्ञानी असावे असें वाटत होतें म्हणून अध्यात्मावर दासबोधांत ज्यास्त भर दिला आहे. ( २ ) तें आत्मज्ञान विवेकानेंच प्राप्त होतें. ( ३ ) तो विवेक ४ प्रश्नांपुरता केला म्हणजे त्यांत सर्व आलें. ( ४ ) त्या ४ प्रश्नांचीं ( अ ) मी ब्रह्म आहे, ( ब ) विश्व हा ब्रह्मावर नुसता अध्यास आहे, निर्माण वगैरे कांहीं वेगळें झालेलें नाहीं, ( क ) निर्माणच झालें नाहीं तर कर्ता कोण हा प्रश्नच उरत नाहीं, ( ड ) ब्रह्मच याचें उपादान कारण आहे, अशीं उत्तरें आहेत. यावरून पाहातां आचार्यांनीं अपरोक्षानुभूतींत मांडलेले चार प्रश्न समर्थांनाहि योग्य वाटून त्यांच्या सारखेच प्रश्न मांडून त्यांनीं त्यांचीं उत्तरें दिलीं, येवढेंच नव्हे, तर आचार्यांनीं अंगिकारलेला विवर्त अथवा मायावादच समर्थांनीं अनुसरला. अर्थात् समर्थ मायावादी होते असें झालें.

### पण मायावादानें तर अनर्थ केला आहे

सर्व शंकांचें समाधान करूं शकेल असे अनेक विचारवन्तांना दीर्घ विचारांनीं सुचलेलें हें मायावादाचें उत्तर पुष्कळांना रुचत नाहीं. त्याचा या मायावादावर मोठा आक्षेप आहे. तो आक्षेप वे. शा. सं. विद्यावाचस्पति सदाशिवशास्त्री भिडे यांनीं मुंडकोपनिषदाचे आपले उपसंहाराचीं

पानें १२२-१२३-१२४ वर थोडक्यांत सुंदर रीतीनें मांडला आहे. त्यांतील जरूरीपुरता भाग येणें प्रमाणेः— " ब्रह्मतत्वाच्या एक अंशांत ब्रह्मशक्तीच्या योगानें जें सगुण ब्रह्म बनलें तीं वस्तुतः स्वरूपाची बनावट नसून तो केवळ रज्जुसर्पासारखा आभास किंवा भ्रम आहे. पृथ्वीच्या उत्पत्तिक्रमांतील ही पहिली पायरी, भ्रमस्वरूप आहे असें मायावादी लोक समजतात व त्या भ्रमास आधार सत्य ब्रह्मवस्तूचा आहे. ब्रह्मवस्तूचें यथार्थ ज्ञान झाल्याबरोबर हा जगद्‌भ्रम नाहींसा होऊन त्याचें स्मरण सुद्धां नाहींसें होतें. स्वप्नांतील व्यवहार त्या स्थितींत खरा असला तरी तो जागृतीच्या दृष्टीनें जसा सर्वस्वीं खोटा व त्याज्य ठरतो त्याप्रमाणेंच सृष्टींतील भौतिक व्यवहार, किंवा मानवी व्यवहार हे सर्व परमार्थदृष्ट्या अत्यंत खोटे असून सर्वथैव त्याज्य च ठरतात. ज्याप्रमाणें मनुष्य जागा झाल्यावर स्वप्नांत घडलेल्या गोष्टींपैकीं कोणताही व्यवहार मन:पूर्वक करूं शकतच नाहीं, त्याप्रमाणें ब्रह्मज्ञानसंपन्न ज्ञानी मनुष्य कोणतेंहि कर्म करू शकत नाहीं. यावरून कर्म व ज्ञान यांचा तमःप्रकाशवत् आत्यंतिक विरोध आहे, असें मायावादांत कबूल करावें लागतें.एकदां हा विरोध कबूल केल्यावर विधि निषेध, नीति अनीति, पापपुण्य, किंवा धर्माधर्म वगैरे सर्व कल्पना कुचकामाच्या ठरतात. त्याचप्रमाणें वर्णाश्रमविहित कर्तव्यें, सामाजिक उन्नति, किंवा अभ्युदय, संस्कृतीची परंपरा व तिचा अभिमान, राष्ट्रीय किंवा सामाजिक जीवन वगैरे सर्व सद्गुणांचें महत्त्व पार नष्ट होतें; आणि केवळ व्यक्तीनें ब्रह्मज्ञान मिळवून ब्रह्मानुभव संपादन करणें एवढेंच एक मानवी जीविताचें ध्येय होय असें कबूल करावें लागतें.

" मायावादी वेदांताच्या कल्पना आमच्या समाजांत फारच पसरल्या आहेत. गेल्या दोन हजार वर्षांमध्यें सर्व पारमार्थिक विचार या मायावाद पद्धतीनें तयार झाले आहेत....अगदी निरक्षर मनुष्यापासून तों थेट सुशिक्षित विद्वानापर्यंत हिंदु मनुष्याचें अंत:करण वैयक्तिक भावनेनेंच बनलें आहे कीं काय असें वाटूं लागतें. त्याला समाज, देश किंवा राष्ट्र या विषयाची ओळख

देखील नाहीं असे म्हटले तरी चालेल .... .... एकंदरींत हिंदुसमाजाला हें मायावादाचें वळण लागल्यामुळें तो राष्ट्र या नात्यानें मृतप्राय झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं .... .... हा मायावाद इतका प्रभावशाली झाला कीं त्यानें आमच्या राष्ट्राचा प्राण घेऊन तें नामशेष केलें. जो वैदिक धर्म एका काळीं सर्व मानव जातीचा मार्गदर्शक होता त्याच वैदिक धर्माचा अनुयायी म्हणविणारा आजचा हिंदुसमाज सर्वांचाच गुलाम बनला. तात्विकदृष्ट्या या सर्वनाशाची जबाबदारी मायावादावरच पडते."

वरील उताऱ्यावरून मायावादावरचा आक्षेप किती गंभीर आहे हें लक्षात येतें. आणि मनापुढें असा प्रश्न उभा राहातो कीं, अशा मायावादावरच अधिष्ठिलेला आत्मज्ञानाचा उपदेश करून समर्थांनीं आपल्या शिष्यास मठपतीं करून त्यांच्याकरवीं मेलेल्या राष्ट्राला जिवंत करून स्वराज्य प्राप्तीची महत्वाकांक्षा कशी बाळगली ? इतकेंच नव्हे तर ती सफलहि करून दाखविली, हा चमत्कार कसा घडला ? राष्ट्राचा प्राण घेणारा हा मायावाद राष्ट्रांत जोराचा प्राणसंचार कसा करू शकला ! खुद्द समर्थच मायावादी असून अतिश्रेष्ठ असे कर्मयोगी कसे ? हें एक कोडें येऊन पडतें त्याचा विचार वाचकांनीं करावा व आम्हीहि यथावकाश करूं.



# ( ९ )

## मायावादांत व्यावहारिक कर्में सिद्ध होऊं शकतात

( लेखक—महामहोपाध्याय श्रीधर शास्त्री पाठक, धुळें )

[ मागील निबंधाच्या शेवटीं रा. गोपाळराव गोगटे यानीं जो प्रश्न उपस्थित केला आहे, त्याचें समाधान कसें, असें आम्ही आमच्या विद्वानें भूषण महामहोपाध्याय श्रीधरशास्त्री पाठक याना विचारिलें. त्याचें उत्तर त्यानीं सोबतच्या टाचणात लिहून दिलें आहे. तें च उत्तर श्रीसमर्थांच्या च शब्दात देण्याचा अजून हि कोणी तरी प्रयत्न केला पाहिजे, असें आम्हास वाटतें. महामहोपाध्यायानीं मार्ग दाखविला च आहे आम्ही त्याचे ऋणी आहोंत.–संपादक– ]

अद्वैत वेदान्ताप्रमाणें ब्रह्म हेंच एक सत्य व बाकी सर्व दृश्यजात हें मिथ्या आहे, आभास आहे, स्वप्न भ्रान्ति किंवा मायामय आहे. साहजिकच मुमुक्षूपुढें असा प्रश्न उभा राहतो, कीं जर ' मिथ्या सारा जगिक पसारा ' अशी स्थिति आहे, तर प्रपंचाचा हा सर्व जोजार कशास पाहिजे ? जगांतील सर्व व्यापार, व्यवहार, देशोद्धाराचे उद्योग, स्वार्थत्याग, परोपकार वगैरे हीं सर्व थोतांडेंच नव्हेत काय ? तात्पर्य हें व हींच सिद्ध होऊं शकत नाहीं. मायावादाचा आश्रय केला असतां आळशी किंवा हताश होऊनच बसलें पाहिजे अशी भूमिका प्राप्त होते.

परंतु वरील समजूत चुकीची आहे. मायावादाची दृष्टि खरोखर कशी आहे हें बरोबर न समजल्याचा हा परिणाम आहे. ब्रह्म हें जरी सत्य, निर्गुण, निराकार निर्विकार आहे, तरी त्याच्या ठिकाणीं अनादि अशी अनृत, सगुण, साकार, विकारी अशी माया भासमान होते व सत्यमहाशीं अनृतमायेची गांठ पडून सर्व प्रकारचा वैदिक व लौकिक

व्यवहार निसर्गत सिद्ध होतो. माया या शब्दाचा अर्थच मया म्हणजे प्रमाणज्ञानानें ( मा म्ह. प्रमाणज्ञान ) जी या म्हणजे याति, नष्ट होते ती माया माया भासते कशी व नष्ट होते कशी हें पुढें दिलेल्या प्रक्रियेवरून कळेल

वेदान्तामध्यें सत्ता ( म्हणजे अस्तित्व ) तीन प्रकारची मानलेली आहे व ती अनुभवसिद्ध आहे. पहिली प्रातिभासिक सत्ता, दुसरी व्यावहारिक सत्ता व तिसरी पारमार्थिक सत्ता होय सर्वांस परिचित असलेल्या रज्जुसर्पदृष्टान्तानें ही तीन प्रकारची सत्ता नीट लक्ष्यात येईल. अधुक प्रकाशात दोरा पडली असता तो सर्प आहे असा भास होतो, ही प्रातिभासिक सत्ता दिवा आणून पहाता तो साप नसून दोरी आहे असें समजलें म्हणजे दोरीची व्यावहारिक सत्ता सिद्ध झाली व दोरीच्या मूळ कारणाचा शोध घेता घेता सुम, धाग्या, नारळ, माड, माती, प्रकृति व परब्रह्म अशा तऱ्हेनें शेवटल्या पायरीवर पोंचल्यावर दोरीच्या ठिकाणीं ब्रह्मदृष्टि उत्पन्न होईल. तेव्हा दोराची ब्रह्मरूपानें पारमार्थिक सत्ता ज्ञात होईल. या तीन हि सत्तांपैकीं प्रातिभासिक व व्यावहारिक सत्ताच्या अखेरपर्यंत व्यवहार सिद्ध होतो व पारमार्थिक ब्रह्मापर्यंत व्यवहार निवृत्त होतो किंवा व्यवहाराचाहि नलम्पता येते

प्रातिभासिक सत्ता व्यवहारदृष्ट्या खोटी आहे व व्यावहारिक सत्ता पारमार्थिक सत्तेच्या दृष्टीनें खोटी आहे येथें मिथ्या म्हणजे शशशृङ्गवत् कल्पनेंत सुद्धा अस्तित्वात नाही असा अर्थ नव्हे, तर इंद्रियास भासमान होणारी पण वस्तुत नसणारी पण या अशा मायिक असत्य सत्तेनें व्यावहारिक सत्य कार्य घडतें उदाहरणार्थ रज्जूवरील भासमान जो खोटा सर्प त्यानें भय, कम्प इत्यादि व्यावहारिक सत्य परिणाम घडलेले दिसून येतात श्रुतानें याविषयीं स्वप्नाचा दृष्टान्त दिला आहे

यदा कर्मसु काम्येषु स्त्रियं स्वप्नेऽनुपश्यति ।
समृद्धिं तत्र जानीयात् तस्मिन्स्वप्ननिदर्शने ॥

काम्यकर्म चालू असतां स्वप्नामध्यें जर स्त्रीदर्शन होईल तर त्या स्वप्नदर्शनानें कर्मसमृद्धि अनुभवास येते. स्वप्नांत पाहिलेल्या गोष्टींनीं हर्ष, भीति, हास्य वगैरेंचा अनुभव लौकिकांत प्रसिद्ध आहेच. आतां दुसऱ्या म्हणजे व्यावहारिक सत्तेंत जग हें व्यवहारापुरतें सत्यच असतें म्हणून व्यवहार हा व्यवहारदृष्टीनें होऊं शकतो. स्वप्नामध्यें सुद्धां स्वप्नाच्या अनुभवाच्या वेळीं त्या त्या गोष्टी खऱ्याच वाटतात.

दृष्टिभेदानें व्यवहार सिद्ध किंवा निवृत्त कसा होतो हें एका मौजेच्या दृष्टान्तानें सांगतां येतें. एका गृहस्थाला दारिद्र्य आलें, तेव्हां त्याला नाइलाजानें देवांच्या सोन्याच्या मूर्तीहि विकण्याची पाळी आली. तेव्हां साहजिक च सोन्याचा कस पहाण्यासाठीं सोनारास बोलावणें भाग पडलें. सोनारानें खंडोबाचा कुत्रा पहिल्यानें घेऊन त्याचें नाक कसोटीवर घासलें. अर्थात् यजमानाची भावना दुखवली गेली. मग सोनारानें खंडोबाची मूर्ति घेऊन ती तो कसोटीवर घासणार, इतक्यांत यजमान ओरडला, कीं हं खबरदार, कुत्र्याचें नाक घासलेंस तर घासलेंस पण खंडोबाचा असा अपमान मी नाहीं करूं देणार ! पण व्यवहारी सोनार थोडा च ऐकतो ? गोष्टीचें तात्पर्य असें, कीं व्यवहारांतल्या सोन्याला उपासनेच्या भावनेमुळें कल्पनेनें खोटा च देवपणा आला होता. ती भावना दूर केल्यावर यजमान व सोनार दोघे हि मूर्तीला देव न समजतां व्यवहारांत सोनें च समजतात. त्या च यजमानाला व सोनाराला जर ब्रह्मदृष्टि आली तर दोघे हि माती व सोनें सारखींच समजून दोन्ही विषयीं उदासीन होतील. स्वतःला ब्रह्मदृष्टि आल्यावर, ज्याला सोनें हें सोनें च वाटतें त्याला माती न देतां सोनें देण्याचा व्यवहार हि ते करूं शकतील. त्या व्यवहाराचा त्यांना लेप लागणार नाहीं.

ब्रह्मदृष्टि प्राप्त झालेल्या पुरुषांस तशी दृष्टि प्राप्त न झालेल्या अज्ञ लोकांकरितां व्यवहारांत व्यवहारी लोकांसारखें वागावें लागतें. एरवीं जगांत अव्यवस्था व गोंधळ माजेल. सर्व पदार्थ एक प्रकारच्या मूलभूत परमाणूंचे

बनलेले आहेत असें सांगणारा विज्ञानवादी व्यवहारांत साखर व एरंडेल तेल असे दोन हि पदार्थ सारख्या च निर्विकार चेहऱ्यानें खाणार नाहीं. ब्रह्मनिष्ठासारखा सर्वभूतीं सम झाला तर खाईल हि तात्पर्य, आत्यंतिक तत्त्वाच्या दृष्टीनें सर्व एकरूप किंवा मिथ्या आहे असें जरी पटलें तरी ज्याना तसें पटलेलें नाहीं त्याच्यासाठीं तरी ब्रह्मनिष्ठाला त्याच्यासारखें वागणें प्राप्त होतें ज्याप्रमाणें नदीच्या परतीराला जाणाऱ्याला नदींतून पोहून च पाण्यामधून गेलें पाहिजे त्याप्रमाणें ज्याना ब्रह्मदृष्टि आलेली नाहीं त्याना व्यवहार करता करता च ती आणून द्यावयाची असते व तसें करण्यासाठीं ब्रह्मनिष्ठ हि व्यवहार करतो असें दिसतें तो तसें न करील तर जगताचा उद्धार च होणार नाहीं म्हणून च ज्ञानेश्वरानीं ब्रह्मनिष्ठाविषयीं पुढील उद्गार काढले आहेत —

जें पुढुतीं पुढुतीं पार्था । हे सकळ लोकसंस्था ।
रक्षणीय गा सर्वथा । म्हणौनिया ॥ ३ १७० ॥
मार्गाधारें वर्तावें । विश्व हें मोहरे लावावें ।
अलौकिका नोहावें । लोकाप्रति ॥ ३-१७१ ॥

आता श्रीसमर्थ हे अद्वती व मायावादी होते हें त्याच्या ग्रंथावरून उघड च आहे व त्यानींहि ब्रह्मदृष्टि कायम ठेऊन लौकिक दृष्टीनें व्यवहार केला व शिकविला हि, यांत कोणत्याही रीतानें युक्तिविहितत्त्व येत नसल्यानें त्यानीं मायावादी अद्वैती राहून व्यवहार कसा केला, या शंकेचा वरील विवेचनानें निरास होईल, असें आमचें नम्र मत आहे



( १० )

# श्रीसमर्थचरित्रांतील ध्रुवाचा तारा

( एका प्रवचनाचें टांचण )

आवघे चि सुखी असावे । ऐसी वासना ॥

श्रीसमर्थांच्या चरित्राचें मुख्य सूत्र कोणतें, कीं ज्याच्या आधारानें त्यांच्या सर्व चरित्राची आपणांस संगति लावतां येईल, असा प्रश्न आहे. कोणत्या एका निरपवाद सिद्धान्तावर अचल दृष्टि ठेवून त्यांच्या सर्व लीला घडल्या, याचा विचार करणें बोधप्रद होईल. हा प्रश्न सोडवितांना त्यांचें सारें चरित्र आठवून आणि सर्व वाङ्मय विचारांत घेऊन ते तत्त्व शोधिलें पाहिजे.

तत्त्वज्ञानाचा किंवा नीतिशास्त्राचा आम्हांस विशेष परिचय नाहीं. केवळ त्यांचें चरित्र आणि त्यांचे उद्गार यांच्या आधारानें आम्ही वरील प्रश्न सोडवूं इच्छितों. आमच्या दृष्टीनें, श्रीसमर्थांना पाहण्याचें, त्याचा साक्षात्कार होण्याचें ठिकाण एक च– त्याचे ग्रन्थ. जें त्यानीं पाहिलें नाहीं, मानलें नाहीं, किंवा आचरिलें नाहीं, तें त्यानीं लोकास सांगितलें नाहीं. ग्रन्थराज श्रीमत् दासबोध म्हणजे प्रत्यक्ष श्रीसमर्थांचें स्वरूप, त्यांचें आत्मचरित्र होय, असें आम्ही मानीत आलों आहोंत व हा आमचा विश्वास दिवसानुदिवस दृढावत चालला आहे व तो आम्ही अनेक ठिकाणीं अनेकदां प्रकट केला आहे. श्रीमत् दासबोधातील अध्यात्म, तत्त्वज्ञान, नीति, राजकारण, समाजकारण, वैयक्तिक आणि सामुदायिक आचारविचार यापैकीं कशाशीं हि त्यांच्या चरित्राचा विरोध आला न पाहिजे. तसा विरोध भासेल तर आपणास ग्रन्थ बरोबर लावता आला नाहीं, किंवा

चरित्र बरोबर उमगणें नाहीं, असें समजलें पाहिजे. त्याची संगति लागतां आली नाहीं किंवा येत नाहीं, असा विरोध आमच्या नजरेस आलेला नाहीं. या बाबतींत आम्हास कदाचित इतरांचें समाधान करता येणार नाहीं, पण आमचें समाधान व्हावें म्हणून इतरापासून आम्ही अपेक्षा हि करीत नाहीं. हा भावनेचा, निष्ठेचा, विश्वासाचा, भक्तिप्रेमाचा, एकात्मतेचा प्रश्न आहे.

'पुष्कळांचें पुष्कळ सुख' (Greatest good of the greatest number) असा एक वर्तनाचा नियम सांगतात, परंतु त्यावर पुष्कळांनीं पुष्कळ आक्षेप घेऊन त्याचें सदोषत्व दाखविलें आहे.

आत्ममत परानें तें । मानीत जावें ॥
आपणावरून दुसऱ्याला । राखत जावें ॥
आपल्या पुरुषार्थवैभवें । बहुतांस सुखी करावें ।
परंतु कष्टी करावें । हे राक्षसी क्रिया ॥

या अर्थाचीं अनेक वचनें एका सुरूप सूत्रांत येतात, असें आम्हास वाटतें. तें सूत्र म्हणजे

आपणचि सुखी असावें । ऐसी वासना ॥ १९ $^{६}_{३}$

हें होय व्यक्तीला, समाजाला, राष्ट्राला हें सूत्र मार्गदर्शक झालें पाहिजे. त्याच्या जोडीला आणखी एक विलक्षण विचारांत घेतली म्हणजे जगातील सर्व कोडीं उलगडता आलीं पाहिजेत

आपणचि सुखी असावें । ऐसी वासना ॥

आणि

परपीडेवरी नसावें । अंतःकरण ॥ ११ $^{६}_{२}$

हीं दोन परस्परपोषक, येकमेकास पूरक तत्त्वें मानलीं, म्हणजे जगांत अत्याचार, अनीति, असत्याचरण, अन्याय, परस्वापहरण, इत्यादि राक्षसी क्रियेला कोठें हि मुळीं च आधार राहात नाहीं वरील तत्त्वाच्या जोरावर या दुष्ट क्रियेचें निर्मूलन करणें समर्थनीय ठरेल



( ११ )

श्री

# श्रीसमर्थांच्या पाउलवाटेवर :
# राजे रघुजींचें रामदास्य

( लेखक — रा. त्रिंबक रामकृष्ण गद्रे,
बी. ए., एल्एल्. बी., वकील, अकोला )

**परिच्छेदांचे मथळेः—** ( १ ) श्रीसमर्थांच्या पाउलवाटेवर, ( २ ) नागपुरकर भोसल्याचा उदय, ( ३ ) रामदासी महंत देवगावा, ( ४ व ५ ) राजे रघुजींचें रामदास्य, ( ६ ) रघुजींचे वैरागी हेर ! ( ७ ) रामराज्य करणें सर्वत्र हो !, व ( ८ ) कांहीं गैरसमजांचे निरसन

## ( १ ) श्रीसमर्थांच्या पाऊल वाटेवर

श्रीसमर्थांच्या पाउलवाटेवर पदार्पण करीत गेल्या तीनचारशें वर्षांत महाराष्ट्रांतील पराक्रमी पुरुषांनीं स्वदेशाला निरनिराळ्या संकटांतून निभावून नेलें आहे, इतकें च नव्हे तर श्रीचरणाच्या दर्शनानें उल्हसित होऊन मोटमोठ्या राज्यांची व साम्राज्यांची हि स्थापना केली आहे. श्रीसमर्थांनीं बारा वर्षे भारतवर्षांत संचार केला व त्या त्या ठिकाणीं प्रकट व गुप्त अशीं आपलीं माणसें हेरून व पेरून ठेवलीं. श्रीशिवाजी महाराज अवरंगजेबाशीं मुकाबला करण्यास उत्तरहिंदकडे रवाना झाले असतां स्वतः रामदासस्वामी महाराष्ट्रांतून अदृश्य झाले व शिवबा पुनः स्वदेशीं परतल्यावर त्याचे गुरु हि आनंदभुवनांत प्रवेश करते झाले. आग्र्याहून सुटका व महाराष्ट्रांत पुनरागमन हें मराठेशाहीवरील प्रथम संकट समर्थांच्या पाउल-वाटेवर लक्ष ठेऊन मार्गक्रमण केल्यामुळें दूर झालें असें पुष्कळ विद्वानांचें

मत आहे. दुसरें प्राणांतिक संकट छत्रपति संभाजी महाराजांचा क्रूरपणानें अवरंगझेबाकडून वध करण्यांत आला व बालराजे शिवाजी व राजमाता येसूबाई यांना अटकेंत ठेवण्यांत आलें त्या वेळचें. सर्व सेना व खजिना घेऊन, शूर परंतु परधार्जिण्या रजपूत जातांच्या पलटणींच्या जोरावर मराठ्यांचें राज्य बुडविण्यासाठीं अवरंगझेब थैमान घालूं लागला होता. या वेळीं जिंजीचा स्वातंत्र्याचा रणसंग्राम छत्रपति राजारामाच्या नेतृत्वाखालीं मराठ्यांनीं केला; त्या वेळीं हि श्रीसमर्थांच्या पाऊलवाटेच्या दर्शनानें मराठ्यांवरचें संकट निवारलें गेलें.

## ( २ ) नागपुरकर भोंसल्यांचा उदय

वरील स्वातंत्र्ययुद्धांत जीं मराठे वीरांचीं घराणीं उदयास आलीं त्यांतील एक प्रमुख घराणें म्हणजे नागपुरकर भोसले हे होत. वऱ्हाड-गोंडवनकडे मोंगल सैन्याला शह देण्याची कामगिरी यांच्याकडे आली होती, व ती त्यांनीं पराक्रम दाखवून यशस्वी हि केली. छत्रपति शाहू महाराज अटकेंतून सुटून स्वदेशीं आले, त्यावेळीं नागपुरकर भोसले त्यांना मिळाले, व एका ताटांत भोजन करून शाहू महाराजांचें मराठेपण — क्षत्रियत्व — त्यांनीं मान्य केलें. त्यानंतर या घराण्यावर महाराजांची फार कृपा असे. या च घराण्यांतले अत्यंत पराक्रमी पुरुष म्हणजे पहिले रघुजी भोसले हे होत. हे रामभक्त होते, इतकें च नव्हे तर रामदासी हि होते असें अलिकडे उपलब्ध होऊं लागलेल्या माहितीवरून अनुमान करतां येतें. नागपुरकर भोंसल्यांचा वचक च असा मठ उत्पन्न होण्यास प्रथमतः कारणीभूत झालेली आहे.

## ( ३ ) रामदासी महंत देवबावा

उपरिनिर्दिष्ट नागपुरकर भोंसल्यांच्या बखरींत भंडारा येथील रामदासी महंत देवबावा यांच्याबद्दल पुढील प्रमाणें उल्लेख करण्यांत आला आहे:—

" सेनासाहेब फौजेसहित आपण भंडाऱ्यास येऊन देवबावा संत यांचें दर्शन घेऊन पायांवर डोई ठेवून, रामदास स्वामींचे सांप्रदायी,

शिवाजी महाराजांस अनुग्रह त्यांचा, या अर्थे जाणोन नंतर प्रसाद मागितला आणि संतबावाचे खांद्यावरील भोकटी होती ती आपले खांद्यावर घेऊन त्यांतील अन्न घेऊन प्रसाद भक्षिला. "

संत देवबावा हे मूळचे उमरावती जिल्ह्यांतील नांदगांव पेठ येथील राहणारे होते. उमरावतीपासून चार पांच कोसांवर हा गांव असून तेथें एक मारुतीचें देवालय आहे. देवबावा भंडारा येथें केव्हां व कां आले हें समजत नाहीं. भंडारा येथें त्यांचा रामदासी मठ आहे व त्याला " देवघर " असें म्हणत असत. या मठाची आतां एक खोली शिल्लक राहिली आहे व ती " देवघर कोठी " या नांवानें सध्यां ओळखली जाते. देवबावा हे काण्वशाखीय यजुर्वेदी ब्राह्मण, त्यांचें मूळचें आडनांव " जपे " होतें. त्यांचे वंशज हल्लीं " देवघरे " हें आडनांव लावतात. देवबावा हे पहिल्या रघुजी राजांचे गुरु असून त्यांच्या या रामदासी मठाला रघुजींनीं उत्पन्न हि करून दिलें होतें. मठांत रामनवमीचा मोठा उत्सव होतो. मठांतल्या श्री रामचंद्राच्या मूर्ति संगमरवरी दगडाच्या आहेत व त्या रघुजी राजांनीं तयार करवून या मठास अर्पण केल्या. देवबावांची परंपरा अशीः—

" देवबावा — रघुनाथ — आत्माराम — गंगाधर — रघुनाथ — केशव "

## ( ४ ) राजे रघुजींचें रामदास्य

नागपुरकर भोसले घराण्यांतले पहिले सेनासाहेब सुभे म्हणजे परसोजी भोसले हे होत. त्यांचे पुत्र कान्होजी. यांचें व छत्रपति शाहु महाराज यांचें सख्य नव्हतें. पहिले रघुजी भोसले यांच्यावर महाराजांची मर्जी होती. त्यामुळें रघुजींना महाराजांनीं सेनासाहेब सुभे नेमले. रघुजींची बाळपणाची माहिती फारशी उपलब्ध नाहीं. रघुजींचे वडील बिंबाजी हे रघुजींच्या जन्मानंतर लवकर च कालवश झाले असावेत. साताऱ्याजवळ पांडववाडी येथें रामाजीपंत कोल्हटकर या नांवाचे एक रामदासी सत्पुरुष

रहात असत. त्याच्या आशीर्वादानें रघुजींचा जन्म झाला ह्मणून त्याचें नाव " रघुजी " असें ठेवण्यात आलें. राजे रघुजींच्या वेळेपासून च नागपुरकर भोसले घराण्यात " श्रीरामचंद्र " हें मुख्य दैवत झालें व रामोपासना सुरू झाली. रघुजींच्या पूर्वी नागपुरकर भोसल्यांच्या कागद-पत्रावर " श्रीशंकर " असा मथळा असे. रघुजींपासून " श्रीसीताकांत " असा मथळा सुरू झाला. रघुजींची चुलती हि रामोपासक होती व त्याचें नाव हि " रामाऊ " असें होतें थोडेंसें मोठे झाल्यावर रघुजी आपल्या चुलतीजवळ राहू लागले व पुढें चाकरीच्या निमित्तानें ते वऱ्हाडात आले. काहीं दिवस ते आपले चुलते राणोजी व कान्होजी यांच्या लष्करात राहिले. परंतु त्यांच्याशीं बेबनाव झाल्यामुळें त्यांनीं देवगडचे चाद सुलतान व एलिचपुरचे नबाब इस्मायलखान यांच्याकडे चाकरी केली. अशा तऱ्हेनें वऱ्हाडनागपुर प्रांताचा प्रत्यक्ष अनुभव घेऊन रघुजी परत सातान्यास आले व छत्रपति शाहु महाराज यांच्या आश्रयाखालीं राहू लागले.

## ( ५ ) राजे रघुजींचें रामदास्य ( पुढें चालू )

शाहु महाराजानीं रघुजींची नेमणूक फत्तेसिंग भोंसले यांच्या सैन्यात केली. फत्तेसिंग भोंसल्यांनीं केलेल्या मोहिमात रघुजींनीं चांगला पराक्रम दाखविला. कान्होजीनंतर रघुजी याना सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें शाहु महाराजानीं दिलीं. वऱ्हाड व गोंडवनची सनद देताना पुढील करार शाहु महाराजानीं रघुजींकडून करून घेतला —( १ ) रघुजीनें सरकार चाकरी करता पाच हजार स्वार बाळगावे. ( २ ) दर साल नऊ लक्ष रुपये सरकारात भरावे ( ३ ) घासदाण्याची रकम रघुजीनें घ्यावी. ( ४ ) इतर उत्पन्नापैकीं निमें रघुजीनें घ्यावें व निमें सरकारात जमा करावें. ( ५ ) सरकारास जरूर लागेल तेव्हां रघुजीनें दहा हजार लष्कर उभें करावें ( ६ ) पेशवे ज्या वेळेस मोहिमेवर जातील त्या वेळेस रघुजीनें आपल्या लष्करासह पेशव्याबरोबर जावें अथवा दुसरीकडे कोठें पाठविल्यास तिकडे हि जावें. रघुजींची

कारकीर्द पंचवीस वर्षांची ह्मणजे इ. स. १७३० ते १७५५ पर्यंत झाली. या कालावधींत रघुजींनीं वऱ्हाडपासून कटक पावेतों व गढामंडल्यापासून दक्षिणेंत चंद्रपुरापर्यंत आपल्या राज्याचा विस्तार केला. रघुजींच्या संबंधानें नागपुरकर भोसल्यांच्या बखरींत पुढील प्रमाणें मार्मिक उद्गार काढले आहेतः—

" रघोजी बेवा शिपाई दोस्त एक पैसा जवळ न ठेवितां तमाम खर्च फौजास देऊन फोजेस रजावंतीनें ठेवीत होते व अडचणींचे प्रसंगास कोणासही शब्द टाकल्यास माघारे घेत नव्हता व कूच मुक्काम कोणासच कळूं नये, हरवक्त ह्मणत असावे ' जे राम करील ते खरें ' जवामर्दी जातीनें करावी. ऐशआराम बिलकुल नाहीं. घोड्यावरच भाकरी खाची ".

राजे रघुजी रामोपासक होते हें वर आलेंच आहे. नागपुरजवळ असलेल्या प्राचीन रामटेक अथवा रामगिरि क्षेत्रांतील देवालयांत असलेल्या श्रीरामचंद्राच्या मूर्ति रघुजींनीं नवीन स्थापिल्या व या प्राचीन क्षेत्राचा जीर्णोद्धार केला. कर्नाटकच्या मोहिमेवर असतांना तंजावरकडील एका रामदासी साधूनें रघुजींना श्रीरामचंद्राची मूर्ति प्रसाद ह्मणून दिली होती. तेव्हांपासून छत्रपति शाहु महाराजाच्या परवानगीनें रामचंद्राच्या नांवानें भगवा झेंडा नागपुरकर भोंसल्यानीं सुरू केला.

## ( ६ ) रघुजींचे बैरागी हेर !

राजे रघुजींच्या लष्करात हेरगिरीचे काम करणारे अनेक हेर किंवा गुप्त चर ( Scouts ) होते व ते बैराग्याच्या वेषानें सर्वत्र हिंडत असत असे उल्लेख आढळतात. सेनासाहेब सुभे यानीं आपले दिवाण भास्करपंत कोल्हटकर यास बंगाल प्रांतावर स्वारी करून व तो प्रांत सोडवून स्वराज्यात आणण्याच्या कामगिरीवर नेमले होते. हें कार्य चाळीस हजार फोज घेऊन त्यानीं यशस्वी करण्याच्या अगदीं बेतांत आणलें होतें.

परंतु बंगालच्या सुभेदारानें मोगलाई मसलत केली. भास्करराव व त्यांचे शूर सरदार यांना आपल्या लष्करांत मोठ्या नम्रतेनें निमंत्रिलें व त्या प्रसंगीं विश्वासघातानें त्यांचा खून केला. या नीच कृत्याचा सूड उगविण्याची योग्य संधि सेना साहेब पहात होते. इ. स. १७४८ मध्यें ओरिसा प्रांतांतील बंगालच्या सुभेदाराचे सरदार यांनी बंड केलें व रघुजी राजांस मिळण्याचा धाक घातला. ही बातमी रघुजींच्या वैरागी हेरांनीं रघुजींना कळविली. समर्थ रामदासस्वामींचे शिष्य हि अशी कामगिरी करीत असल्याचें सुप्रसिद्ध आहे. रघुजींचे हे वैरागी हेर सुद्धां महाराष्ट्रीय असून रामदासी सांप्रदायांतील च असावेत असा तर्क करण्यास हरकत नाहीं. आलेली संधि अर्थात सेना साहेबांनीं घालविली नाहीं. त्यांनीं स्वतः स्वारी करून ओरिसा प्रांत हस्तगत केला. या वेळेपासून पुढें पन्नास वर्षेपर्यंत ( इ. स. १८०३ पावेतों ) तो नागपुरकर भोंसल्यांच्याच ताब्यांत होता.

## ( ७ ) रामराज्य करणें सर्वत्र हो !

" रामराज्य करणें सर्वत्र हो " हेंच नागपुरकर भोंसल्यांचें ध्येय होतें व तें त्यांनीं मोठ्या धडाडीनें व शौर्यानें पार पाडलें; व त्या कामीं त्यांना हजारो वैराग्यांचें हि साह्य झालें. त्यांचा पहिला मुकाम वऱ्हाडांत यवतमाळ जिल्ह्यांतील भाम या ठिकाणीं होता. त्याला अजूनहि " राजाची भाम " असें म्हणतात. या जागीं फक्त वैरागी लोकांचाच पांच हजार उंबरठा होता. हे वैरागी लढवय्ये होते. हे रामदासी सांप्रदायांतीलच असले पाहिजेत. शलें बाळगून परसोजी, कान्होजी, रामाजी अशा लढवय्या मराठे सरदारांच्या लष्कराच्या मुख्य ठिकाणीं रहाण्याचो उठाठेव सामान्य वैरागी कशाला करतील ? तंजावर किंवा रामेश्वर ते गंगासागर—कलकत्यापर्यंत हे रामदासी वैरागी रामराज्याच्या स्थापनेच्या उद्योगांत हेरगिरीचें ( Scouting चें ) कार्य करीत होते. राजे रघुजींना बंगालच्या स्वारींत त्यांनीं मदत केल्याचें आपण वर पाहिलेंच आहे.

## ( ८ ) कांहीं गैरसमजांचें निरसन

राजे रघुजींवर अंगचोरपणा व देशद्रोह हे आरोप गैरसमजुतीनें कधीं कधीं करण्यांत येतात. भोपाळच्या वेढ्याच्या वेळीं त्यांनीं पेशव्यांस मदत न करतां बहारबंगालकडे निराळी स्वारी केली व नानासाहेब पेशव्यांच्या उत्तर हिंदुस्थानच्या धोरणास त्यांनीं प्रत्यक्ष विरोध केला. हे दोन्ही आरोप सिद्ध करण्यास पुरावा नाहीं. उलट पहिल्या प्रसंगीं रघुजींनीं एलिचपूरच्या नबाबाचा मोड करून त्याला भोपाळ येथें निजामाला मिळूं दिलें नाहीं असें इतिहास सांगतो. दुसऱ्या प्रसंगीं जी लढाई पेशवे व सेनासाहेब सुभे यांच्या दरम्यान झाल्याचें म्हणतात ती लढाई कोठें झाली हें इतिहास सांगत नाहीं. बंगालच्या कटकटीची कुणकुण छत्रपति शाहु महाराजांना समजल्यावर त्यांनीं पेशवे व सेना साहेब याच्यांत समेट घडवून आणला व वऱ्हाड पासून कटक पर्यंतचा सर्व मुलूख व बंगाल, विहार व लखनौ एवढ्या मार्गांत पेशव्यांनीं ढवळाढवळ करूं नये व हे प्रांत भोसल्यांच्या कार्यक्षेत्रांतील समजले जावे असें ठरवून दिलें. याप्रमाणें स्वपराक्रमानें राजे रघुजींनीं महाकोसल, छत्तिसगड, वऱ्हाड, ओरिसा व छोटा नागपुर हे प्रांत स्वराज्यांत आणले व एक प्रबल राज्य निर्माण केलें; बहार व बंगाल प्रांतांवर अनेक स्वाऱ्या करून हिंदूंना अभय दिलें व अहिंदूवर दरारा बसविला; व "जगन्नाथपुरी" या पवित्र हिंदु धर्मक्षेत्राचें संरक्षणकार्य अंगावर घेऊन आणि श्रीसमर्थांच्या पाऊल वाटेवर लक्ष ठेवीत आपल्या महाराष्ट्रधर्माची शियस्त केली.

### परिशिष्ट

आधारभूत संदर्भग्रंथः—( १ ) नागपुरकर भोंसल्यांची बखर—द्वितिय संशोधित आवृत्ति, श्री. या. मा. काळे कृत, ( २ ) वऱ्हाडचा इतिहास, श्री. या. मा. काळेकृत ( ३ ) नागपुर प्रांताचा इतिहास, श्री. या. मा. काळेकृत, ( ४ ) भारत इतिहास संशोधक मंडळाच्या त्रैमासिकाचा अंक आषाढ १८६०, जुलै १९३८, अंक ७३ वर्ष १९, पृष्ठ १६ ते १९ : नागपुरचे प्रि. दा. वे. ओक

यांचा लेख– " एक अप्रसिद्ध संत : देवबाबा, देवताबाबा ऊर्फ देवबा. " ( ५ ) व-हाडमध्यप्रांतातील निरनिराळ्या जिल्ह्याचे प्रांतीय सरकारनें प्रसिद्ध केलेले " गॅझेटियर " नावाचे ग्रंथ, व ( ६ ) धुळ्याच्या सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केलेले रामदासी वाङ्मय व विशेषेकरून पहिला, दुसरा व तिसरा सुमनहार, इत्यादि.

अकोला, १८६१ चैत्र शुद्ध १



॥ श्रीरामसमर्थ ॥

# आज श्रीसमर्थ असते तर —

( लेखक — गणेश शंकर देव, धुळें )

**श्रीरामराज्य करणें सर्वत्र हो। स. म. २०–७२**

( १ ) आज ज्येष्ठ शुद्ध १३; श्रीशिवछत्रपतींच्या राज्याभिषेकाला आज २६५ वर्षे पुरीं होऊन २६६ वें वर्ष सुरू होत आहे. अशा या परम मंगल दिवशीं ' आज श्रीसमर्थ असते तर — ' याविषयीं कांहीं विचार स्वतःशीं च, पण प्रकटपणें, करावा, असें मनांत आणिलें आहे.

( २ ) ती. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं श्रीसमर्थांचें अवतार कार्य एका वाक्यात योजिलें आहे, तें असें कीं, " ( १ ) पूर्वजांच्या पुण्याईनें, ( २ ) अंगीं वैराग्य बाणून, ( ३ ) विश्वाच्या कल्याणाची चिंता वाहून, ( ४ ) स्वतः सावध होऊन, ( ५ ) देह अत्यंत कष्टवून, ( ६ ) श्रीरामकृपा संपादन करून, ( ७ ) देशस्थिति अवलोकन करून, ( ८ ) प्रथम जन्मदात्या मातेचा उद्धार करून, ( ९ ) मग भूमातेच्या उद्धारार्थ कृष्णातटाकीं जाऊन, ( १० ) रक्षिता देव देशाचा त्याचा उत्सव सुरू करून, ( ११ ) अवघे चि सुखी असावे । ऐसी वासना ॥ मनीं धरून, ( १२ ) ठिकठिकाणीं मठ स्थापून, ( १३ ) अगणित शिष्यसमुदाय करून, ( १४ ) त्याग परमार्थाची जोड करून देऊन, ( १५ ) व युक्तिबुद्धीनें भरून, ( १६ ) संत व श्रीशिवरायावर कृपा करून, ( १७ ) त्याच्या राज्यास साधक केलें, ( १८ ) आणि रामराज्याची पुनरपि स्थापना केली, ( १९ ) इतकें च नव्हे तर, पुन्हां राष्ट्रावर तसा च काळ ओढवला तर त्या संकटसमयीं आपला ग्रंथ मार्गदर्शक होईल असे ग्रंथ निर्माण करून ठेविले, ( २० ) हें श्रीसमर्थांचें अवतारकार्य होय ! "

( ३ ) हें श्रीसमर्थांचें अवतारकार्य मान्य केल्यावर आज हि श्रीसमर्थांनीं राष्ट्राच्या कल्याणाची चिंता वाहून, स्वत. सावध होऊन, देह अलत कष्टून, श्रीरामकृपा संपादन करून, श्रीरामोपासनेचा प्रसार वाढवून, देशस्थिति अवलोकन करून, ठिकठिकाणीं संस्था आणि संस्थांच्या शाखा स्थापन करून, अगणित अनुयायी मिळवून व त्यांना युक्तिबुद्धीनें भरून, अवघे चि सुखी असावे । ऐसी वासना ॥ मनीं धरून, आणि शक्य, योग्य व आवश्यक त्या सर्व मार्गांचा अवलंब करून देशात रामराज्याची पुनरपि स्थापना केली असती, हें आपोआप च मान्य करावें लागतें.

( ४ ) ‘ आज श्रीसमर्थ असते तर —’ या प्रश्नाचें उत्तर थोडक्यात हें असें आहे; आणि श्रीसमर्थसंप्रदायाचा, श्रीसमर्थांच्या चरित्राचा, थोडा तरी अभ्यास असणाराना तें मान्य होईल असा विश्वास वाटतो. पण एवढ्यानें माझें स्वत चें च समाधान होत नसल्यामुळें या विषयाचा थोडा ऊहापोह करावा असें वाटतें. त्यासाठीं, श्रीसमर्थकालीन परिस्थिति काय होती तें थोडक्यात आरंभीं पहावें, त्या परिस्थितीशीं आजच्या परिस्थितीची तुलना करावी, राष्ट्रातील प्रमुख पक्षाची माहिती करून घ्यावी, आणि

श्रीसमर्थांच्या अभावीं

काय होत आहे आणि व्हावयास पाहिजे हें जाणून घेण्याचा प्रयत्न करावा, असें मी योजिलें आहे

( ५ ) हा विषय च इतका महत्त्वाचा, व्यापक आणि गंभीर स्वरूपाचा आहे कीं, माझ्यासारख्या अल्पज्ञानें त्याविषयीं दोन शब्द लिहिण्याचें मनात आणून तसा प्रयत्न करणें, हें धाडसाचें आहे, हें मी जाणतों, पण या विषयाच्या प्रतिपादनातील माझ्या वैगुण्यामुळें च एखाद्या जाणत्या व्यासंगी विद्वानाचें लक्ष या विषयाकडे वळलें, तर माझ्यातील वैगुण्याचा हि उपयोग झाला असें होणार आहे, आणि तसें व्हावें, अशी च माझी इच्छा आहे.

( ६ ) इतिहासाचार्य पुरातत्त्वभूषण विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनीं सुमारें २२-२३ वर्षांपूर्वी लिहिलेला 'श्रीसमर्थसंप्रदायाचे हेतु, उगम व रूप' हा लेख त्या वेळीं श्रीरामदास आणि रामदासी मासिकांत प्रसिद्ध झाला. त्यांत इतिहासाचार्य लिहितात : "( १ ) लोकोद्धार करावा, ( २ ) तो कृष्णातटाकीन महाराष्ट्रांत करावा, व ( ३ ) तो सनातनधर्मीयांचा करावा, असें नैसर्गिक कार्य श्रीसमर्थांनीं स्वतःपाशीं तपश्चर्या व प्रवास करतांना ठरविलें. + + येथें अशी शंका आणिता येईल कीं, समर्थांनीं आपलें कार्यक्षेत्र भौमिक दृष्ट्या व लौकिक दृष्ट्या इतकें संकुचित का करून घेतलें? + + भारतवर्षांतील सर्व लोकांचा उद्धार करण्याच्या गद्दत कृत्याला हात न घालतां, फक्त महाराष्ट्रांतील सनातनधर्मीयांचाच तेवढा उद्धार करण्याची विषम कल्पना त्यांना पसंत कशी झाली? या शंकेला उत्तर असें आहे कीं, सबंद भारतवर्षांतील सर्व प्रकारच्या लोकांचा एकदम उद्धार करतां येणें व्यवहार्य नाहीं, अशी समर्थांची परीक्षा झाली. मतामतांचा गलबला, वंशावंशांचा गलबला, भाषाभाषांचा गलबला, असा सर्वत्र गलबला झालेला समर्थांनीं पाहिला. या गलबल्यात ऐक्य उत्पन्न होणें किंवा करणें असंभाव्य आहे, अशी परीक्षा समर्थांनीं केली. मुसुलमानांच्या मनात बाकीच्या सान्या मुसुलमानेतर प्रजेस जमीनदोस्त करावयाचें होतें. + + + अशा स्थितींत समर्थांनीं आपलें कार्यक्षेत्र मर्यादित केलें, हें त्यांच्या विवेचक स्वभावास परम भूषणीय झालें."

( ७ ) 'मुसुलमानेतर प्रजेस मुसुलमानांच्या मनांत जमीनदोस्त करावयाचें होतें' हें आपलें विधान आपल्या पदरचें नाहीं, तें श्रीसमर्थांचें आहे असें सांगून इंदुरबोधन व डोमगाव मठाच्या बाडांतील, ज्यात तत्कालीन अस्मानी सुलतानीचें वर्णन स्वतः श्रीसमर्थांनीं केलें आहे, असे तीन प्रबंध रा. राजवाडे यांनीं उद्धृत केले आहेत; आणि "दुष्काळ पडला, झुंबाड सुरू झाली, लोक मरूं लागले, व गांवें ओस झालीं. चोऱ्यामाऱ्या व दगेधोपे यांचा सुकाळ झाला. इतक्यांत परचक्र आलें व दोन्ही कडच्या सैनिकांनीं प्रजेचा संहार मांडिला, रांडग्यांनीं हजारो जीव धरून फाडिले! नाकरान कापले, स्त्रिया भ्रष्टविल्या व लोकांच्या मोटा बांधून समुद्रांत बुडविल्या. चोरांनीं सौदागरांना बुडविलें आणि काफिल्यांना लुटलें. यवनांनीं व मुसुलमानांनीं गुराढोरें व ब्राह्मणांची बाटविल्या, जहाजावर धरून नेल्या, विशेष स्त्रिया देशांतरास नेऊन गुलाम म्हणून विकून टाकिल्या आणि कोवळीं सुंदर व मातृ धिया हालहाल होऊन मेल्या," असा त्या तीन प्रबंधांचा

सारांश देऊन रा. राजवाडे लिहितात "मुसुलमानी अमदानींत समर्थांच्या बाळपणांत अस्मानी व सुलतानी जुलूम नित्याचा होऊन बसला होता. त्याचें हें वर्णन आहे. तीर्थक्षेत्रें बुडविणें, व्यापारी उदमी लुटणें, स्त्रिया पोरें भ्रष्टविणें आणि धर्म पंथाचा उच्छेद करणें, या बाबी मुसुलमानांच्या अमलांत शालिवाहनाच्या सोळाव्या शतकाच्या प्रारंभास व मध्यास हि पूर्वी प्रमाणें च जारीनें प्रचलित होत्या. हा अनन्वित निर्दयपणा समर्थ बाळपणापासून पहात होते व त्यांतून लोकांची मुक्तता कोणत्या उपायानें करतां येईल तें शोधीत होते."

(८) समर्थकालीन समाजस्थितीची कल्पना यावरून थोडक्यात येते. आजची स्थिति त्याहून कांहीं निराळी आहे कीं काय, तें आतां पहावयाचें. त्यानंतर आज २५०।३०० वर्षांचा काळ लोटला आहे. त्यामुळें होणाऱ्या जुलुमजबरदस्तींच्या प्रकारांत फरक झाला असेल इतकें च. पण त्या जुलुमजबरदस्तीचे परिणाम मात्र ते च होत आहेत, किंबहुना जास्त भयानक आहेत. आज दुष्काळ जाहीर होत नसला तरी, शेतकऱ्याचा कर्जबाजारीपणा आणि पोटपेशाची दैना ही जाहीर न होणाऱ्या दुष्काळाचीं च लक्षणें आहेत. आज हि लुटालूट होत नाहीं असें थोडें च आहे? पण ती त्या वेळच्या सारखी नाहीं इतकें च काय तें! त्याकाळीं एवढें तरी असे कीं, सारा पैसा या च देशांत तरी राही, पण आज या देशांतील पैशाची कायदेशीर लूट फार होत आहे, आणि त्या पैशाचा ओघ या देशाच्या बाहेर एकसारखा कसा जात आहे हें आतां कोणाला नव्यानें सांगण्याचें कारण नाहीं. लोकांच्या मोटा बांधून प्रत्यक्ष समुद्रांत बुडविण्याचे प्रसंग आज येत नाहींत हें खरें, पण प्रत्यक्ष मोट बांधून समुद्रांत च कशाला बुडवायास पाहिजे? पोत्यांत घालून पोत्याचें तोंड बांधून सत्याग्रह्यांना दांडक्यांनीं ठोकल्याचें उदाहरण आहे च ना! सारी सज्जनांच्या सत्त्वानें नष्ट करण्याचे, परिणामाच्या दृष्टीनें मोट बांधून समुद्रांत बुडविण्यापेक्षा हि भयंकर असे, प्रयत्न चालू च आहेत! परकीय राजसत्तेनें आरंभीं आरंभीं स्वतःच्या बळावर आणि नंतर आपल्या च पक्षीं फितुरांच्या सहाय्यानें या देशांतील विद्यमान आणि भावी नागरिकांचीं मनें मारून त्यांना मुर्दाड बनविण्याचें कार्य कसें अव्याहत

चालू ठेवलें आहे, हें आपण जाणतों च. स्त्रियांवरील संकटें तरी कमी झालीं अहेत म्हणावें, तर तसें हि नाहीं! आज हि स्त्रिया भ्रष्टविल्या जात आहेत! हिंदु स्त्रियांना पळवून नेल्याची बातमी नाहीं असा बहुधा दिवस जात नसेल! हिंदु स्त्रियांना पळवून नेणाऱ्या गुंडांचे संघटित अड्डे आणि टोळ्या प्रांतोप्रांतीं, शहरोशहरीं आहेत असें म्हणतात! याशिवाय वैयक्तिक प्रयत्न होतात ते निराळे च! हिंदु स्त्रियांवर होणारें हें आक्रमण बहुधा एका विशिष्ट जातीकडून च होत आहे; आणि या प्रकारांचें समर्थन निर्लज्जपणें कसें करतां येतें तें हि आपण पाहिलें च आहे! कांहीं महिन्यांमागें येथें एका मध्यप्रांतस्थ कार्यकर्त्याचें व्याख्यान झालें असतां त्यांनीं सांगितलें होतें कीं, एकट्या मुंबईंत रोज तीस हिंदु स्त्रिया पळविल्या जातात! आणि आपल्याला जरी मोपल्यांच्या बंडाचा विसर पडला असला, तरी त्या दिव्यांतून पार पडलेल्या किंवा त्या दिव्यांत होरपळलेल्या स्त्रीपुरुषांना त्याचा विसर पडणें दुरापास्त होय! बॅरिस्टर सावरकर यांनीं वाजविलेली भयसूचक घंटा आपल्या कानांवर आली होती ना? ती च पुन्हां एकदां ऐकावी किंवा वाचावी म्हणजे झालें. सारांश, आपल्या हिंदु समाजाची स्थिति त्या वेळेला जी होती, ती च आज हि आहे, किंबहुना त्याहून वाईट च आहे!

(९) असली परिस्थिति पालटण्यासाठीं श्रीसमर्थांनीं कोणत्या उपायांची योजना केली होती? 'कार्य, कार्यदेश, कार्यसमाज व नमुनेदार उपास्य निश्चित केल्यानंतर, समर्थांनीं सनातनधर्माच्या समाजधारणेस प्रारंभ केला. समाजधारणेचा समर्थांचा मुख्य उपाय म्हणजे मंडलीकरण उर्फ समुदयन.' त्यासाठीं अवघ्या छत्तीस वर्षांत श्रीसमर्थांनीं अकरारों मठ स्थापिले आणि तितके च प्रकट महंत म्हणजे मठाधिपति निर्माण केले. गुप्त व प्रकट असे समर्थांचे दोन प्रकारचे समुदायी असत. 'गुप्त समुदायी कोण व प्रकट समुदायी कोण हें एकट्या मठाधिपति शिवा खुद्द श्रीसमर्थ यांवेरीज इतरांना माहीत नसे.'

हरिभजन, राजकारण, आणि वर्तायाचें लक्षण या तीन बाबींकडे श्रीसमर्थांचें महत्त्व आणि समुदायीं यानीं मुख्यत लक्ष धावयाचें असे.

मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण ।
तिसरें तें सावधपण । सर्व विषईं ॥ ११-५-४

हरिकथा निरूपण । नेमस्तपणें राजकारण ।
वर्तायाचें लक्षण । तें हि असावें ॥ ११-६-४

हरिकथा निरूपण । बरेंपणें राजकारण ।
प्रसंग पाहिल्याविण । सकळ खोटें ॥ १२-१०-२९

( १० ) ' हरिभजन म्हणजे संप्रदायसिद्ध रामोपासना. राजकारण म्हणजे धर्मराज्याला पोषक असा उद्योग व वर्तायाचें लक्षण म्हणजे सामाजिक कर्मकौशल्य.'

मऱ्हाटा तितुका मेळवावा । आपुला मऱ्हाष्टधर्म राखावा ॥ बाडा क ५८९
हा रामबाण तोडगा श्रीसमर्थांनीं समाजाच्या दुखण्यावर योजिला. ' येत तो देव जाणावा ' म्हणणारे श्रीसमर्थ शक १५७० त चाफळक्षेत्रीं श्रीरामचंद्राची स्थापना करून आपल्या प्रयत्नास प्रकटपणें लागले. श्रीसमर्थांनीं स्वराज्यासाठीं स्वतंत्रपणें मुख्यत धर्मकारण आरंभिलें, तर श्रीछत्रपतींनीं स्वधर्मासाठीं मुख्यत राजकारण सुरू केलें, आणि

शक्तीनें मिळतीं राज्यें । युक्तीनें येत्न होतसे ।
शक्ती युक्ती जये ठाईं । तेथें श्रीमंत धावती ॥ स्फु प्र ६७-१०

या प्रमाणें श्रीसमर्थांच्या पूर्वायुष्यांत सुरू झालेलें धर्मराज्यस्थापनेचें अद्भुत कार्य अवघें २६ वर्षांत पुरें होऊन श्री शिवछत्रपतींच्या राज्याभिषेकानें महाराष्ट्रांत रामराज्य सुरू झाल्याची जाहीर घोषणा केली. श्रीशिवसमर्थांनीं हा चमत्कार अवघ्या २६ वर्षांत करून दाखविला ! तेव्हां कोणी हि निराश होण्याचें कारण नाहीं

मऱ्हाटा तितुका मेळवावा । आपुला मऱ्हाष्टधर्म राखावा ॥
अशी घोषणा त्यावेळीं श्रीसमर्थांनीं केली, आणि आज श्रीसमर्थ असते तर त्यांनीं

हिंदु तितुका मेळवावा । आपला हिंदुधर्म राखावा ॥

अशी घोषणा केली असती. मराठा म्हणजे च हिंदु आणि महाराष्ट्रधर्म म्हणजे च हिंदुधर्म. मराठ्यांचा धर्म निराळा आणि बाकीच्या हिंदूंचा धर्म निराळा, असें त्या वेळीं हि नव्हतें आणि आज हि नाहीं. श्रीसमर्थांच्या राज्यांत निराशा आणि करंटेपणा यांना स्थान च नाहीं. जणूं, श्रीरामचरणीं मस्तक ठेवून च श्रीसमर्थ म्हणत आहेत :

रामा तुझिया स्वामीपणें । मी हें ब्रह्मांड मानीं ठेंगणें ।

' आधीं केलें मग सांगितलें ' हा श्रीसमर्थांचा बाणा ! ते श्रीसमर्थ आत्मप्रचीतीनें सांगतात :

घालून अकलेचा पवाड । व्हावें ब्रह्मांडाहून जाड ।
तेथें कैचें आणिलें द्वाड । करंटपण ॥ १२-९-३१

तेव्हां आतां निराशा आणि करंटेपणा यांना वाव च कोठें उरला ? सारांश येत्न तो देव जाणून श्रीसमर्थांनीं दाखविलेल्या मार्गानें जाण्याचा हरएक हिंदूनें आपआपल्या परी प्रयत्न करण्यांत च हिंदुधर्माचें आणि हिंदुराष्ट्राचें — हिंदुस्थानाचें — कल्याण आहे.

( ११ ) श्रीसमर्थांनीं दाखविलेल्या मार्गानें जाण्याचा कोठें कांहीं प्रयत्न या देशांत होत आहे कीं काय हें हि थोडक्यांत पहाणें इष्ट आहे असें वाटतें. या दृष्टीनें विचार करावयाचा म्हणजे हिंदी राष्ट्रीय सभा, लोकशाही स्वराज्य पक्ष, वर्णाश्रमस्वराज्य संघ, मुस्लिम लीग, हिंदुमहासभा, आणि राष्ट्रीय-स्वयंसेवक-संघ या संस्था प्रामुख्याने नजरेसमोर येतात.

( १२ ) श्रीसमर्थांच्या दृष्टीनें पहावयाचें म्हणजे ' हिंदु तितुका मेळवावा । आपुला हिंदुधर्म राखावा । ', हा देश हिंदूंचा आहे, हिंदूंचा च राहिला पाहिजे, हिंदू च या देशांत मालक म्हणून नांदले पाहिजेत, आणि

मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण ।
तिसरें तें सावधपण । सर्व विषईं ॥ ११-५-४

या दृष्टीनें पहावयाचें.

( १३ ) अर्थात च असा विचार करिताना 'मुस्लिम लीग' बाजूस सारावी लागते. मुस्लिम लीगचे उद्देश चतुर्विध आहेत, ते येणें प्रमाणें

(a) The establishment in India of full Independence in the form of a federation of free democratic States in which the rights and interests of the Mussalmans and other minorities are adequately and effectively safeguarded in the Constitution,

(b) To protect and advance the political, religious and other rights and interests of Indian Mussalmans,

(c) *To promote friendly relations and unity* between the Mussalmans and other communities of India;

(d) To maintain and strengthen brotherly relations between the Mussalmans of India and those of other countries.

या विषयीं पुष्कळ च लिहिण्यासारखें आहे, पण तो काहीं आपला आजचा विषय नव्हे. असो.

( १४ ) नंतर येते राष्ट्रीय सभा, 'हिंदी लोकांनीं न्याय्य व शांततेच्या मार्गांनीं पूर्ण स्वराज्य मिळविणें हा हिंदी राष्ट्रीयसभेचा उद्देश आहे.' हा देश हिंदूंचा आहे आणि त्यांचा च रहाणार ही विचारसरणी राष्ट्रीयसभेला मान्य नाहीं! हरिकथानिरूपण, राजकारण आणि सावधपण यांपैकीं एक च गोष्ट या सभेंत आहे आणि ती म्हणजे राजकारण पण त्या राजकारणाचा हि कसा विचका होत आहे हें हरघडी पहावयास सांपडत आहे! महात्माजींचा प्रार्थनेवर विश्वास आहे, पण महात्माजींची नेमकी ही च गोष्ट राष्ट्रीयसभेचे सारे लहान थोर सभासद दृष्टीआड करीत असतात! शिवाय हरिभक्ति किंवा प्रार्थना हा काहीं राष्ट्रीयसभेच्या घटनेचा भाग नाहीं. लोकशाही-स्वराज्य-

पक्षाची हि ती च तऱ्हा म्हणतां येईल ! वर्णाश्रम-स्वराज्य-संघाचे नऊ उद्देश आहेत. त्यांपैकीं अर्धा उद्देश असा आहे : "वर्णाश्रम के सिद्धांत को अक्षुण्ण रखते हुए वैध उपायोंसे सकल प्रकार राजनैतिक उन्नति करते हुए यथार्थ स्वराज्य प्राप्त करना।" यांत वर्णाश्रमधर्माला प्राधान्य आहे आणि एवढें च या संघाचें राजकारण आहे, असें फार तर कोणी म्हणावें. या संघाच्या हि घटनेंत हरिभक्तिनिरूपण येत नाहीं आणि सावधपण तर या संघाच्या कानीं हि नाहीं ! या संघांत हिंदु च येतात, पण ते हि सगळे येत नाहींत ! किंबहुना या संघाच्या सभासदत्वाचा जो अर्ज आहे तो पाहिला म्हणजे मनांत येतें कीं, हिंदुहिंदूंत फूट पाडण्यासाठीं च वर्णाश्रम-स्वराज्य-संघाचा जन्म झाला असावा !

(१५) "हिंदु वंश, हिंदु संस्कृति, व हिंदु सभ्यता यांचें संरक्षण व संवर्धन करणें, आणि याकरितां सर्व विधियुक्त मार्गांनीं हिंदुस्थानाला पूर्ण स्वराज्य म्हणजे निर्भेळ राजकीय स्वातंत्र्य न्यायमार्गानें प्राप्त करून घेणें" हें हिंदुमहासभेचें ध्येय आहे; आणि हिंदुमहासभेचे जे दहा उद्देश आहेत ते पाहिले म्हणजे या सभेचा हिंदूंची संघटना करण्याचा हेतु असल्याचें स्पष्ट दिसतें. या सभेजवळ सावधपण हि आहे आणि बॅरिस्टर तात्याराव सावरकर यांच्या कारकीर्दीत ही सभा जास्त जागरूक झाली असल्याचें आढळून येतें. सालोसाल अध्यक्षांची निवड करितांना या सभेनें जास्त काळजी घेतली पाहिजे. कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ कसा होतो याचें प्रत्यंतर या सभेच्या एका माजी अध्यक्षांनीं नुकत्या च पाघळलेल्या प्रलापावरून येण्यासारखें आहे. असो. राजकारण आणि सावधपण या श्रीसमर्थांच्या दोन गोष्टी हिंदुमहासभेजवळ आहेत. हरिकथानिरूपणाचा हि हिंदुमहासभेनें आश्रय करणें आवश्यक आहे. हिंदुमहासभेनें आपल्या चळवळीला भगवंताचें अधिष्ठान मिळविलें पाहिजे.

सामर्थ्य आहे चळवळेचें। जो जो करील तयाचें।
परंतु येथें भगवंताचें। अधिष्ठान पाहिजे ॥ २०-४-२६
ति. सु. १२

( १६ ) बरोबर श्रीसमर्थांची च विचारसरणी राष्ट्रीय-स्वयंसेवक-संघाची आहे. श्रीसमर्थांच्या तिन्हीं हि गोष्टी या संघांत आहेत. संघ या दृष्टीनें आणि संघाच्या नांवाखालीं सामुदायिक रीत्या या संघाचे सभासद—स्वयंसेवक—राजकारणांत पडत नाहींत हें खरें, पण याचा अर्थ असा नव्हे कीं, या संघाच्या स्वयंसेवकांना व्यक्तिशः राजकारणांत भाग घेण्यास कोणाची मनाई आहे. आणि त्याप्रमाणें अनेक स्वयंसेवक राजकारणांतील अनेक क्षेत्रांत यथामति आणि यथाशक्ति भाग घेत आहेत हि. हिंदुमहासभेनें चालविलेल्या भागानगर—निःशस्त्रप्रतिकाराच्या मोहिमेवर गेलेल्या नि.शस्त्रप्रतिकारकांत शेकडा पंचाहत्तर राष्ट्रीय—स्वयंसेवक—संघाचे स्वयंसेवक आहेत म्हणतात. सामुदायिक रीत्या हा संघ राजकारणात पडत नाहीं इतकें च. कोणती हि राजकीय क्रांति होण्यापूर्वी समाजाच्या विचारांत अगोदर क्रांति व्हावी लागत असते; आणि आपली विचारसरणी प्रसृत करण्याचें च कार्य संघ मुख्यतः सध्या करीत आहे. कवाईत आणि शिस्त या गोष्टी तितक्या च महत्त्वाच्या खऱ्या, पण सध्या या संघाचें लक्ष समाजाच्या विचारसरणींत क्रांति करण्याकडे विशेष आहे. हा देश हिंदूंचा आहे, तो हिंदूंचा च राहिला पाहिजे आणि हिंदू च या देशात मालक म्हणून नांदले पाहिजेत, आणि हें घडून येणें हिंदूंच्या शिस्तवार संघटनेवर च मुख्यतः अवलंबून आहे, अशी च या संघाची विचारसरणी आहे. हिंदुधर्म आणि हिंदु संस्कृति यांचें रक्षण करून स्वराज्य मिळविणें हें या संघाचें ध्येय आहे.

( १७ ) हरिभक्ति म्हणजे श्रीसमर्थसंप्रदायाची रामोपासना हि बीजरूपानें या संघांत आहे. रामभक्तांना संकटीं पावण्यासाठीं आपल्या पश्चात् श्रीरामचंद्रानीं मारुतिरायाची योजना केली आहे.

स्वधामासि जातां म्हणे रामराजा ।
हनुमंत तो ठेविला या च काजा ।
सदा सर्वदा रामदासांसि पावे ।
खलीं गांजितां ध्यान सांडूनि धावे ॥ ११४-११३

त्या मारुतिरायांची संघस्थळीं रोज सर्व स्वयंसेवक नियमानें प्रार्थना करीत असतात, आणि मारुतिरायांनीं आपल्याला अंकित करून घ्यावें आणि सारे हिंदु सर्व सद्गुणांनीं संपन्न होऊन रामपंथी व्हावे असें श्रीमारुतिरायांना विनवीत असतात. त्यानंतर 'राष्ट्रगुरु' म्हणून श्रीसमर्थांचें पुण्यस्मरण करून त्यांना अभिवंदन केलें जातें; आणि सरतेशेवटीं महाराष्ट्राच्या आणि महाभारताच्या पुरातन परमपूज्य भगव्या ध्वजाला प्रणाम करण्यांत येत असतो. सावधपणाविषयीं बोलावयाचें तर, या संघाचे बौद्धिक चर्चेचे दिवस शाखाशाखांतून ठरलेले असतात, आणि त्या त्या दिवशीं आणि इतर वेळीं हि सावधानतेची शिकवण स्वयंसेवकांना देण्यांत येत असते. असो.

( १८ ) कोठें काय आहे आणि कोठें काय नाहीं, हें ठोकळ मानाने पहाण्याचा मी प्रयत्न केला आहे. या लेखावर काय आक्षेप घेण्यांत येतील याची मला कल्पना आहे; पण त्यांचा विचार आज च करण्याचें कारण नाहीं असें मला वाटत असल्यामुळें त्याचा ओझरता उल्लेख हि मी येथें केलेला नाहीं, एवढें सांगून श्रीसमर्थचरणीं अर्पण करण्यासाठीं हें सुमन श्रीसमर्थवाग्देवतामंदिराच्या विश्वस्तांच्या स्वाधीन नम्रपणें करितों.

१८६१ ज्येष्ठ शुद्ध १३



( १३ )

## श्रीसमर्थसंघाचें स्वरूप

### ( नामदार दादासाहेब मावळंकर यांचें अध्यक्षीय भाषण )

[ श्रीसमर्थवाग्देवतामंदिराच्या पंचम वर्षारंभसमारंभाच्या वेळीं श्रीरामदासी संमेलन भरविण्यात येऊन श्रीसमर्थसंघ स्थापण्यात आला. त्या प्रसंगीं नामदार ग. वा. मावळंकर यांनीं ता. ३।६।३९ रोजीं केलेल्या अध्यक्षीय भाषणाचा सारांश ]

श्री. नानासाहेब देव, इतर वडील मंडळी आणि बंधुभगिनींनो,

मी आज या ठिकाणीं अध्यक्षपद का स्वीकारलें याचें स्पष्टीकरण सुरवातीसच करणें मला आवश्यक वाटतें. येथें आपल्या सर्वांसमोर येऊन आपल्याला उपदेश करण्याचा माझा अधिकार नाहीं व उपदेश करण्याच्या भूमिकेवरून मी आज बोलत नाहीं. माझे विचार आपल्यापुढें मांडावे असा श्री. नानासाहेबांचा आग्रह असल्यानें मी माझे विचार स्वगतच परंतु आपल्याला ऐकू जाईल इतक्या मोठ्यानें बोलत आहें, एवढेंच.

श्रीसमर्थसंघाची आज सकाळीं जी घटना तयार झाली तिची माहिती श्री. नानासाहेबांनीं आपणांस आताच दिली आहे. हा समर्थसंघ का स्थापन केला, त्याचें ध्येय काय, त्याच्या सभासदांचें कर्तव्य काय वगैरे वार्तांचा खुलासा आपणास झाला असेलच. त्या संबधानेंच चार शब्द मी आज बोलणार आहें.

मी महाराष्ट्रीय आहें याचा मला स्वाभाविकपणें अभिमान वाटतो. महाराष्ट्रीयत्वाची परंपरा टिकविणें हें आपल्यापैकीं प्रत्येकाचें कर्तव्य आहे, असें मला वाटतें. म्हणून महाराष्ट्रीय व महाराष्ट्रीयत्व म्हणजे काय याचा आपण थोडक्यात विचार केला पाहिजे. थोडक्यात सांगावयाचें

म्हणजे कोणतेंही उच्च ध्येय डोळ्यापुढें ठेवून त्या ध्येयाच्या प्राप्तीसाठीं जन्मभर झगडणें, तें ध्येय प्राप्त करण्यासाठीं लागेल तो त्याग करणें, या ध्येयवादित्वांत व त्याबरोबरच झीज सोसण्याच्या तयारींतच महाराष्ट्रीयत्वाचा गाभा ( essence ) आहे असें मला वाटतें. ही परंपरा फार पूर्वापारची आहे व महाराष्ट्रीय मंडळींनीं जो लौकिक व जें प्रेम हिंदुस्थानांत संपादन केलें त्याचें खरें इंगित या प्रकारच्या ध्येयवादित्वांतच आहे. मी इतिहासकार नाहीं, पण मला जो काय थोडासा मराठी इतिहास समजतो त्यावरून माझी समजूत अशी झालेली आहे कीं, नर्मदा नदी ओलांडून मराठे उत्तरेकडे गेले ते साम्राज्यलालसेनें गेले नसून ध्येयवादित्वानें, आपल्या धर्मबांधवांस संकटांतून सोडविण्यासाठीं गेले. अर्थात् अशा प्रकारची जबाबदारी अंगावर घेतांना त्यांना कांहीं अधिकार गाजवावे लागले. परंतु त्यांतील मुख्य हेतु आपलीं तीर्थक्षेत्रें परकीयांच्या हातून सोडविणें व आपल्या परप्रांतीयस्थ धर्मबांधवांस आपल्या धर्माचें अविच्छिन्नपणें आचरण करतां यावें हा होता. हल्लीं ज्याप्रमाणें युरोपियन लोकांनीं जगांत स्वतःच्या फायद्यासाठीं दुसऱ्यांवर आक्रमण करण्याचा सपाटा चालविला आहे तशा कोणत्याही प्रकारची भावना मराठ्यांच्या उत्तरेकडच्या मुलुखगिरींत पूर्वी नव्हती. ती मागाहून आली होती किंवा नाहीं हा प्रश्न अनावश्यक आहे. सेवाबुद्धीनें व स्वतः त्रास व दुःख सोसूनही धर्मावरील संकटें दूर करण्याच्या सद्हेतूनें त्यांनीं उत्तर हिंदुस्थानांतील राजकारणासाठीं कष्ट सोसले. हें ध्येयवादित्व म्हणजेच महाराष्ट्रीयत्व. काशीमध्यें महाराष्ट्रीय पंडितांनीं आपली जी छाप बसविली, परप्रांतांतही महाराष्ट्रीय मंडळींनीं वेळोवेळीं आपली जी छाप बसविली, त्यांत त्यांचा "ध्येयवादित्व हेंच महाराष्ट्रीयत्व" हाच बाणा दिसून येतो. अहमदाबादेस कै. गोपाळराव हरि देशमुख ऊर्फ लोकहितवादी, कै. प्रो. आबाजी विष्णु काथवटे, कै. गोविंदराव पाटील वगैरे नांवें अजही ज्या गुणांमुळें किंवा ज्या गुणसमुच्चयामुळें आदरपूर्वक ऐकूं येतात त्या गुणांचा समुच्चय म्हणजेच महाराष्ट्रीयत्व अशी माझी महाराष्ट्रीयत्वाची व्याख्या आहे.

अशा महाराष्ट्रीयत्वाची आमची ही परंपरा हल्लीं सुटत चालली आहे, यांत मला वाटतें मतभेद नाहीं. ती कशी टिकवावी व तिचें संवर्धन कसें करावें याची विवेचना, हा प्रत्येक महाराष्ट्रीयापुढें आज प्रश्न आहे व समर्थसंघ स्थापन करण्यामध्यें तो एक प्रधान हेतु आहे. "मराठा तितुका मेळवावा। महाराष्ट्रधर्म वाढवावा" यांत भौगोलिक महाराष्ट्राचाच समावेश होत नसून मी आतांच सांगितल्याप्रमाणें महाराष्ट्रीयत्वाचा अभिमान बाळगणाऱ्या सर्वांचाच समावेश होतो.

आज आपण आपल्या एकंदर परिस्थितीची थोडक्यांत पाहाणी करूं या. आज आपणांस सर्व प्रकारें आपल्या समाजांत एकप्रकारची *कळाहीनता आलेली दिसत आहे. आर्थिक दृष्ट्या आपली स्थिति* दिवसेंदिवस खालावत चालली आहे. बेकारीचें भूत वाढत आहे. मतामतांचा गलबला अतिशय झाला आहे. स्वातंत्र्याच्या नांवानें स्वच्छंदीपणाचा धिंगाणा चालू आहे. नीतिमत्तेच्या कल्पना बदलत आहेत. सत्याची चाड कमी कमी होत आहे. परस्पर अविश्वास वाढत आहे. गुरु–शिष्य, बंधु–भगिनी, पति–पत्नी यांचे, मित्रांचे व कुटुंबीयांचे वगैरे परस्पर संबंध जितक्या स्नेहाचे किंवा प्रेमाचे असावे तितके न *दिसतां, आर्थिक या स्वार्थी दृष्टीची छाप त्यांच्यावर जास्त जास्त पडत* चालली आहे. आपलें वाङ्मय ज्या प्रकारचें व जसें तेजस्वी पाहिजे तसें तें निपजत नाहीं. आपल्यांमध्यें अनेक पक्षभेद, मतभेद, स्पृश्यास्पृश्य भेद, वर्ग–भेद वगैरे थैमान करून राहिले आहेत. आपल्या समाजांत एक प्रकारचा विस्कळितपणा व शिथिलता आलेली आहे. हें माझें वर्णन कदाचित् आपणांस केवळ कल्पना च वाटण्याचा संभव आहे. ती तशी ठरली तर मला आनंद च होईल. परंतु मी मुद्दाम कोणतीही अतिशयोक्ति *किंवा कल्पना करीत नाहीं एवढें च आपणांस सांगतों.*

अशा वेळीं आपण काय केलें पाहिजे, कोणत्या उपायांचा अवलंब केला असतां सर्व जनता ही पूर्वीसारखी कार्यक्षम होईल, हे विचार आपल्या डोळ्यांपुढें येतात व या प्रश्नाचें व्यापक स्वरूप पाहून,

पूर्वी असे प्रसंग महाराष्ट्रांत केव्हां आले होते किंवा काय, आले असल्यास महाराष्ट्रीयांनीं त्या वेळीं काय केलें, व कोणत्या उपायानें आपली उन्नति करून घेतली यांकडे साहजिकच आपलें लक्ष जातें. मागचा इतिहास पहावासा वाटतो व शिवपूर्वकाल, शिवकाल व श्रीसमर्थांचें चरित्र डोळ्यांपुढें उभें राहातें.

समर्थकालीन लोकस्थितीचें वर्णन समर्थांनींच आपल्या भाषेंत ठळठळीत ( Vivid ) केलें आहे. समर्थ म्हणतात " नीतिमत्ता उडाली । भक्ति देवाची बुडाली ॥ ", " लोक दोष आचरती । तेणें दोषें भस्म होती ॥ ", " लोक मिणधें चि चालती । त्यांसी होताती विपत्ति ॥ ", " नाहीं ज्ञानाचा विचार । केला अज्ञानें संचार ॥ ", " मनीं आलें तें बोलती । चालों नये तें चालती ॥ ".

हल्लींच्या स्थितीशीं ही स्थिति पुष्कळशी जुळती येते कां ? लोक कां भस्म होतात ? अधोगतीस कां जातात ? तर समर्थ म्हणतात कीं, " लोक दोष आचरती ". दुसरें कोणीही येऊन आमचें " भस्म " करीत नाहीं, तर आपणच दोषाचरण करतों. तसेंच " लोक मिणधींचि चालती ", ज्ञानाचा विचार करीत नाहींत, त्याचप्रमाणें " मनीं आलें तें बोलती " व " चालों नये तें चालती ". एकंदरींत असें आपल्याला दिसून येईल कीं सुमारें तीनशें वर्षांपूर्वीच्या स्थितींत व आजच्या या स्थितींत काळाचें अंतर असलें व बाह्य स्वरूपांत कालमानेंकरून जरी फरक पडलेला असला तरी सुद्धा दोन्हीं काळची परिस्थिति जवळ जवळ एकच दिसते, असें म्हणावयास हरकत नाहीं.

ही आमची स्थिति कशामुळें आली या विषयांत मी आतां शिरूं इच्छित नाहीं. तो माझ्या भाषणाचा विषयही नाहीं. राजकीय सत्ता आपल्या हातीं नसल्यानें आपण या हीन स्थितीला पोंचलों आहोंत असें सांगण्यांत येतें, तें पुष्कळ अंशीं खरें आहे. परंतु आमच्या हातांत राजकीय सत्ता जेव्हां होती तेव्हां ती गेली अथवा घालविली कशी व कां,

या प्रश्नाचाही त्याचबरोबर विचार करावयास नको का ? केवळ त्या विचारानें गेलेली राजकीय सत्ता परत प्राप्त होईल असें नाहीं. पण ज्या गुणानीं आमची राजसत्ता आम्हीं घालविली तेच गुण आजही जर आमच्या अंगांत टिकून राहिलेले असतील तर ती गेलेली राज्यसत्ता परत कशी येणार ? असो. मी आज राजकारणात शिरू इच्छित नाहीं. तरी पण राजकारण आणि समाजकारण हीं एकमेकांशीं संबंध नसलेलीं व अगदीं अलिप्त अशीं राष्ट्रपुरुषाचीं अंगें नाहींत ही मूळ मुद्याची गोष्ट आपण लक्षांत ठेविली पाहिजे. आपण काहीं बाबींना आर्थिक समजतों, काहीं बाबींना राजकीय समजतों तर काहीं गोष्टी आपण वाङ्मयीन आहेत असें समजतों. या प्रमाणें जरी आपल्या जीवनाशीं संबंध येणाऱ्या निरनिराळ्या गोष्टींचे निरनिराळे विभाग आपण पाडले तरीही त्या सर्वांचा परस्परांशीं इतका निकट संबंध असतो कीं, आपणास त्यांचा पृथक्त्वानें विचार करून चालावयाचें नाहीं. उदाहरण देऊनच स्पष्ट करावयाचें झालें तर अस्पृश्यता ही बाब आपण घेऊ या. सामाजिक न्यायाच्या दृष्टीनें आपण या प्रश्नाकडे पाहिलें किंवा धार्मिक दृष्टीनें पाहिलें तरी हा प्रश्न केवळ सामाजिक किंवा धार्मिक आहे असें आपल्याला म्हणता येणार नाहीं. हा प्रश्न तितकाच किंबहुना जास्त राजकीय स्वरूपाचा झालेला आहे. काहीं काळानें समाजात प्रगति झाल्यावर या प्रश्नाचें राजकीय महत्व कमी होईल हेंही उघड आहे. स्वदेशी माल घेण्याचा प्रश्न केवळ आर्थिक राहाणें शक्य नाहीं. जरी त्याचा उगम आर्थिक बाबींतच असला तरी त्यास राजकीय बाजू केव्हांना केव्हां येणारच. वेळोवेळींच्या महत्वमापनाप्रमाणें निरनिराळ्या बाबी राजकीय, सामाजिक, आर्थिक वगैरे स्वरूपात आपल्याला दिसत असल्या तरी त्या सर्वांचें स्वरूप राष्ट्रीय संघटनेच्या दृष्टीनें एकच आहे. असो.

समर्थकालाच्या पूर्वी कित्येक शतकें महाराष्ट्रात परधर्मीयांचें राज्य होतें. धार्मिक भावनांचा पगडा जनतेच्या मनावर विशेष होता आणि जसें हल्लींचें युग हें एकप्रकारें व्यापारी युग म्हणता येईल तसें त्या वेळचें

युग धर्मभावनेचें होतें, असें म्हणता येईल धर्मावरील श्रद्धा व धार्मिक भावना यांचें साम्राज्य त्या वेळच्या जनतेवर होतें. परधर्मीयांचें धर्मावर आक्रमण होत होतें तरी आर्थिक शोषण किंवा आक्रमण होत नव्हतें. आपल्या संस्कृतीचा व धर्माचा टिकाव कसा लागेल याची विवंचना समर्थकालाच्या पूर्वी कित्येक शतकें महाराष्ट्रीय संतांनीं केलेली होती व लोकांमध्यें नीति वाढली पाहिजे, परमेश्वरावरील श्रद्धा अढळ राहिली पाहिजे, चारित्र्य व शील यांचा उत्कर्ष झाला पाहिजे तरच परकीयांच्या आक्रमणापुढें आपल्याला टिकाव धरता येईल, ही गोष्ट ओळखून संतांनीं मराठी भाषेच्या द्वारा आपलें प्रचारकार्य सुरू करून लोकांस पुढें येणाऱ्या स्वराज्यासाठीं एकप्रकारें तयार केलें असें म्हणावयास हरकत नाहीं समर्थांच्या पूर्वींच्या संतांनीं जरी प्रत्यक्ष राजकारणाची भाषा वापरली नव्हती तरीहि जित समाज राजकारणासाठीं म्हणजे च आपलेपणा व संस्कृति यांचे रक्षणास तयार होण्यासाठीं त्याचें नैतिक बळ वाढलें पाहिजे व ती भूमिका बरोबर तयार केली पाहिजे ही दृष्टी त्यास नव्हती असें मात्र म्हणता येणार नाहीं मराठी भाषेच्या उपयोगाची आवश्यकता ओळखून मराठीच्या द्वारा हिंदु धर्माचें तत्त्वज्ञान जनतेस घरोघर पोंचविण्याचें कार्य श्रीज्ञानेश्वर महाराजांपासून तुकोबारायापर्यंत सर्व संतांनीं एका च रीतीनें केलेलें आहे. काहीं मंडळींना या संतमंडळींच्या कार्याचा खरा रोख व महत्त्व न कळल्यामुळें ते यांना " टाळकुटे " व " संताळें " असा उपहासपूर्वक नांवानें कधीं कधीं संबोधतात ! परंतु श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं ज्ञानेश्वरी ऊर्फ " भावार्थ-दीपिका " हा ग्रंथ कां लिहिला ? गीतेंतील मुख्य तत्त्वज्ञान या ग्रंथातून मराठी वाचकांपुढें साध्या व सरळ भाषेंत मांडलें व त्या तत्त्वज्ञानाचा प्रचार केला ही काय लहान सहान कामगिरी आहे ? गीता च त्या वेळीं त्यांनीं कां पसंत केली ? कर्मयोगाच्या विवरणाची आवश्यकता वाटल्यावरूनच त्यांनीं गीता ग्रंथ हातीं घेतला नसेल काय ? तें काहीं असो, परंतु परमेश्वरावर विश्वास, सत्यनिष्ठा वगैरे ज्या सद्गुणाची समाजाच्या

एकीकरणास व संघटनेस आवश्यकता आहे अशा गुणांच्या आचरणांचें महत्व लोकांस पटवून देऊन त्यांनीं सामान्य जनतेचें शील व चारित्र्य दोन्हीं वाढविलीं नाहींत काय? पाश्चात्यांच्या हल्लींच्या राष्ट्रीयत्वाच्या भावनेंत जो जोरकसपणा आहे व त्या भावनेसाठीं हजारों तरूण आज मरावयास तयार आहेत तशा तऱ्हेनें आपल्या संस्कृतीच्या व धर्माच्या रक्षणासाठीं आपल्या प्राणांविषयीं बेफिकीरी आणि मरण्याची तयारी या संतमंडळींनीं लोकांत उत्पन्न केली नव्हती काय? सामान्य जनतेची अशा तऱ्हेची तयारी जर नसती तर शिवकाळीं सामान्य जनतेकडून जें साहाय्य मिळालें तें मिळणें शक्य झालें असतें काय? श्रीसमर्थांनीहि तोच मार्ग पत्करला. भूमीची मशागत तयार झालेली आहे हें पाहून जनसंघटनेची शक्ति त्यांनीं राजकारणाकडे वळविली. हा समर्थांचा विशेष होय.

या बाबतींत समर्थ आणि इतर संत यांची तुलना करणें केव्हांही बरोबर होणार नाहीं. देशकालवर्तमान परिस्थिति पाहून त्या वेळीं जें योग्य तेंच मोठीं माणसें नेहमीं करतात. जनतेची अमुक प्रकारची तयारी आहे हें पाहून अमुक पाऊल टाकावें हें समर्थांनीं ठरविलें किंवा जनतेमध्यें असलेल्या शक्तीचा अमुक रीतीनें उपयोग करावा असें त्यांनीं ठरविलें याचें मुख्य कारण म्हणजे पूर्वी झालेल्या संतांनीं तयार केलेली भूमिका होय असेंच मला वाटतें. समर्थ झाले त्याच्या आधीं २०० वर्षांपूर्वी झाले असते तर त्यांनीं त्या वेळच्या संतांनीं जें केलें त्याप्रमाणेंच केलें असतें व त्या काळचें संत जर समर्थकालीं झाले असते तर त्यांनीं समर्थांप्रमाणेंच केलें असतें. दोहोंच्या विचारसरणींतील किंवा कृतींतील सामान्य तत्त्व एकच आहे. आणि तें म्हणजे जनतेचें शीलवर्धन आणि संघटन, जनतेची जागृती, आणि त्यांचा उपयोग जीवनांत करतां येईल तितका जास्त करून आपली संस्कृति व धर्म रक्षणा हेंच होतें. समर्थांना तरी स्वराज्य कशाला पाहिजे होतें? " उदंड जाहलें पाणी। स्नानसंध्या करावया " असें समर्थ म्हणतात.

याचा पाहिजे तर शब्दशः अर्थ करावा, परंतु याचा खरा अर्थ असा आहे कीं, आमची जी संस्कृति आहे व तिला पोषक असे आमचे आचार आणि विचार त्यांच्यासाठीं जी शांति, समृद्धि आणि रक्षण पाहिजे तें मिळविण्यासाठीं स्वराज्याची खटपट होती. असो. तात्पर्य हें कीं, श्रीसमर्थांनीं चारित्र्यशील महाराष्ट्रीय पाहून त्यांचा शिष्यवर्ग तयार केला व त्यांचा राजकारणाकडे उपयोग केला. सर्व महाराष्ट्रभर " वन्ही " चेतवला. समर्थांनीं जी कांहीं शिकवण सांगितली त्यांत " भगवंताचें अधिष्ठान पाहिजे, " " हरिकथा निरूपण पाहिजे " ही बैठक आहे. आणि त्यांच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे त्यांनीं पुढील गोष्ट आपल्या शिकवणीची गुरुकिल्ली म्हणून सांगितली आहे.

शरण जावें संतजनां । सत्य मानावें निर्गुणा ॥
नानामतीं काय चाड ? । करणें सत्याचा निवाड ॥

संतांस शरण जाऊन, निर्गुणास सत्य मानून, सत्यनिष्ठ व्हा असा हा उपाय त्यांनीं लोकांच्या अवनतीचें निदान करून सांगितला होता. तें निदान तरी कोणतें होतें ? तर " नीतिमर्यादा उडाली ", " लोक दोष आचरती, " " लोक मिणधेंचि चालती, " " मनीं आलें तें बोलती " " चालो नये तें चालती. " थोडक्यांत तात्पर्य सांगावयाचें तर हेंच कीं, आमच्यांत सत्यनिष्ठा, नीतिमत्ता हीं पाहिजेत त्याशिवाय आमचा उद्धार होणें शक्य नाहीं. आम्हांला स्वराज्य त्याशिवाय प्रस्थापित करता येणार नाहीं आणि टिकविता येणार नाहीं.

आज आपण या दृष्टीनें महाराष्ट्राकडे पाहिलें तर आपल्याला काय स्थिति दिसून येते ? सदाचिरुचि, सत्यनिष्ठा व सामान्य सभ्यता या गुणांस सुशिक्षितात ओहोटी लागल्यासारखी दिसते. असा दुर्धर प्रसंग ओढवलेला आपल्याला दिसत नाहीं काय ? आज महाराष्ट्रांत अशी एक तरी भावना शिकलेल्या जनाच्या मनामध्यें आहे काय ? कीं, त्यासाठीं ही महाराष्ट्रीय मंडळी अहमहमिकेनें व मोठ्या प्रमाणांत आपलें प्राणार्पण करावयाला तयार होतील ? ही तत्त्वनिष्ठा आहे काय ?

सत्यनिष्ठेशिवाय संघटना किंवा तत्वनिष्ठा ही आपल्याला साध्य करतां येईल काय ? या प्रश्नाचीं उत्तरें मी दिलींच पाहिजेत असें नाहीं. आपण प्रत्येकानें जिव्हाळ्याच्या बुद्धीनें याचा विचार करावा.

या सर्वांचा विचार केला तर समर्थांनीं त्या काळीं सांगितलेला मार्ग तोच आताहि आमचा मार्ग आहे. समर्थांनीं संसारत्याग करावयास सांगितलें नाहीं.

" आधीं प्रपंच करावा नेटका । मग घ्यावें परमार्थ विवेका ॥ "

ज्याला नीट प्रपंच करता येत नाहीं त्याला परमार्थ तरी कसा साधता येणार ? परंतु प्रत्येक बाबतींत भगवंताचें अधिष्ठान पाहिजे, नीतिमत्ता पाहिजे, या भूमिकेवर आपला जीवनव्यवहार बसविला पाहिजे. ऐहिक स्थितींत पारमार्थिक तत्वज्ञान कसें उपयोगात आणावें व ऐहिक द्वारा परमार्थ कसा साधावा हाच उपदेश सोप्या आणि सरळ भाषेंत समर्थांनीं केला आहे, आणि आचरणावर, कर्मावर भर दिला आहे. समाजास सामर्थ्यवान् बनविणें असल्यास समाजातील प्रत्येक व्यक्तीनें समर्थ बनलें पाहिजे. म्हणजे आचरण शुद्ध ठेविलें पाहिजे; ईशभक्ति आणि सत्यनिष्ठा हीं आचरणात आणलीं पाहिजेत. आज या दृष्टीनें प्रत्येक महाराष्ट्रीय समर्थभक्त किंवा रामदासी होऊं शकेल तर इतर गोष्टी आपोआपच होणार आहेत. समर्थसंघानें अमुक अमुक करावें असा उद्देश घटनेंत लिहिण्याचें कांहीं कारण नाहीं. संघाच्या प्रत्येक समासदानें सत्यनिष्ठ आणि चारित्र्यशील असें आचरण ठेवावें. एवढी एकच गोष्ट जर आपणाला या संघामार्फत साधता आली तर या संघाच्या संघटनेपासून जी शक्ति निर्माण होईल ती शक्ति आपोआपच इतर पुष्कळ कर्में करूं शकेल व म्हणूनच या संघामध्यें आचारावर जास्त जोर दिला आहे. जोरकस प्रचारास आचार हाच एक उपाय आहे. नुसत्या उच्चारानें प्रचार जोरकस न होतां उलट हिणकस होण्याची भीति आहे व म्हणून या संघस्थापनेचा उद्देश श्रीसमर्थांच्या तत्वांचा नुसता विचार करणें एवढा च नसून तदनुसार आचार घडला पाहिजे, असा

योजिला आहे. यावरून आपल्याला सहज समजेल कीं, हा संघ पक्षातीत आहे कोणतीहि विशिष्ट चळवळ करावी या उद्देशानें हा संघ स्थापन झालेला नसून प्रत्येक सभासदानें सदाचरणी सत्यनिष्ठ व्हावें एवढ्या च प्रमुख हेतूनें या संघाची स्थापना झालेली आहे.

समर्थकृपेनें आपण सर्व समर्थांची शिकवण आचरणात आणण्यास योग्य होऊं अशी प्रार्थना करून मी माझें भाषण पूर्ण करितों.



( १४ )

# स्वराज्याच्या महामंत्राचे आद्यगुरु श्रीसमर्थ

( लेखक — रा. अनंत विश्वनाथ टिळक,
बी. ए., एल् एल्. बी., वकील, धुळें )

श्रीसमर्थांच्या चरित्रास दोन अंगें आहेत. एक पारमार्थिक व दुसरें लौकिक. या दोन्हीं अंगांचा विचार झाल्याशिवाय श्रीसमर्थांचें चरित्र यथार्थरीतीनें व पूर्णपणें आपल्या हस्तगत होणार नाहीं. परंतु चरित्राच्या या दोन्हीं अंगाकडे पाहण्याच्या दृष्टींत भेद आहे. पारमार्थिक चरित्राचा अभ्यास श्रद्धेनें च होणें जरूर आहे. श्रीसमर्थ थोर अधिकाराचे सत्पुरुष होते.

जया अंतरीं भगवंत । अचळ राहिला निवांत ।
तो स्वभावें जें बोलत । ते ब्रह्मनिरूपण ॥ १४-३-२५

या वचनात सांगितलेल्या अधिकाराचे ते थोर भगवत्भक्त होते. अर्थात् परमार्थाचे सद्गुरु या भावनेनें च त्यांच्या पारमार्थिक चरित्राचें अध्ययन दृढ श्रद्धेच्या दृष्टीनें च होणें अवश्य आहे. परंतु त्यांच्या लौकिक चरित्राचा अभ्यास विवेचक व चिकित्सक अशा ऐतिहासिक दृष्टीनें च झाला पाहिजे. श्रीशिवाजी महाराजांसारख्या ऐतिहासिक पुरुषांचें चरित्र ज्या दृष्टीनें आपण पाहतों त्याच दृष्टीनें श्रीसमर्थांच्या लौकिक चरित्राचें अध्ययन होणें जरूर आहे व या दृष्टीनें लौकिक चरित्राकडे पाहत असतां श्रीसमर्थ हे परमार्थदृष्ट्या थोर सत्पुरुष होते ही गोष्ट असंबद्ध म्हणून त्यावेळेपुरती बाजूस ठेऊन चालणें जरूर आहे. कारण या ऐतिहासिक दृष्टींत श्रद्धेचा व भाविकपणाची दृष्टि विघातक आहे.

श्रीसमर्थांच्या लौकिक चरित्राचा अभ्यास अशा चिकित्सेनें केल्याशिवाय त्यांच्या अवतारकार्याचें खरें स्वरूप, मर्म व महत्त्व आपल्या लक्षांत येणार नाहीं.

श्रीसमर्थांनीं आपल्या उपास्य देवतेच्या चरित्रासंबंधानें हि हीच दृष्टि स्वीकारली होती. श्रीरामचंद्र म्हणजे निर्गुण, निराकार, परमात्म स्वरूप। परंतु आपल्या शिष्यास श्रीरामचंद्राचें हें तात्त्विक स्वरूप सांगून न राहतां "अनेक बंध तोडिले। समस्त देव सोडिले॥" अशा च रीतीनें श्रीरामचरित्राचें वर्णन श्रीसमर्थांनीं लौकिक दृष्टीनें केलें आहे. थोर पुरुष त्या वेळेला असलेल्या परिस्थितींत कांहीं विशिष्ट कार्य करण्याकरिता अवतार घेत असतात. अर्थात् त्या विशिष्ट परिस्थितीच्या संदर्भात त्याच्या विशिष्ट कार्यांचा अभ्यास केल्याशिवाय त्या थोर पुरुषानें त्या काळांत व परिस्थितींत कोणतें विशिष्ट कार्य संपादन केलें, हें लक्षांत येणार नाहीं. व म्हणून च श्रीसमर्थांच्या लौकिक चरित्राचा अभ्यास लौकिक दृष्टीनें च म्हणजे ऐतिहासिक दृष्टीनें केल्याशिवाय त्यांच्या चरित्राचें मर्म व महत्त्व आपल्या लक्षांत येणार नाहीं.

श्रीसमर्थ जसे थोर सत्पुरुष होते, तसेंच ते जनतेचे थोर पुढारी, क्रांतिकारक विचाराचे प्रवर्तक व थोर कार्यकर्ते होते. परंतु त्यांच्या पारमार्थिक चरित्रावर च आपली दृष्टि अद्यापपर्यंत खिळलेली दिसते. या पारमार्थिक दृष्टीखालीं ऐतिहासिक दृष्टि झाकून गेल्यासारखी व दाबल्यासारखी झाली आहे श्रीसमर्थांचीं चरित्रें प्रथम त्यांच्या शिष्यांनीं व सांप्रदायिकांनीं लिहिलीं. या आद्य चरित्रकाराची श्रीसमर्थांच्या चरित्राकडे पाहण्याची दृष्टि अर्थात् धार्मिक सांप्रदायिकपणाची होती. हल्लींच्या काळांत हि त्याच्या च दृष्टीनें आपण समर्थांच्या चरित्राकडे बहुश: पाहत आहों. श्री. नानासाहेब देव यांनीं श्रीसमर्थांच्या चरित्राविषयीं व ग्रंथाविषयीं प्रचंड जागृतीचें कार्य केलें आहे. त्यांच्या चरित्रांतील व ग्रंथांतील अनेक प्रश्नांची चर्चा करण्याचें कार्य श्री. देव यांच्या

प्रोत्साहनानें गेली कांहीं वर्षे होत आहे. परंतु या चर्चेचे विषय पाहिले म्हणजे त्यांच्या चरित्राकडे आपण अद्याप केवळ पारमार्थिक व भाविक दृष्टीनें च कसें पाहत राहिलों आहों, हें लक्षांत येतें. चर्चेच्या विषयात " परंतु येथें भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ॥ " म्हणजे काय, " देव पूजावा विमळ हस्तीं । " म्हणजे काय, श्रीसमर्थांच्या चरित्रांत जे अनेक चमत्कार वर्णन केले आहेत, ते हल्लींच्या विसाव्या शतकाच्या विज्ञान दृष्टीच्या काळात हि कसे श्रद्धेय आहेत, या च प्रश्नांची चर्चा मुख्यत्वेंकरून झालेली दिसते. परंतु पारतंत्र्यामुळें निस्तेज व थंड पडलेल्या महाराष्ट्राच्या शरीरांत तेज व ऊब उत्पन्न करण्याचा जो अद्‌भुत चमत्कार श्रीसमर्थांनीं करून दाखविला, इकडे आपलें अजून जावें तसें लक्ष जात नाहीं. या चमत्काराची आपणास कल्पना नाहीं, असें नाहीं; परंतु ती अद्याप अनिश्चित व मोघम आहे: कारण परमार्थाच्या व भाविकपणाच्या दृष्टीचें दडपण काढून टाकून ऐतिहासिक दृष्टीनें समर्थचरित्राचा विचार आपण अद्याप केला नाहीं.

श्रीसमर्थांच्या चरित्राचा अभ्यास करावयाचा तो हि पूर्वीच्या सतराव्या शतकाच्या भूमिकेवरून न करतां समाजशास्त्राच्या बहुविध अंगांच्या अध्ययनानें विसाव्या शतकांत जी ज्ञानाची भूमिका आज आपणांस प्राप्त झाली आहे, त्या भूमिकेवरून च करणें जरूर आहे. आपल्या काळाहून समर्थ इतके उंच होते कीं, सतराव्या शतकाच्या भूमिकेवरून त्यांच्या चरित्राकडे आपण पाहूं लागलों तर त्यांच्या चरित्राच्या उंचीची व महत्त्वाची कल्पना हि आपणास येणार नाहीं. श्रीसमर्थांनंतर आपली अवनति होत चालली आहे, असें मानणारा मी नाहीं. गेले दीड शतक आपण पारतंत्र्यात असलों तरी गेल्या दोन तीन शतकांत ज्ञानाची व शास्त्राची जी सर्वतोपरी वाढ झाली आहे, त्याचा लाभ आपणांस मिळाला आहे. समाजाचा उद्धार व अवनति कशानें होते, समाजात मोठी क्रांति कोणत्या मार्गानें घडून येते, समाजाच्या जीवनात राजकारणाचें महत्त्व किती आहे, वगैरे विषयासंबंधीं

गेल्या तीन शतकांत आपल्या ज्ञानांत अतिशय भर पडली आहे. व या ज्ञानाच्या उच्च भूमिकेवरून समर्थांच्या चरित्राकडे आपण पाहिलें म्हणजे च तें चरित्र किती थोर आहे, याची आपणांस यथार्थ कल्पना येते. व समर्थचरित्राचें वैभव हें च कीं, या नवीन मिळालेल्या शास्त्राच्या दृष्टीनें जसा जसा त्यांच्या चरित्राचा आपण अभ्यास करावा, तसातसा त्याच्या चरित्राचा भव्यपणा व विशालपणा आपल्या नजरेंत भरूं लागतो.

श्रीसमर्थांच्या चरित्राचें ऐतिहासिक दृष्टीनें मनन करण्याचें दुसरें हि एक कारण आहे. ग्रन्थकार आपल्या ग्रन्थाच्याद्वारें आपला आत्मा व्यक्त करीत असतो. व म्हणून ग्रन्थकाराचे स्वभावविशेष, त्याच्या कार्याचें स्वरूप वगैरेवरून ज्याप्रमाणें ग्रंथाचा अर्थ लावण्यास मदत होते, त्याचप्रमाणें उलट पक्षीं ग्रंथावरून ग्रंथकाराच्या कार्याचें, स्वभावाचें व प्रकृतीचें स्वरूप आपल्या लक्षांत येते. श्रीसमर्थांकडे केवळ सत्पुरुष या नात्यानें पाहिल्यामुळें व त्याच्या लौकिक चरित्राकडे द्यावें तितकें लक्ष न दिलें गेल्यामुळें त्याच्या ग्रंथातील अनेक वचनांचें खरें स्वरूप व महत्त्व आपल्या लक्षांत येत नाहींसें झालें आहे. ज्या दिव्य वचनांनीं, आपल्या तेजानें, सतराव्या शतकात महाराष्ट्रांत राष्ट्रभक्तीचा वणवा पेटविला त्या वचनांतील तेज परमार्थाच्या थंड दृष्टीनें आपण त्याच्याकडे पाहत असल्यामुळें आपल्या प्रत्ययास येईनासें झालें आहे. ज्या परिस्थितींत तीं वचनें निर्माण झालीं, त्या परिस्थितीचा संदर्भ लक्षात घेऊन जर आपण त्या वचनांचें मनन केलें, तर च त्या वचनाचें खरें मर्म आपल्या लक्षांत येणें शक्य आहे. अर्थात् समर्थवाङ्मयाचा व्यासंग उत्तम रीतीनें व्हावयाचा असल्यास त्याच्या लौकिक चरित्राचा, ऐतिहासिक दृष्टीनें, अभ्यास होणें जरूर आहे.

श्रीसमर्थांनीं सतराव्या शतकात मराठ्याच्या इतिहासांत कोणतें विशिष्ट कार्य केलें, व त्या वेळेच्या राजकारणात त्याचें स्थान कोणतें, या मुख्य विषयाचा विचार करण्यापूर्वी कांहीं इतिहासाचें सिद्धांत लक्षात

ठेवणें जरूर आहे. कारण त्या सिद्धांताच्या योगानें च वरील मुख्य विषयाचा विचार आपणास करता येईल.

गेल्या तीन शतकात अनेक मोठमोठ्या क्रांत्या झाल्या. फ्रान्सची राज्यक्रांति, इटलीचें स्वातंत्र्य–युद्ध, अलिकडील रशियातील समाजसत्तेची क्रांति, या तीन क्रांत्या आपण पाहिल्या. या तिन्ही क्रांत्यांचा इतिहास आपण पाहिला तर, क्रांति कशी घडून येते, त्याचा मार्ग आपल्या लक्षात येईल. क्रांति प्रत्यक्ष घडण्यापूर्वी प्रथम क्रांतिकारक नवीन विचार निर्माण होतात. समाज अवनतीस गेला व समाजाची स्थिति दुःखमय झाली म्हणजे ही अवनति कशानें झाली व समाजाचा उद्धार कशानें होईल, याचा विवेक विचारी पुरुष करूं लागतात व त्यावरून च समाजास उद्धारक असे नवीन क्रांतिकारक विचार निर्माण होतात आणि या नवीन विचाराचा प्रसार होतो. तापलेली जमीन ज्याप्रमाणें तानडतोब पाणी शोषून घेते, त्या न्यायानें दुःखी जनता सुखाच्या उत्कटेनें या नवीन विचाराचा स्वीकार करिते व या विचारास उत्कटता प्राप्त झाली म्हणजे स्फोट होऊन क्रांति निर्माण होते. वरील कोणत्या हि क्रांतीचा इतिहास पाहिला तरी ती घडून येण्याचा हा च मार्ग आहे, हें लक्षात येईल. म्हणून कोणत्या हि क्रांतीचा इतिहास आपणास पहावयाचा असेल तर ज्यानीं नवीन क्रांतिकारक विचार निर्माण केले व त्याचा प्रसार केला, त्याच्या कार्याचा परामर्श घेतल्याशिवाय व त्यास योग्य तें स्थान दिल्याशिवाय कोणत्या हि क्रांतीचा इतिहास पुरा होऊं शकत नाहीं. फ्रान्सच्या राज्यक्रांतीच्या इतिहासास बॅस्टिल किल्ला जमीनदोस्त केला व सोळाव्या लुईचा वध केला, वगैरेसारख्या प्रगट प्रसंगानीं पूर्णता येत नसून या प्रसंगाचेपूर्वी व्हॉल्टेअर, डिडरो, रूसो वगैरे विचारप्रवर्तकानीं जे नवीन विचार निर्माण केले, त्याच्या कार्याचा परामर्श घेणें जरूर आहे. इटलीच्या स्वातंत्र्ययुद्धाचा इतिहास गॅरिबाल्डीनें रणभूमीवर ऑस्ट्रियाचा पराभव केला एवढ्यानें पुरा होत नसून मॅझिनीनें इटलियनांच्या

तत्वाचा जो पुरस्कार व प्रचार केला त्याचें महत्व लक्षांत घेणें जरूर आहे. तसें च रशियन राज्यक्रांतीत कामगारांची सत्ता स्थापन होण्यापूर्वी टॉलस्टॉय, टरजीनीफ्, डेटोस्की, लेनिन वगैरे ग्रंथकारांच्या कार्याचें महत्त्व लक्षांत घेणें जरूर आहे. सारांश, कोणत्या हि क्रांतीच्या इतिहासांत क्रांतिकारक विचार निर्माण करणाऱ्यांच्या कार्यास योग्य तें स्थान दिल्याशिवाय त्या क्रांतीचा इतिहास पूर्ण होऊं शकत नाहीं. व हें तत्त्व लक्षांत ठेऊन महाराष्ट्राच्या इतिहासांत श्रीसमर्थांचें कार्य काय आहे, याचा विचार करणें जरूर आहे. ही प्रस्तावना झाल्यानंतर या मुख्य विषयाचा विचार आपण करूं.

हिंदुस्थानांतील इतर प्रांतांच्या इतिहासाच्या अपेक्षेनें महाराष्ट्राच्या इतिहासाचे दोन विशेष आहेत. ते हे कीं, श्रीशिवाजीमहाराजांची राज्यस्थापना ही एक क्रांति होती; त्याच्या बुडाशीं एक विशिष्ट तात्त्विक भूमिका ( Idealogy ) होती. व दुसरा विशेष हा कीं, महाराष्ट्राची स्वराज्यस्थापना हा केवळ श्रीशिवाजीमहाराज व त्यांचे सरदार आणि मुत्सद्दी यांच्यापुरता मर्यादित प्रयत्न नसून ती स्वराज्यस्थापना सर्व महाराष्ट्रीय जनतेची सार्वजनिक चळवळ होती. महाराष्ट्राच्या इतिहासाचे हे दोन विशेष लक्षांत घेतले म्हणजे त्या पुढील अनुमान असें कीं, ज्यानें ही तात्त्विक भूमिका निर्माण केली व या तत्त्वांचा ज्यानें महाराष्ट्रजनतेंत प्रचार व प्रसार केला, त्याच्या कार्याचा योग्य परामर्श घेतल्याशिवाय व त्या कार्याचें वास्तविक महत्त्व लक्षांत घेतल्याशिवाय मराठ्यांचा इतिहास पुरा होऊं शकत नाहीं व हें विविध कार्य, तात्त्विक भूमिका निर्माण करण्याचें व त्याचा प्रचार व प्रसार करण्याचें कार्य कोणी केलें या प्रश्नास तें श्रीसमर्थांनीं केलें, हे एक च उत्तर शक्य आहे.

शिवाजीमहाराजाची राज्यस्थापना हें कार्य एका हिंदु राजानें कांहीं मुसलमान राजाकडून राज्य जिंकिलें, असें मर्यादित स्वरूपाचें नव्हतें. ती स्वराज्यस्थापना ही धर्मस्थापना होती- राज्याभिषेकाचे वेळीं श्रीशिवाजीमहाराज ही व्यक्ति सत्तारूढ झाली नसून, अनेक शतकें

सत्तेपासून च्युत झालेला हिंदुधर्म त्या वेळीं सत्तेवर अधिष्ठित झाला, हें श्रीशिवाजीमहाराजाच्या राज्याभिषेकाचें तात्त्विक स्वरूप होतें. त्याची स्वराज्यस्थापना ही हिंदुधर्मीयाची धर्मस्थापना होती. ही मराठ्याच्या इतिहासाच्या मुळाशीं असलेली तात्त्विक भूमिका होती. व ही भूमिका मराठी राज्यातील योद्धे व सरदार, इतकें च नव्हे तर सर्व हिंदु लोकाच्या मनात प्रारंभापासून अखेरपर्यंत दृढ होती. या च तत्त्वाच्या जाणिवेनें श्री संभाजी महाराजानीं धर्मरक्षणाकरिता आपल्या प्राणाची आहुति दिली. या तत्त्वाच्या हेतूनें च छत्रसालानें पहिल्या बाजीरावसाहेबाकडे मदतीची याचना केली व त्यानीं छत्रसालास मदत केली. या च कारणामुळें पानिपतच्या लढाईनंतर सुरजमल जाटानें मराठ्याच्या सैन्याची सर्व प्रकारची तरतूद केली. दुसऱ्या बाजीरावसाहेबानीं सत्ता गमावल्यानंतर दौलतराव शिंदे व यशवंतराव होळकर इंग्रजास शह देण्याचा मनसुबा करीत होते, त्याचा हेतु धर्मरक्षण असा च त्याच्या पत्रव्यवहारात व्यक्त केलेला आहे. दैवाचा दुर्विलास असा कीं, मराठ्याची सत्ता गेल्यानंतर हि मराठी सत्तेचा हा हेतु सर्वांच्या मनात जागृत होता. दुसऱ्या बाजीरावाची सत्ता गेल्यानंतर मद्रासेकडील एका हिंदु संस्थानिकानें त्यास लिहिलेलें पत्र प्रसिद्ध झालें आहे. त्यांत त्या संस्थानिकानें दुसऱ्या बाजीरावांस अशी प्रार्थना केली आहे कीं, शेजारचा मुसलमान नबाब माझ्यावर जुलूम करीत आहे, आपण मराठी राज्याचे अधिपति, हिंदु धर्माचे रक्षक आहांत! आपण माझें रक्षण करा. वर्गईकर भटजींनीं रचलेल्या त्यांच्या प्रवासाची जी हकिकत लिहिली आहे त्यांत त्यांनीं एक उद्बोधक प्रसंग दिला आहे. भटजी रस्त्याच्या शेजारील एका विहीरीवर पाणी पीत होते, इतक्यात रस्त्याच्या एक म्हातारी बाई घोड्यावर बसून तेथें आल्या व पाणी पिऊन विश्रांति घेत असतां म्हणाल्या, "मी एक विधवा, पावशेर तांदुळाची धनीण, मला ही यातायात कशाला? परंतु धर्माकरिता हें करावें लागतें." सारांश, मराठ्यांचें राज्य ही धर्मस्थापना आहे, ही भूमिका अखेरपर्यंत सर्वांच्या अंतःकरणांत दृढ होती. ही येथें निर्देश केली? धर्मस्थापना

या शब्दांवर श्रीसमर्थांचा खास शिक्का आहे. या तात्त्विक भूमिकेचे जनक श्रीसमर्थ हे च होत; या प्रश्नास दुसरें उत्तर नाहीं.

मराठ्यांच्या इतिहासाचा दुसरा विशेष असा कीं, मराठ्यांची राज्यस्थापना हा केवळ राजे आणि सरदार यांचा प्रयत्न नसून, या प्रयत्नांत सर्व महाराष्ट्रीय जनता सामील होती. महाराष्ट्राची हीं प्रचंड सार्वजनिक चळवळ होती. संभाजी महाराजांच्या वधानंतर महाराष्ट्रानें अवरंगजेबाशीं तीस वर्षे स्वातंत्र्ययुद्ध करून यश मिळविलें, त्याचें कारण मराठ्यांच्या स्वराज्याच्या बुडाशीं वरील तात्त्विक भूमिका व सर्व जनतेची अनुकूलता हीं दोन कारणें होतीं हें होय व या दोन कारणांमुळें च रजपूत वगैरे इतर प्रांतांतील लोकांच्या प्रयत्नांच्या अपेक्षेनें मराठ्यांचें राज्य अत्यंत विरुद्ध परिस्थितीशीं झगडत चिरकाल टिकलें. राजाचा हत्ती पळून गेला, किंवा राजाचा ध्वज दिसेनासा झाला म्हणजे सैन्यानें पळ काढावा, ही ज्या हिंदुस्थानाच्या इतिहासाची हकिकत त्या हिंदुस्थानांत मराठ्यांनीं निर्नायकी झाली असतां अवरंगजेबासारख्या अत्यंत प्रबल शत्रूशीं सतत तीस वर्षे टक्कर दिली हा हिंदुस्थानच्या इतिहासांत एक अद्‌भुत चमत्कार झाला व याचें कारण मराठे राज्याच्या बुडाशीं असलेली दृढ भूमिका व सर्व जनतेचा आधार. इतर प्रांतास ही भूमिका निर्माण करणारे व तिचा प्रसार करणारे समर्थ लाभले नाहींत, ते महत् भाग्यानें महाराष्ट्रास लाभले व त्याचमुळें शिवाजी महाराजांनीं सुरू केलेल्या प्रयत्नांस चिरस्थायित्व प्राप्त झालें.

श्रीसमर्थांनीं हें कार्य कसें केलें, तें त्यांच्या ग्रंथांवरून स्पष्ट लक्षांत येतें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे एकुणीसाव्या शतकांत हिंदुस्थानांतील राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं राष्ट्रीयत्वाचा पुरस्कार व प्रचार ज्या रीतीनें व ज्या उपायांनीं केला, त्या च रीतीनें व त्या उपायांनीं श्रीसमर्थांनीं धर्मस्थापनेच्या तत्त्वाचा पुरस्कार व प्रचार केला व त्या प्रयत्नाचें स्वरूप व क्रम कसा तो त्यांच्यां ग्रंथांतील निरनिराळ्या वचनावरून आपल्या लक्ष्यांत येतो. समर्थकार्याचें हें स्वरूप लक्ष्यांत घेतलें व या कार्यांतील वचनें म्हणून

समर्थांचीं काव्यें आपण वाचिलीं, तर तीं वचनें किती दिव्य तेजानें भरलेलीं होतीं, तें आपल्या लक्ष्यात येतें. त्याच्या वचनाच्या आधारानें त्यानी वरील लोकजागृतीचा प्रयत्न कसा केला, तें आपण पाहू.

सामान्यत असें म्हणतात कीं, भगवद्गीतेनें कर्मयोगाचा जो उपदेश केला, तो च समर्थांनीं दासबोधात केला. हें अगदीं बरोबर आहे. मोक्षप्राप्ति हें व्यक्तीचें ध्येय आर्यसंस्कृतीनें निश्चित केलें आहे, मोक्षप्राप्तीस वैराग्य हें च प्रमुख साधन आहे, म्हणून आर्यसंस्कृतीचा साहजिक कल वैराग्याकडे व कर्म यागाकडे आहे. परंतु समाजाची स्थिति व प्रगति सतत उद्योगानें च होत असते म्हणून कर्मत्यागाची व निवृत्तीची वृत्ति समाजाच्या प्रगतीस जेव्हा विरोधक होते, त्या वेळीं विवेकी पुरुष कर्मयोगाचा उपदेश करून, वैराग्याकडे झुकत असलेल्या समाजाचा तोल सावरून घेतात. गीताकालीं सांख्यमार्गाच्या प्रचारामुळें जी परिस्थिति निर्माण झाली, तिला आवर घालण्याकरिता भगवतानीं गीतेंत कर्मयोगाचा उपदेश केला. गीताकालीं सांख्य मार्गानें समाजात जो दोष उत्पन्न झाला होता, तो च समर्थकालीं वारकरी पंथाच्या भक्तिमार्गानें उत्पन्न झाला. म्हणून समर्थांनीं गीतेहून हि अधिक स्पष्ट शब्दांत "आधीं प्रपंच करावा नेटका । मग घ्यावें परमार्थविवेका" असा निक्षून उपदेश केला. अभ्युदय व निःश्रेयस, इहलोकींचें हित व पारलौकिक हित, हीं परस्पर विरोधी नसून, एकाच रेषेंत आहेत, व इहलोकींचें हित टाकून एकदम पारलौकिक हिताचा मार्ग पतकरणें चुकीचें आहे व अशक्य हि आहे, हें च गीतेच्या व दासबोधाच्या उपदेशाचें मर्म आहे. या प्रमाणें गीतेनें जें कार्य केलें, तें च श्रीसमर्थांनीं दासबोधाच्या द्वारें केलें. परंतु समर्थांनीं गीतेच्या पार पुढील घेंड महाराष्ट्रास शिकविलें कारण परिस्थितीनें तें आवश्यक झालें होतें गीताकालीं पारतंत्र्याचा प्रश्न उत्पन्न झाला नव्हता, समर्थकालीं हिंदुधर्मीय परतंत्र होते व म्हणून 'प्रपंच नेटका करण्याचें मर्म' राजकारण आहे, हा धडा समर्थांना शिकवावा लागला व म्हणून हरिकथा निरूपणानंतर, 'दुसरें तें राजकारण' असा उपदेश समर्थांनीं केला

वरील उपदेशांतील विचार त्या काळीं किती क्रांतिकारक होता, याची आपणांस आतां कल्पना येत नाहीं. ब्रिटिश अमदानींत राष्ट्रीय चळवळीमुळें राजकारणाशीं सर्व जनतेचा संबंध आहे, हा धडा आपणां सर्वांस पाठ झाला आहे. व या राजकारणाच्या परिचयामुळें ' दुसरें तें राजकारण ' या उपदेशामुळें समर्थांनीं त्या काळीं किती नवीन विचार निर्माण केला, याची आपणांस प्रथम कल्पना होत नाहीं. परंतु त्या काळीं, राज्य मिळविणारे व घालविणारे राजे व त्यांचे सरदार यांचाच राजकारण हा विषय होता. सामान्य जनतेचा राजकारणाशीं सम्बन्ध नव्हता. अशा स्थितींत आपणांवर राज्य कोणाचें असावें, हा सर्व जनतेच्या विवंचनेचा व प्रयत्नाचा विषय आहे, हा त्या काळाला अगदीं अपरिचित व नवीन असा राजकारणी उपदेश समर्थांनीं केला. प्रातिनिधिक संस्था बहुशः कोठें हि त्या काळीं अस्तित्वांत आल्या नव्हत्या. परंतु राजकारण व जनता यांचा प्रत्यक्ष संबंध आणून त्या वेळेच्या परिस्थितींत शक्य होती तितकी राजकारणांतील लोकशाही समर्थांनीं वरील उपदेशानें निर्माण केली व लोकांचा राजकारणाशीं संबंध आणून, हिंदुधर्मीयांचें पारतंत्र्य नष्ट होण्याकरितां, हिंदुधर्माचें रामराज्य स्थापन करण्याचा प्रयत्न करणें हा हिंदुधर्मीयांचा श्रेष्ठ धर्म आहे, असा उपदेश श्रीसमर्थांनीं केला.

जनतेस राजकारणाचा उपदेश करून त्या पुढील उपदेशाच्या प्रचाराचें व प्रसाराचें कार्य श्रीसमर्थांनीं केलें, त्याचा क्रम हि त्यांच्या वचनांवरून आपणांस लावता येतो. जनतेचा राजकारणाशीं म्हणजे राजसत्तेशीं प्रत्यक्ष संबंध आला, म्हणजे ती जनता समजदार व शहाणी व्हावी लागते. अलिकडच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे, लोकमत सुशिक्षित करणें जरूर होतें व म्हणून च " जितुकें कांहीं आपणांसी ठावें । तितुकें हळुहळु शिकवावें । शाहाणे करूनि सोडावे । बहुत जन ॥ " असें समर्थ सांगतात, परंतु लोकशिक्षणाच्या व प्रचाराच्या ह्या कार्यास प्रसिद्धीचीं साधनें आवश्यक असतात. त्या काळीं छापखान्यांसारखीं

प्रसिद्धीचीं साधनें नव्हतीं, म्हणून या प्रचाराच्या साधनाकरितां मठ-संस्थेचें साधन समर्थांनीं निर्माण केलें महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं व कांहींसे महाराष्ट्राच्या बाहेर अकराशें मठ होते असें श्री. देव म्हणतात. कीर्तनांच्या व उत्सवाच्या निमित्तानें हजारों लोक या मठात नेहमीं जमत. *श्रीराम ही देवाना बंदींतून सोडविणारी श्रीसमर्थांची स्वातंत्र्यदेवता !* या मठातून या सर्व जनतेस नेहमीं कोणत्या प्रकारचा उपदेश करण्यात येत असे, ते त्याच्या ग्रंथावरून आपणास कळतें. श्रीराम यांनीं पचवटींत वास्तव्य केलें आहे. " पूर्वी जे मारिले होते । ते चि आता बळावले ॥ " पूर्वी विघ्नाचा नाश करण्याकरिता श्रीरामचंद्रानें हनुमंताची योजना केली समर्थकाळीं हि धर्माआड आलेल्या विघ्नाचा नाश करण्याकरिता हनुमान श्रीशिवाजीमहाराजाच्या रूपानें अवतरला आहे, शत्रूस खाण्याकरिता वरदायिनी माता त्याचे बरोबर रणांगणांवर फिरत आहे, देव बंदींतून सुटण्याचा काळ आला आहे, देवाच्या फौजा तयार होऊन चालल्या आहेत, मोठा आकांत सुरू झाला आहे, अशा प्रकारचा उद्दीपक व उत्साहवर्धक प्रचार हजारों लोकांच्यापुढें या मठातून सतत्हीं होत असे त्या काळच्या धर्मश्रद्धेच्या, भावनेच्या व वीरश्रीच्या काळांत वरील प्रकारच्या प्रचारानें सामान्य जनतेंत किती उत्साह व तेज निर्माण झालें असेल, त्याची कल्पना हि करणें कठीण आहे इतिहासकार म्हणतात कीं, शिवाजीमहाराजाच्या प्रयत्नास सुरवात झाल्यानंतर युद्धामध्यें मराठ्यांच्या सैन्यापुढें मुसलमानाचा टिकाव कधीं हि लागला नाहीं हें नवीन तेज वरील मठसंस्थेतून निर्माण झालें, हें स्पष्टपणें दिसून येतें

आपल्या धर्मस्थापनेच्या तत्त्वाचा प्रचार करण्याचें कार्य वरील प्रकारें केल्यानंतर त्याच्या पुढील कार्य समर्थांनीं कसें केलें, तें हि त्याच्या वचनावरून आपणास दिसतें लोकमत तयार झाल्यानंतर पुढील कार्य संघटनेचें, म्हणून "मराठा तितुका मेळवावा । आपुला महाराष्ट्रधर्म वाढवावा । ये विषयीं न करिता तकवा । पूर्वज हासती ॥ " अशी श्रीसमर्थांनीं शिकवण दिली. समर्थांचा राजकारणाशीं संबंध काय, असा प्रश्न विचारण्यांत

येतो. परंतु वरील एका वचनांतच त्या प्रश्नास समर्पक उत्तर मिळतें. लोकजागृति करणारा वक्ता, लोकांच्या चित्ताचें आकर्षण होईल, अशी भाषा साहजिक वापरतो. वरील वचनांतील "येविशयीं न करितां तकवा । पूर्वज हांसती ॥" ही भाषा अशा च प्रकारची आहे. वर सांगितल्याप्रमाणें अलिकडच्या राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं जे जे प्रयत्न केले, त्या सर्व प्रयत्नांची ओळख समर्थांच्या कार्यांत आपणांस पटते. स्वराज्याची आकांक्षा उत्पन्न करण्याकरितां लोकमान्यांनीं शिवाजीउत्सव सुरू केला. हेतु हा च कीं, "येविषयीं न करितां तकवा । पूर्वज हांसती ॥"

या प्रमाणें संघटनेचा उपदेश केल्यानंतर अखेर जें कार्य प्रत्यक्ष करावयाचें त्याचा उपदेश पुढील वचनांत आहे. "बहुत लोक मिळवावे । एक विचारें भरावें । कष्टें करूनि घसरावें । म्लेंच्छांवरी ॥" आणि शेवटीं "देव मस्तकीं धरावा । अवघा हलकल्लोळ करावा । मुलुख बडवावा कीं बुडवावा । धर्मसंस्थापनेसाठीं ॥"

महाराष्ट्रांतील ज्या दिव्य तेजाचा व उत्साहाचा शिवाजी महाराजांस उपयोग झाला, तें तेज व तो उत्साह यांचें उगमस्थान श्रीसमर्थ रामदासस्वामी हे आहेत. युरोपांतील वर उल्लेख केलेल्या फ्रांसांत क्रांतिकारक विचार प्रवर्तकांचें जें स्थान आहे, तें च मराठ्यांच्या इतिहासांत श्रीसमर्थांचें स्थान आहे. एकूणीसाव्या व विसाव्या शतकांतील हिंदुस्थानांतील राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं राष्ट्रीयत्वाचा प्रचार ज्या उपायांनीं व मार्गांनीं केला, त्याच उपायांनीं व मार्गांनीं सतराव्या शतकांत श्रीसमर्थांनीं लोकजागृतीचें कार्य केलें. मराठे लोक पूर्वींहि लढाई करीत होते, परंतु ते मुसलमान बादशहांचे नौकर म्हणून लढत होते. श्रीसमर्थांनीं धर्मस्थापनेच्या ध्येयाकरितां लढण्यास महाराष्ट्रीयास शिकविलें. राजसत्तेंत सर्व जनतेचा जिव्हाळ्याचा सम्बंध आहे, या राजकारणांतील लोकशाहीच्या तत्त्वाचा समर्थांनीं उपदेश केला. व तो अशा वेळीं कीं, हिंदुस्थानांत च नव्हे तर युरोपांतहि हें तत्त्व विशेष रीतीनें पुढें आलें नव्हतें. व म्हणूनच आम्ही वर म्हटलें आहे कीं, समर्थांच्या चरित्राकडे सतराव्या शतकांतील

भूमिकेवरून पाहिल्यास त्याची उंची लक्ष्यात येणार नाहीं, इतकें ते आपल्या काळाच्या पुढें होते. मराठ्याच्या इतिहासाच्या बुडाशीं हें नवीन क्रांतिकारक तत्त्व असल्यामुळें शिवाजीमहाराजाची राज्यस्थापना ही एक क्रांति होती, असें आम्ही वर म्हटलें आहे.

धर्मस्थापना या शब्दप्रयोगाच्या बुडाशीं कोणतें तत्त्व आहे, तें समजून घेणें जरूर आहे. युगधर्मप्रमाणें त्या त्या युगातील परिभाषा बदलत असते. पारतंत्र्यामुळें समाजाच्या जीवनात अनेक दोष निर्माण होतात. व स्वातंत्र्यप्राप्तींत त्या दोषाचा परिहार करण्याचा हेतु असतो. सतराव्या शतकात धर्म, धार्मिक आचारविचार व धर्मश्रद्धा यास समाजाच्या जीवनात अत्यंत महत्त्वाचें स्थान होतें. तें केवळ हिंदुस्थानात च नव्हे, तर युरोपात हि ती च स्थिति होती. युरोपात तर एका च धर्माचे दोन पंथ परस्पराचा अनन्वित छळ करीत होते. परस्परास जिवंत जाळीत होते व आपापल्या पंथाची सत्ता स्थापन करण्याकरिता सतत युद्ध करीत होते. सतराव्या शतकात मुसलमानी सत्तेमुळें हिंदुधर्मीयांचें धार्मिक जीवन कष्टमय व अशक्य झालें; हा त्या वेळच्या पारतंत्र्यामुळें दोष उत्पन्न झाला होता. जनतेस स्वातंत्र्याच्या प्रयत्नास अनुकूल करण्याकरिता पारतंत्र्याचा दोष नाहींसा होईल, हा हेतु स्पष्ट करणारी परिभाषा आपोआप निर्माण होते व धार्मिक जीवनाचे कष्ट दूर करण्याचा हेतु स्पष्ट करण्याकरिता त्या वेळच्या स्वराज्याच्या व स्वातंत्र्याच्या प्रयत्नास धर्मस्थापना हें नाव आपोआप प्राप्त झालें. परंतु या शब्दप्रयोगाच्या मुळाशीं असलेलें वास्तविक तत्त्व म्हणजे आपणास परिचित असलेलें स्वराज्य किंवा स्वातंत्र्य हें च तें तत्त्व होय. त्या वेळेच्या पारतंत्र्यामुळें धार्मिक जीवनाचा दोष उत्पन्न झाला होता, हल्लींच्या पारतंत्र्यात अर्थनाशाचा दोष उत्पन्न झाला आहे व म्हणून च हल्लींच्या स्वातंत्र्याच्या प्रयत्नाचा हेतु भाकरीचा अगर पोटापाण्याचा प्रश्न सोडविणें असा मानण्यात येतो. पूर्वीच्या स्वराज्याच्या प्रयत्नांस धर्मस्थापना म्हणण्यात येत असे, त्या च रीतीनें हल्लींच्या स्वराज्याच्या

प्रयत्नांस 'अर्थस्थापना' असें म्हणावें लागतें. परंतु या दोन्हीं शब्दप्रयोगांच्या बुडाशीं असलेलें तत्त्व एक च आहे. धर्मस्थापना हा समर्थांचा मंत्र व 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे' हा लोकमान्यांचा मंत्र; या दोन्हीं मंत्रांतील उपदेश एक च आहे. समर्थांच्या च मंत्राचा उपदेश लोकमान्यांनीं केला व त्या च मंत्राचें कार्य रामनामाच्या तारक मंत्राच्या कृपेखालीं देशांत हल्लीं सुरू आहे. देशांतील हल्लींचे स्वातंत्र्याचें कार्य हें समर्थांकडून च परंपरेनें आलेला वारसा आहे. व म्हणून च स्वराज्याच्या महामंत्राचे आद्यगुरु श्रीसमर्थ रामदासस्वामी आहेत.

समर्थांच्या चरित्राचीं दोन अंगें होतीं. ते हयात होते तोंपर्यंत त्यांच्या चरित्राचे हे दोन्ही प्रवाह एकत्रित झाले होते. त्यांच्यानंतर त्यांचें पारमार्थिक कार्य सांप्रदायिकांनीं चालविलें व राजकारणाचें कार्य मराठी राज्यांतील योद्धे व मुत्सद्दी यांनीं चालविलें. हल्लींच्या काळांत हे दोन्हीं प्रवाह एके ठिकाणीं आणण्याची वेळ आली आहे. व श्री देव यांच्या प्रयत्नांत हे दोन्ही प्रवाह एकत्रित झालेले दिसावे, अशी श्रीसमर्थांजवळ प्रार्थना आहे.

श्रीसमर्थांचा राजकारणाशीं सम्बन्ध असावा असें पुष्कळांस मोघमपणानें वाटतें. परंतु त्याबद्दल कागदोपत्रीं कांहीं आधार सांपडत नाहीं, ही अडचण बऱ्या च लोकांच्या आड उभी राहते, असें दिसतें. परंतु समर्थांच्या कार्याचें जें स्वरूप वर दिलें आहे, तें लक्षांत घेतलें म्हणजे शिवाजीमहाराजांच्या तपशीलवार राजकारणात श्रीसमर्थांचा प्रत्यक्ष सम्बन्ध आला असेल च असें नाहीं. तरी सुद्धां त्यांच्या कार्याचें स्वरूप लक्ष्यांत घेतां, श्रीसमर्थ हे त्या वेळेच्या राजकारणाचें उगमस्थान होते, हें स्पष्ट आहे.

समर्थग्रन्थांतील 'राजकारण' या शब्दाचा अर्थ काय, या विषयीं बऱ्याच विद्वानांनीं उहापोह केला आहे. इतर काळांतील

परिभाषेचा अर्थ लावण्याकरितां केवळ शब्दाच्या अर्थानें अडून न जाता, त्याच्या मुळाशीं असलेल्या कल्पनेचा शोध घेणें जरूर आहे. धर्मस्थापना या शब्दाच्या मुळाशीं असलेली कल्पना म्हणजे जीस आपण हल्लीं स्वराज्य व स्वातंत्र्य म्हणतों ती च. तसेंच हल्लींच्या परिभाषेंत ज्यास आपण धोरण किंवा कार्यक्रम म्हणतों, तो च अर्थ समर्थांनीं राजकारण या शब्दानें व्यक्त केला आहे. व त्या वेळीं राजकारणाचें जें स्वरूप होतें त्याचें च वर्णन त्यांनीं आपल्या ग्रन्थांत केलें आहे. हल्लींच्या राजकारणाचें व त्या वेळच्या राजकारणाचें स्वरूप कालमानाप्रमाणें अत्यंत भिन्न आहेत. परंतु तेवढ्यामुळें राजकारण या शब्दाच्या अर्थासम्बंधीं साशंक होण्याचें कांहीं कारण नाहीं.

श्रीसमर्थचरित्राचें अध्ययन लौकिक ऐतिहासिक दृष्टीनें अधिक तपशीलवार रीतीनें करण्याचा विद्वानांनीं प्रयत्न करावा, अशी माझी प्रार्थना आहे.

१८६१ ज्येष्ठ शुद्ध ११



## ( १५ )

# गिरिधरांचें अब्द रामायण

( लेखक-रा. ज. स. करंदीकर, संपादक, केसरी )

श्रीसमर्थांचे पट्टशिष्य गिरिधरस्वामी मठ बीड यांच्या श्रीसमर्थप्रताप ग्रंथाच्या प्रस्तावनेंत नानासाहेब देव यांनी गिरिधरस्वामींच्या अनेक ग्रंथांचा परामर्श घेतला आहे. त्यांत अब्द रामायण या ग्रंथाचा सारांश दिला आहे. त्यावरून मूळ ग्रंथ वाचून पहाण्याची उत्कंठा लागली, आणि श्रीसमर्थवाग्देवतामंदिराच्या समारंभाचे वेळीं तेथील बाडांतून हें प्रकरण काढून पाहिलें त्यावरून त्या ग्रंथासंबंधीं कांहीं चिकित्सा करण्याचें योजिलें आहे.

मूळ वाल्मीकिरामायणांत कालासंबंधाचे उल्लेख अगदीं थोडे आहेत. आणि जे उल्लेख आहेत, ते हि तपशीलवार नाहींत. असें असतां, गिरिधरस्वामींनीं इतके उल्लेख कोठून आणिले हें एक गूढ च आहे. स्वतः गिरिधरांनीं च अहिरावण महिरावण याच्या कथेचा उल्लेख करताना वाल्मीकिरामायणांत ही कथा नसली तरी इतर रामायणांतून ही कथा आहे, एवढ्यावरून च वाल्मीकिरामायणांत नसलेल्या कथा निराधार आहे असें मानू नये, असें बजावलें आहे, आणि रामायण ग्रंथाचा विस्तार प्रचलित रामायणापेक्षा किती तरी पटींनें अधिक होता, आणि तीं सर्व रामायणें हल्लीं उपलब्ध नसलीं तरी त्यांतून घेतलेल्या कथा विश्वासार्ह आहेत, असें आग्रहानें सांगितलें आहे. अर्थात च अब्द रामायणांत दिलेले काल पूर्वीच्या कोठल्यातरी रामायणग्रंथात असले पाहिजे असें अनुमान साहजिक निघतें. पद्मपुराण, वायुपुराण इत्यादि ग्रंथांतून रामायणांत

उल्लेखिलेले अनेक प्रसंग कोणत्या काळीं घडले या बाबतींत निश्चित विधानें करण्याइतका पुरावा आढळत नाहीं, तथापि ज्या अर्थी इतकी तपशीलवार माहिती यात दिली च आहे, त्या अर्थी ती वाल्मीकिरामायणातील सदर्भाला कितपत जुळते याचा विचार करू. नर्मदोत्तर प्रदेश आणि नर्मदेच्या दक्षिणेकडील प्रदेश यातील मासगणना पद्धतींत फरक असतो. नर्मदोत्तर प्रातात पौर्णिमान्त मासगणना असल्यानें प्रथम कृष्णपक्ष आणि नतर शुक्लपक्ष असा क्रम असतो. नर्मदेच्या दक्षिणेकडील प्रदेशात अमान्तमास असल्यानें आधीं शुक्लपक्ष झाल्यावर मग कृष्णपक्ष सुरू होतो. यामुळें शुक्लपक्षाचीं नावें दोन्हीं ठिकाणीं नेहमीं सारखीं च असतात पण नर्मदोत्तर ज्याला चैत्र कृष्णपक्ष म्हणतात त्याला च दक्षिणप्रातात फाल्गुन कृष्णपक्ष म्हणतात. बहुतेक पुराणातून उत्तरेकडल्या पद्धतीनें पौर्णिमान्त मासगणना दिलेली असल्यामुळें दक्षिणप्रातातील टीकाकार घुचकळ्यात पडतात. चैत्रकृष्णपक्षात एखादी गोष्ट घडली असें नमूद केल्यानतर त्याच्यानतर चैत्रशुक्लपक्ष कसा येईल अशी शका येऊन ती गोष्ट वैशाखशुक्लपक्षात ढकलण्यात येते यामुळें अनेक घोंटाळे माजतात. अशा प्रकारचे मासळे अन्द रामायणात कांहीं ठिकाणीं आढळतात. त्यामुळें या रामायणात दिलेल्या मितींत अशा कारणामुळें फरक पडला असण्याचा सभव आहे रामाच्या वनवासाचा प्रारभ वैशाख शु॥ १ ला सागितला आहे, याचें कारण असें दिसतें कीं, वैशाख व॥ ६ ला भरतभेट सागितलेली आहे. ही वैशाख व॥ ६ म्हणजे दक्षिण प्रदेशातील चैत्र कृष्ण ६ होय आणि ही तिथी एकदा मान्य केली कीं, मग वनवासारभ वैशाख शुद्धात न मानता चैत्रात तो मानण्यास हरकत दिसत नाहीं या च दृष्टीनें या अन्दरामायणातील अनेक तिथींचें निरीक्षण केल्यास, मतभेदाचे कित्येक प्रसग टाळता येतील.

अन्द रामायणांतील दुसरा महत्वाचा मुद्दा सीतेच्या वयामानाचा होय. वनवासास निघण्या वेळीं रामाचें वय २८ वर्षांचें आणि सीतेचें वय १८ वर्षांचें दिलें आहे. तें सयुक्तिक दिसतें, पण वनवासापूर्वी सीता

अयोध्येंत राहिल्याचा काळ उगाच १२ वर्षांनीं वाढविलेला आहे. वास्तवीक पहाता विवाह आटोपून अयोध्येस आल्यानंतर या सर्वांचें वास्तव्य १२ महिने अयोध्येंत झाल्यावर च राज्याभिषेकाची धाटमेल सुरू झाली. हा काळ १२ महिन्याचे ऐवजीं १२ वर्षे मानिल्यास भरत आपल्या मामाच्याकडे १२ वर्षे राहिला, असें मानावें लागतें; पण तें सयुक्तिक दिसत नाहीं. अर्थात च अयोध्येंतील राहण्याचा काळ १२ महिने च मानल्यास विवाहाच्या वेळीं रामाचें वय २७ आणि सीतेचें वय १७ वर्षे मानावें लागेल. अशी ही कालगणना इतर सर्व वर्णनाशीं जुळते. पण अब्द रामायण ज्या काळात लिहिलें गेलें त्या काळात बालविवाहाची चाल सर्वत्र रूढ झाली असल्यानें विवाहाच्या वेळचें सीतेचें वय १८ होतें असें सांगणें ग्रंथकाराच्या जिवावर आलें असेल. म्हणून त्यानें हा काळ अलीकडे ओढून त्याची भरती अयोध्येंतील राहण्याचा काळ वाढवून करून घेतली. विवाहानंतर सीतेचा व रामाचा अयोध्येंतील रहिवास १२ वर्षांचा नसून १ वर्षाचा होता, असें मानलें तरी वनवासाला निघताना रामाचें वय २८ वर्षांचें व सीतेचें वय १८ वर्षांचें होतें, या विधानाला हरकत येत नाहीं. तेव्हा मध्यंतरीचा हा गौण मुद्दा सोडून वनवासाला प्रारंभ कोणत्या तिथीला झाला हें पाहू.

वनवासाला प्रारंभ वैशाख शु॥ १ ला झाला असें म्हटलें आहे. तें बरोबर दिसत नाहीं. चित्रकूटास भरताची भेट वैशाख व॥ ६ ला झाली हें बरोबर मानून चालल्यास ही वैशाख व॥ ६ पौर्णिमान्त मानानें मानिली पाहिजे. तशी ती मानल्यास वनवासाचा प्रारंभ वैशाख शुक्लपक्षात होऊ शकत नसून तो प्रारंभ चैत्र शुक्लपक्षातच धरावा लागतो. वाल्मिकीरामायणातही रामाला अभिषेक करण्याचा विचार चैत्र शुक्लपक्षातच चालला होता असें म्हटलें आहे. त्या अर्थी वनवासाचा प्रारंभ चैत्रशुक्ल १० च्या पुढें नेता येत नाहीं.

वनवास संपल्यानंतर भरताची भेट वैशाख शु॥ ६ ला बरोबर १४ वर्षांनीं झाली असें म्हटलें आहे, पण आरंभींच्या प्रकरणात रामाचा व

भरताचा करार वैशाख वा ६ ला झाला असें दिलें आहे. अमान्तमानानें ही तिथी चैत्र वा ६ येते. तेव्हां १४ वर्षांनंतरची भरतभेट ही अमान्तमानानें चैत्र वा ६ ला च झाली पाहिजे. अर्थात च तत्पूर्वी रावणवध फाल्गून कृष्ण अमावास्येला ( अमान्त पद्धतीनें ) झाला असें धरलें पाहिजे. अब्दरामायणांत रावणवधाची मिती चैत्र वा अमावास्या अशी दिली आहे. ती मिती पौर्णिमान्त मासाची मानल्यास अमान्त पद्धतीनें तीच मिती फाल्गून वा अमावास्या येते. सारांश जुन्या पुराणांतल्या मिती व विशेषतः उत्तरहिंदुस्तानांतील मिती पौर्णिमान्त असतात, हें लक्षांत ठेवून तदनुरोधानें सर्व मिती व तिथी मांडून घेतल्यास घोटाळा होत नाहीं. *अब्दरामायणांत हें तत्व लक्षांत न ठेवल्यामुळें कांहीं मितींचा घोटाळा* झाला आहे.

असो. आतां या अब्दरामायणांतील इतर कांहीं महत्वाच्या विधानांचा परामर्श घेऊं. पंचवटींत १२॥ वर्षे काढल्यानतर पुढें शूर्पणखेचें प्रकरण सुरू झालें. त्यानंतर ३॥ महिन्यांनीं रावणानें सीतेचें हरण केलें असें म्हटलें आहे. शूर्पणखेची तक्रार रावणापर्यंत पोहोंचून तेथून कपटव्यूह रचून सीतेचें हरण करण्यास एवढा कालावधि लागला, हें स्वाभाविक आहे. *त्यानंतर माघ वा ७ पासून पंपा सरोवरापर्यंत येण्याला रामलक्ष्मणाला* ३॥ महिने लागले असावे, व रामलक्ष्मणाचे पंपातीरावर आगमन ज्येष्ठाच्या प्रारंभीं झालें असावें. पण अब्दरामायणात रामलक्ष्मणास फाल्गून महिन्यांतच पंपातीरीं आणिलें आहे, आणि मग मध्यंतरीचा ३ महिन्यांचा कालावधि भरून काढण्याकरितां पंपा सरोवरावर आल्यावर ३ महिने रामानें अनुष्ठान केलें असें म्हटलें आहे तें सयुक्तिक दिसत नाहीं. ३ महिनेपर्यंत रामलक्ष्मण सीतेचा शोध करण्याकरितां पुढें न जातां एके ठिकाणीं च थबकून राहातात हें संभवनीय दिसत नाहीं आणि यदाकदाचित् ते तसे राहिले तरी ३ महिन्यांत सुग्रीवाला किंवा वालीला त्यांचा पत्ता लगत नाहीं हें हि संभवनीय मानता येत नाहीं. ज्येष्ठ शु॥ ५ स सुग्रीवाची भेट झाली व तेथून ७ दिवसात सर्व

वाटाघाटी व करारमदार होऊन वालीचा वध झाला आणि ज्येष्ठ शु॥ १३ ला रामानें सुग्रीवाला किष्किंधेचें राज्य दिलें असें म्हटलें आहे. मोंगलाचा पराभव करून श्रीशिवाजी महाराजांनीं ज्येष्ठ शु॥ १३ ला च राज्याभिषेक करून घेतला ही गोष्ट गिरिधर स्वामींच्या लक्षात असल्यामुळें सुग्रीवाचा राज्याभिषेक हि त्या च मितीला झाल्याचें दर्शविलें असावें, किंवा सुग्रीवाच्या राज्याभिषेकाची मिती लक्षात घेऊन च श्री शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाचा मुहूर्त ज्येष्ठ शु॥ १३ ला धरला गेला असावा. या दोहोंतून दुसरा मुद्दा च अधिक सयुक्तिक वाटतो. कोणी कोणाचें ही अनुकरण केलें असो, गिरिधर स्वामीला सुग्रीवाच्या राज्याभिषेकाला ज्येष्ठ शु॥ १३ हा च मुहूर्त शक्य व इष्ट वाटला, यावरून शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाचा केवढा परिणाम महाराष्ट्रीयांच्या मनावर झाला असावा, त्याचें हें एक गमक आहे.

ज्येष्ठ शु॥ १५ पासून ४ महिने वर्षाकालानिमित्त विश्रांति घेऊन आश्विन शु॥ १० च्या मुहूर्तावर श्रीराम निघाले असें सांगण्यात हि मराठेस्वार विजयादशमीच्या मुहूर्तावर स्वारीला निघत, याचें च प्रतिबिंब पडलेलें दिसतें. वास्तविक पहाता श्रीराम कांहीं विजयादशमीस स्वारीवर निघाले नाहींत विजयादशमी झाल्यावर रामानीं लक्ष्मणाला सुग्रीवाकडे सूचनेसाठीं पाठविलें. पुढें सुग्रीवाचीं सैन्यें जमण्याला एक महिना लागला. कार्तिक शु॥ १० ला सुग्रीवाच्या आज्ञेवरून वानरसेना सीतेच्या शोधासाठीं निघाली आणि मार्गशीर्ष शु॥ १० ला वानरसेना दक्षिण समुद्राच्या तीरावर येऊन ठेपली आणि मार्गशीर्ष शु॥ १२ ला रात्रीं मारुतीनें अशोकवनात सीतेस पाहून रामाचा संदेश सांगितला.

येथून पुढें प्रत्येक दिवसाला काय काय घडलें हें सांगण्याचें प्रयोजन नाहीं. मात्र पूर्वी सांगितल्याप्रमाणे युद्धाचा अवधि एक महिन्यानें वाढविला गेला आहे तो कमी करून रावणवध फाल्गुन व॥ ३० ला आणला म्हणजे मध्यतरींच्या सर्व तिथी त्या बेतानें बसवून घेता येतील. युद्धाचा अवधि एक महिन्यानें वाढविल्यामुळें मध्यतरींच्या प्रत्येक

ल्हानसहान गोष्टीचा हि काल विनाकारण ताणण्यात आला आहे. उदाहरणार्थ रामरावणाचें अखेरचें युद्ध १८ दिवस झाल्याचें मात सांगितलें आहे. ती अतिशयोक्ति होय हें उघड आहे. त्यावरून च या कालावधींत छाटछाट करण्याला पुष्कळ च जागा आहे, हें उघड होतें

पण रामरावणाचें युद्ध १८ दिवस झालें असें सांगण्यांत भारतीय युद्धाशीं तुलना दर्शविण्याचा हेतु स्पष्ट दिसतो. हें युद्ध १८ दिवस झालें असो वा नसो, या १८ दिवसाची जी कालगणना दिली आहे, ती दुसऱ्या एका पद्धतीनें उपयुक्त ठरते. रावणाचें हें शेवटचें युध्द फाल्गुन शुा १२ ला सुरू होऊन फाल्गुन कृष्ण १४ ला संपलें, असें सांगण्यात भारतीय युद्धाच्या १८ दिवसाचा नकाशा डोळ्यापुढें असला पाहिजे. रावणाचा वध वा १४ ला झाला असें सांगितलें, यावरून दुर्योधनाचा वध देखील वद्यपक्षांतील १४ ला झाला, आणि भारतीय युध्दाचा आरंभही शुध्द १२ ला झाला अशी समजूत होती, असें दिसतें, पण हे १८ दिवस मोजण्यात क्षयतिथींचा विचार केलेला नाहीं. भारतीय युद्धाच्या वेळच्या पंचागात मार्गशीर्ष कृष्णपक्षात एक क्षयतिथी पडते ती लक्षात घेतल्यास युद्धाचे १८ दिवस भरण्याला युद्धारंभ शुा ११ ला धरावा लागतो. केवळ क्षयतिथींची माहिती नसल्यामुळें गिरिधरस्वामींनीं रामरावणाचें युद्ध भारतीय युद्धाप्रमाणें च शुा १२ ला सुरू होऊन वा १४ ला संपलें, असें म्हटलें क्षय तिथी लक्षात आला असती तर जसा भारतीय युद्धाचा आरंभ शुा ११ ला व शेवट कृष्ण १४ ला झाला असें च म्हटलें असतें व तें भारतीय युद्धकाल निर्णयात आम्ही दर्शविलेल्या कालाशीं बरोबर जुळलें असतें. असा स्पष्ट मेळ बसला असता, तो जरी बसला नाहीं तरी भारतीय युद्धारंभकाल शुा १२ ला किंवा १४ ला झाला असें गिरिधरस्वामी मानीत नव्हते एवढें यावरून उघड आहे.

( १६ )

अथ ॥ श्री गणेशदत्तगुरुभ्यो नमः ॥ श्रीरामेश्वरेभ्यो नमः ॥ श्रीरस्तु ॥

श्रीसमर्थरामदासस्वामीभक्तिपरायण

व

महाराष्ट्र–राज्य–कार्य–धुरंधर विश्वासनिधि

# रामचंद्रपंत अमात्य बावडेकर

# हुकमत्–पन्हा

## यांचा अल्प परिचय

कारकीर्द इ. स. १६६८–१७२०

( लेखक— रा. वासुदेव वामन ठाकूर, इंदूर )

( १ ) आज ज्येष्ठ शु. १३, मनानें रायगडास जाऊं या. आनंदनामसंवत्सरे शके १५९६ शनिवार शु. १३ ( ता. ६ जून इ. १६७४ रोजीं ) सकाळीं ७–८ चे सुमारास क्षत्रियकुलावतंस गोब्राह्मणप्रतिपालक छत्रपति श्री शिवाजी महाराज सिंहासनस्थ " झाले. " क्षीरवृक्षाचें आसन सव्वा हात उंच करून सुवर्णानें मढविलेलें असें हें सिंहासन होतें. जवळ पट्टराणी सोयराबाई पटबंधन करून संभाजीसह बसल्या होत्या. सिंहासनाचे सभोंवार हातांत सुवर्णादिकलश घेतलेले अष्टप्रधान अष्टदिक्स्थानापन्न होते. त्यांत, पश्चिमेस रामचंद्र नीळकंठ पंडित अमात्य दधिपूर्ण ताम्रकलश घेऊन उभे राहिले होते. " सारांश, छत्रपति शिवाजी महाराजांचा उत्सव, म्हणजे त्यांत इतरांबरोबर रामचंद्रपंत असणार च.

( २ ) देवाची पूजा करितांना " सशक्तिकं सपरिग्रहमावाहयामि " असें म्हणून पूज्य देवतेचें आपण आवाहन करीत असतों. छत्रपतींच्या आवाहनांतर्गत परिग्रहांत पंतांचा हक्क कसा व किती पोहोंचतो हें आतां पाहूं या.

( ३ ) पंतांची कुलकथा, ' बावडा दप्तर १ अनुक्रमांक ५२ वरून उद्धृत '




सारांश, पंतांच्या पूर्वीच्या तीन पिढ्या " भोंसल्यांच्या सेवेंत " गेल्या. पंतांनीं छत्रपतींचे कारकीर्दींत सुरुवात करून संभाजी, राजाराम, दुसरे शिवाजी व दुसरे संभाजी ( कोल्हापूरकडील ) अशा एकंदरींत पांच पिढ्या पाहिल्या व चालविल्या. तेव्हां " भोंसले " पंतास " आमच्या पदरचे परिग्रहांतर्गत " असें च म्हणतील. एका घराण्यानें दुसऱ्या ( राजघराण्याची ) घराण्याची अशी अव्याहत केलेली सेवा, अद्वितीय च म्हणायाची.

( ४ ) हा झाला छत्रपतींच्या घराण्याशीं केवळ सेव्यसेवक संबंध. पंतांचा संबंध छत्रपतींशीं गुरुबंधूचा हि येतो, तो हि अवलोकूं या.

( अ ) श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें लेखांक १९५– " पूर्वी कैलासवासी सिवाजी राजे भोसले यासी परिधावी संवत्सरीं शिंगणवाडीचे मठीं श्रीहनुमंतासमोर परमार्थ झाला ते समई मंडळी होती ते सर्व रामचंद्रपंत ( अ ) मात्य व दत्ताजीपंत वाकेनिवीस यानी सर्वांस जे सांगितले त्याचे स्मरण सर्वास देत जाणें. "

( आ ) लेखांक १९६– " परिधावी संवत्सरी राजेश्रीनीं +++ त्या समई परमार्थ घेतला ते समईचे द्रव्य अरजपटोरे मझुरकर याचे जवळ आहे त्यातले अर्धे द्रव्य देवाच्या इमारतीकडे घ्यावे व अरधेचे दीपमाळा करान्या ह्मणुन कैलासवासी समर्थांची अदज्ञा आहे रामचंद्रपंता अमात्य यास कळऊ नये "

( या ' अ ' व ' आ ' संबंधांत संपादक " अनिश्चित " ह्मणतात: कारण सांगत नाहींत. )

( इ ) श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें लेखांक ४२– " ३५ राजश्रीची सेवा व अष्ट प्रधान याचे सेवेचा अधिकार आहे येविसीची आज्ञा.

प्रत्योत्तर राजश्रीची सेवा व पदाधिकारी पूर्वील पाटाप्रो ,कालानरुप करितील. "

( अष्टप्रधानांत ' पंत ' आले हे सांगणें नको च. )

( ई ) सन १६८२ त श्रीरामदासस्वामींचा परळी येथें अंतकाळ झाला, तेव्हा रामचंद्रपंतानें संभाजीच्या हुकमानें तेथें जाऊन स्वामींचा अंत्यविधि करविला. ( मराठी रियासत, भाग २ पु० ९ पृष्ट ३७२ )

( उ ) कागदपत्रें, लेखांक १६५– " आह्मी ( रामचंद्रपंत ) परळीस पूर्वी आलो ते प्रसंगी श्रीची उर्जा चालावी याकरिता गाव नेमन [illegible]

अनुकूलता करून दिल्ही ते प्रसंगी राजश्री दिवाकर गोसावी याच्या विषमानें श्रीकडील लिहिणीयाचा हुदा वतनी आहास करून दिल्हा दरमाहा पादशाही पाच होन प्रमाणे पावगावे असा नियत केला + + + अशास श्रीजवळी आम्ही लेखनवृत्तीचा हुदा करून घेतला तो निमित्य की श्रींच्या पादुका सानीध आमचे येक माणूस अहिर्णीसी असले पाहिजे ”

( ५ ) साकल्यानें हे पाच उतारे पाहिल्यास पताचा श्रीसमर्थांकडे कोणचा संबंध होता हें स्पष्ट होईल. एव च, श्रीसमर्थांच्या मठीं, ( या स्थलीं ), श्रीछत्रपतींच्या राज्यारोहणोत्सवीं ( या कालीं ) पताचें चरित्रकथन अप्रस्तुत होणार नाहीं अशी भावना आहे.

## चरित्र–कथन

( ६ ) श्रुति व कृति हा निसर्गाचा नियम : वृत्ती अतरात, कृति दृश्यात असा हा जननसबध दिसतो • त्या दोघाचा यथाकाल सबध जोडून दाखविणें ह्मणजे चरित्रकथन होय. वृत्ति ही आनुवंशिक असते तसी आनुषंगिक असते. पताच्या कुलकथेकडे पाहिलें तर ,नारायणाचे निळोपत हे बेदरी पातशाहाकडे होते. तेथें सोनवळची ठाणेदारी व मजमू त्याजकडे होती. पातशाहानें मेहेरबान होऊन आणिकी ठाणेदारी सांगितली. याउपरी कितेका दिवसानीं मुगर सोमाजी ( वतनावर देखरेख करणार ) याणें मारकरी घेऊन येऊन मौजे मादाणें येथें निळोपत होते त्यास व बायका, मुलें, चाकर, चटिकी देखील निळोपतास मारिलें. उरता नारोपताची स्त्री वरली ते तान्हें मूल घेऊन पळोन येऊन पुणियास आली.

( ७ ) हा मुलगा सोनाजीपत होय. ‘ मूळ पुरुषापासून पांचवा, ’ शहाजीचे पदरीं. “ कारकीर्द दादाजी कोंडदेव ” शिवाजींचे ते वजीर झाले. त्याचा मृत्यु इ. स. १६४५ त झाला. सोनाजीपतास दोन पुत्र ( १ ) निळोपत, ( २ ) आबाजी. हे दोघेही कर्तबगार निघाले.

( ८ ) निळोपंत हे शिवाजीचे दरबारांत सन १६४७ ते ७२ पर्यंत सचीव होते. यांचा शिक्का असा दोन प्रकारचा आढळतो.

श्रीरामचरण / नीळकंठ सोनदेव / शरण (व) श्रीरामचंद्रचरण / नीळकंठ सोनदेव / शरण

जंजिरे सिंधु दुर्गची सबनिसी यांस शिवाजींनी दिली होती. कांहीं दिवस शिवाजीचे मुजुमदार ही होते मौजे तादला येथील जोशी कुळकर्णी होता त्याचें नकल झालियावर दोन्ही वतनें रांयगडींचे मुकामीं दिडसे होन घेऊन विकत दिली.

( ९ ) निळोपंत यांची कामगिरी १६६० पासून दाखवितां येते. विजापूर पातशहाचे मुख्य कारभारी निळोपंताकडे स्वकार्याची याचना करितात. राजमाता जिजाबाईनीं सन १६७० त पूर्वीच इनाम चालू केलें. राजापूरबंदरीं असणारिया सौदागरियास दाभोळ बंदरी सरफराज होणें म्हणून सूचना सन १६७१ चे सुमारास केली. " राजश्री निळो सोनदेव यानीं थोरले कैलासवासी राजश्री स्वामीचे वेळेस या राज्या-निमित्त निःसीम श्रम साहास करून नूतन देशदुर्गादि संपादून राज्याभि-वृधी केली याकरितां थोरले कै. स्वामी त्यावरी कृपाळू होऊन मजकूरचा हुदा सांगोन बहुत प्रकारें चालविलें " ( वावडा दप्तर १-५२ ) हासनूरचे स्वारीचे प्रसंगीं जंजिरे सिंधदुर्ग नूतन वसविला ते समयीं पंडित निळोपंतावरी स्वामी कृपाळू होऊन याचे पुत्र रा. रामचंद्रपंडित यांचे नावें जंजिरे मजकूरची सबनिसी वतनी करून दिली. ( बा. द. १, ९५ )

( १० ) निळोपंतांच्या एकंदर कृतीसंबंधानें हें अल्प वर्णन झालें; यांडेसें त्यांचे वृत्तीकडे वळूं या. इ. स. १६६० त त्यांचा शिवाजीमहाराजाशी ' तह ' झाला. तो पाहूं या :—

राजश्री निळोपंत मजूमदार यास वतनीचा कारभार करावयास ठेविलें. माहोळीपासून भीमगडपावेतों व इंदापूर पुणें चाकण कदीम वतनीचा कारभार करावयासीं पंडित मशारनिल्हेनें साहेबासी आर्ज केला कीं आजि कामाचे दिवस आहेत वतनीचा कारभार आणिक कोण्हास

सागावा आपण बराबरी येउन दाहा लोक कामें कारितील तैसी करून देऊन गडघेणें पडिलें तरी घेउन देऊन ( देऊ ) त्यास साहेबीं उत्तर दिघलें कीं वतनी राहणें हें ही काम थोर आहे वतनी राहणें येथें तुह्मास बक्सीस इमारतीस पैके पावतील यावरी पंडित बोलिले कीं जरी वतनीचें ही काम थोर आहे तरी बहुत बरें येकानें सीध सरक्षण करावें येकानें साध्य करावें दोन्ही कामें साहेब बराबरीनें मानितातो तरी आपण वतनीं राहोन ( राहों ) परतु इमारतीचे पैके पावऊन बक्सीस घेणार नाहीं आपण कारभार करणें तो यैसा करून ( करू ) कीं जैसा आपले घरीचा खुतत कारभार त्यात फायदा समजून करीजेत आहे तसा करून ( करू ) साहेबीं मेहरबानी मात्र असो द्यावी ( या द. १ ले ४६ ) शितावरून भाताची परीक्षा.

( ११ ) निळोपताच्या पत्नीनें सहगमन केलें असें दिसते ( या द १ ले ४६ ) " मुरादपूर तर्फेदेवरुख येथें आपले ( रामचद्रपताचे ) मातेचें घृदावन आहे. याकरिता धर्मधरया निमित्य तें गाव स्वामीनें इनाम दिले आहे. "

निळोपताची पूर्वपीठिका व स्वत ची त्याची वृत्ति व वृत्ती आपण वर पाहिली. त्याचे घराण्यातील एक स्त्री, प्रसगावधान ठेवून, पुण्यास आली आणि " वीरसू " झाली. निळोपताचे कुटुबानें सहगमन केलें : अशा असाधारण वृत्तीच्या कुळात " रामचद्रपत " जन्मले : जन्मकाळ व अतकाळ आज निश्चिण्यास साधन नाहीं . कर्तृत्वाचा काळ निश्चित होतो तो इ. स. १६६८ ते १७२० म्हणजे ५२ वर्षांचा काळ कर्तृत्वात व्यतीत झाला त्याम्ती असेल, पण कमी नाहीं. तिकडे आता वळू या.

## रामचंद्र नीलकंठ

( १२ ) भारद्वाज गोत्र, आश्वलायन सूत्र, उपनामें अनेक आढळतात : वतनें मिळत गेलीं त्याप्रमाणें उपनामाव भर पडत गेली. भादाणेकर, भिवडीकर : हुदे-सरावरिळे त्यावरून मुजुमदार, अमात्य, हुकमत पन्हा :

या सर्वांतून शेवटली दोन आतां महत्त्वर आहेत : त्याच् नांवानें " रामचंद्र नीळकंठ अमात्य, हुकमत पन्हा " जग यांस ओळखितें.

( १३ ) कारकीर्द १६६८–१७२०

इ. स. १३।४।१६६८ जंजिरेसिंधुदुर्गची सबनिसी वतन दिली. मशारनिल्हे आपल्या मुतालिक जंजिरे मजकुरास पाठवितील ( बा. द. १ ले. ६ )

" ४।१२।१६८९ केलवडे येथील १ चावर जिराइत इनाम छत्रपतींनीं वंशपरंपरा दिली ( बा. द. १ )

" १६९० वाळव्या ' श्र कृष्णातीर, ' ओसाड पडलेलें पंतानीं पुनरच वसविलें ( भा. इफ १ पृ. ३५२ )

" २६।९।१६९१ ' तुह्मी घराणदार ' स्वामीचे पुरातन सेवक येकनिष्ठपणें वर्तत आहां यास्तव स्वामी तुह्मांवरी कृपाळू होऊन ता आजिरामह्यालाचें देशकुळकर्ण तुह्मांस नूतन अजरामह्यामती करून दिलें. ( बा. द. १ ले. २४ )

" १२।५।१६९२ " समस्तपदाती यांसीं आज्ञा केली ऐसिजे. पूर्वी कैलासवासी स्वामींचे वेळेस तुह्मी लोकीं कष्टमेहनत करून थोरथोर कामें करून दिल्ही आहेत. सांप्रत रायेगड हस्तगत करून घेणें हें कार्य बहुत च थोर आहे. येविसीं राजश्री रामचंद्र पंडित अमात्य यानी तुह्मांस सागितलें आहे. त्यावरून तुह्मी गड हस्तगत करून घ्यावयाच्या येत्नात आहां. येवढे कार्य अविलंब करून स्वामीस संतोषी करणें येविसीं राजश्री रामचंद्रपंतांस ही लिहिलें आहे. ते ही जे बेगमी करावयाची ते करतील. " (बा.द.१ले.२७)

इ. स. ८।२।१६९३ छत्रपति लिहितात " समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री रामचंद्रपंडित अमात्य: " पंत लिहितात " प्रस्तुत मोगलाचें ठाणें आहे प्राप्तवा विषये नाहीं. परंतु वडलांचें वतन आहे. ( पा. द. १ ले. २८ ) पंतांची वृत्ति ध्यानांत घेण्यासारखी आहे.

" २१।६।१६९३ " पंत यानीं स्वामीची सेवा बहुत एकनिष्टपणें केली आहे व या राज्याकारणें बहुत श्रम करून राज्याची अभिवृद्धिता पावविली आहे. या निमित्त स्वामी मशारनिल्हेवरी बहुत संतोषी होऊन याची स्त्रीस व कन्येस दोन गांव इनाम दिले.

" १६९४ सेनापती संताजी घोरपडे पंतास लिहितात:— आह्मास स्वामीनीं ( पंतानीं ) गौरविलें. पूर्वीपासून अंगिकार आमचा स्वामीनी केला आणि बंधु ह्मणविलें. ( पा द. १, ३० )

" ५।९।१६९४ राजश्री आवाजी सोनदेव यांस आज्ञा केली ऐसीजे. गडा किल्ल्याच्या परामर्षास मोस्तसार मनुष्य असावें ह्मणजे गडकिल्ल्याचा मामला चौकस होतो ऐसियास तुह्मी तीर्थस्वरूप कैलासवासी स्वामींचे वेळेपासून थोर थोर कार्यभाग करीत आले आहा. तुम्हास हा मामला सांगितल्यानें ययासांग होऊन येईल तुह्मी राजश्री रामचंद्र पंडित अमात्य यांचे आज्ञेनें किलेह्यांचा मामला चौकस करून गड तवाना राहेत ते गोष्ट करणें. (पा. द. १ ले. ३७)

इ. स. २२।६।१६९७ राजश्री रामचंद्र नीळकंठ हे स्वामींचे पुरातन सेवक. स्वामींचे राज्यवृद्धीते पावावें ऐसा च हेत धरून आंतःकरणपूर्वक स्वामीसेवा करीत आहेत. राज्यवृद्धीस कारण हे सेवक ( वा. द. १ ले. ३९ )

" ६।४।१६९९ सांप्रत स्वामी कर्नाटक प्रांतीहून या प्रांतास आले. या प्रसंगें राजगडप्रांतीच्या देशदुर्गांचें संरक्षण करून नूतन देशदुर्गादि संपादन जाहले पाहिजे या करितां त्या प्रांतें राजश्री रामचंद्र पंडित अमात्य यांस पाठविलें. ऐसा विचार जाहला याकारितां पंत मशारनिल्हेची रवानगी केली. ( वा. द. १ ले. ४४ )

" ७।४।१६९९ तुही स्वामीनिमित्य व स्वामीच्या राज्यानिमित्त असाधारण श्रम करून स्वामीचें राज्यवृद्धीस पाविलें. कर्नाटकप्रांतें स्वामी असतां सेना पाठऊन स्वामीचें संकट वारिलें इ. ( वा. द. १ ले. ४)

" २२।५।१७०८ महिन्याभरांत अमात्याचे विनंतीवरून श्रीशिवछत्रपती ( दुसरे ) हे चिटनवीस, प्रतिनिधी, सेनापती इत्यादिकांस दर्शनास बोलावितात. ( वा. द. १ ले. ७३ ते ७६ )

" १७१३ राज्यांतील अंतर्गत व्यवस्थेंत अमात्य राजआज्ञा च चालवीत आहेत. (ले. ८२, ८३, ८४)

" २०।५।१७१४ सौ. जानकीबाई यांसी–श्रीराजाशिवछत्रपती ( कोल्हापूर )–" तुमचे भतार राजश्री रामचंद्र पंडित हुकमत पन्हा हे स्वामीच्या राज्यांतील पुरातन धुरंधर सेवक. स्वामीच्या राज्याभिवृद्धीविषई साहास करीत आहेत. तुम्हांस ही

"स्वामीचा अभ्योदये व्हावा हा च निजध्यास आहे." (बा. द. १ ले. ८५)

इ.स. १४।१०।१७१४ शंभूछत्रपती (कोल्हापूर)— पंडित हुकमत पन्हा यांची वतनी सवनिसी परंपरेनें चालविणें स्वामीस आवश्यक. (बा. द. १ ले. ९५)

" १७१५ दोन लेख— "त्यास सांप्रत देहावर येऊन निष्ठेनें वर्तानें सर्व अन्याय क्षमा करून अभयपत्र पाठविलें. (२) अभय देऊन आणिला आणि गांवावर पाठविला. हे लेख पंताची उदार मनोवृत्ती दर्शवितात. (बा. द १ ले. ७३, ७४)

" १७१६ त "आज्ञापत्र"—"मराठेशाहींतील राजनीति" हा अनुभवपूर्ण ग्रंथ लिहून काढिला. ग्रंथाची योग्यता अपूर्व आहे : मराठेशाहीचा इतिहास त्यांत साठविला आहे : अनुभव व तत्वज्ञान सुसंगत झाली आहेत : इतरत्र दोहोंत फाटाफुट असते.

" १७२० छत्रपतीस यादी सादर करून पंत बाहेर पडले. (राजवाडे खं. ८ ले. ८१) येणेंप्रमाणें चालावें. धणियाची क्रिया सत्य होईल. आम्ही एकनिष्ठेनें सेवा करूं. नाहीं तर रोजदीं निरोप द्यावा.

## उपसंहार

(१४) इ. स. १७२० नंतरची पंताची कामगिरी आजमितीस प्रस्तुत लेखकास अज्ञात आहे. आणि ही कामगिरी देशसेवा व देवसेवा या दृष्टीनें केवढ्या मोलाची आहे हें खालील उताऱ्यावरून दिसून येईल:—

(अ) "तुर्कीकरणात पुंडावे होऊन प्रांत वेराण पडला. महाराष्ट्रधर्म रहाया ऐसें नव्हते. त्यावेळेस फिरंगी व हपशी हे ही प्रांतात

धर्म उच्छेद करावयास आले होते. तेव्हां सरखेल साहेबांचे पुण्यप्रतापें स्वधर्मरक्षणार्थ थोर थोर मातबर सरदार जमा होऊन शामलाची क्षिती केली ( आडिवरेकर दीक्षित यांचे कागदपत्र स. १६९८ )

( आ ) " कोणाचें ही न्यून पडूं दिलें नाहीं : व कोणासमागमें खटला न केला. याप्रमाणें पांच वर्षे दुःखाचीं घालविलीं. उपरांतिक सुभिक्ष प्रसंग होत चालला. महाराज राजश्री राजाराम चंदी प्रांतीं असतां राजश्री रामचंद्र पंडित अमात्य विशाळगडी राहून संपूर्ण कोंकणप्रांत प्रवेश केला होता, त्यास दहशत लावून निःशेष घालविला.

कुडाळप्रांत ही राजश्री नरहर कृष्ण मुतालीक दिमत पंत प्रतिनिधी व राजश्री सखोजी नाईक जगताप यास जमावासहवर्तमान पाठवून खेमसांवत यांस हाती घेऊन कुडाळीं मोंगल होता तो पराभवातें पावविला. प्रांतमजकूर कबदस्त जाहला. मनुष्यास जाण्यास व यावयास मुलुखगिरीमध्यें रहावयास जागा जाहला. सुभिक्ष काळ दृष्टीनें पाहिला. ( पत्रें, यादीवगैरे ४२१ काव्येतिहास संग्रह )

( इ ) विशाळगड मुक्कामीं रामचंद्र पंडित अमात्य यानीं महाराजांच्या सेवेसी विनंती करून संताजी घोरपडे यास सेनापतिपद देविलें. ( काव्ये. ४१६ )

( ई ) हिम्मतबहादर विठोजी चव्हाण यास वस्त्रें दिलीं. रामचंद्रपंत अमात्य यांचे दिमतीस स्वाधीन केलें. ( काव्ये ४२२ )

( उ ) " राजश्री रामचंद्रपंडित यानी थोरले महाराजासंनिध कोण रीतीनें वर्तणूक केली हे लोकोत्तरे कीर्तिप्रख्यात आहे. माहाराज राजश्री या प्रांतीतून चंदीप्रांतें जाणें जालें. त्या समयीं संपूर्ण राज्य व लोक लोकपाळस्वामित्व राजश्री पंडित मशारनिल्हे याचे गळा घालोन खासा स्वामींनी चंजीप्रांतें स्वारी केली. त्यामागें सकळ रिपुवर्ग याचा उद्भव जाहला. ते समयीं येवन उन्मत्त होते त्यास इत्यादि अमर्यादकास शासनें करून त्याचा संहार करून दंमसर्द केलें. राज्यरातींनें राखिलें.

तदोत्तर माहाराज राजश्रींचें आगमन चंजीहून या प्रांतें जालें. तेव्हां पंडित मशारनिल्हे यानी बहुतविशेशात्कारें नम्रता धरून जातेसमयीं राज्य व लोक लोकपाळ व गड किले स्वाधीन केले होते त्याप्रमाणें धण्याचे धण्यासंनिध वोपून आपण विनीतप्रकारें होऊन पुढें सेवकास आज्ञाकर्तव्य कार्ये ह्मणवून पंडित मशारनिल्हे याणीं विनंती केली हे किमर्थ कीं आपण ब्राह्मणलोक परंपरागत सेवक, जीवित हें क्षणभंगूर आहे. ज्या धणियाचे कृपाजळें हें पद प्राप्त झालें त्यासी निमकहराम न होता कल्याणाभिवृद्धी इच्छिल्यानें आपल्यास श्रेयस्कर येणें करून धर्म अर्थ काम मोक्ष चतुर्विध पुरुषार्थ प्राप्त होतात. मागें पुढें कोणी दूषण ठेवींना येसें अम्यंत:करणें निरेकें वर्तत आले. जे हें श्रीचें वरदीराज्य यासी दिलें. कोणी अधर्मकर्तव्यतेस प्रवर्तले त्याचा गर्व हत होऊन पराभव पावते झाले. याकरिता धण्यासी मर्यादेनें असावें. येसें चित्तास आणून तुमचे वडील चालत आले. तुह्मास ही पंडित मशारनिल्हे याणीं सकळ कला विद्यासंपन्न केलें च होतें. ( या द. २ ले. ११७ )

श्रीसमर्थमठीं–श्रीसमर्थवाग्देवतामंदिरीं ( पंतांचें आज्ञापत्र समाविष्ट असलेल्या )–छत्रपतींच्या राज्यारोहणाचे मंगळ प्रसंगीं पंतांचें स्मरण करून त्याचें अल्प चरित्र " महाराष्ट्रास " सादर केलें असे.



( १७ )

# विरक्त श्रीसमर्थ

( लेखक—रा. न. वा. शिदोरे, एम्. ए., बी. टी., धुळें )

## ( १ ) प्रस्तावना

### ( अ ) विषयाचें महत्व

विरक्ति आणि श्रीसमर्थ यांचा सकृद्दर्शनी किस्येक अभ्यासकांस विरोध वाटेल. गीतारहस्यकारांनीं ज्यांना कर्मयोगाचें संपूर्ण व यथार्थ स्वरूप समजून घ्यावयाचें असेल त्यांनीं समर्थांच्या काव्याकडे धाव घ्यावी, ( १ ला सुमनहार पा. १४ ) अशा अर्थाचें विधान केल्यापासून निवृत्तिधर्म विरुद्ध प्रवृत्तिधर्म असे दोन प्रकार कल्पिण्यांत येऊन निवृत्तिधर्माची विषयत्यागाशीं व वैराग्याशीं सांगड घालण्यांत आली व प्रवृत्तिधर्माचाच फक्त व्यवहाराशीं व राजकारणाशीं संबंध आहे, असें मानण्यांत येऊं लागलें. अर्थात् जो कोणी विरक्त असेल तो जग ही माया मानतो आणि म्हणून प्रत्यक्ष व्यवहारातील उलाढालींच्या दृष्टीनें त्याचें तत्वज्ञान निरुपयोगी म्हणून क्वचित् त्याची हेटाळणीही होऊं लागली. श्रीसमर्थांच्या वाङ्मयाच्या कांहीं अभ्यासकांनीं त्यांना प्रवृत्ति-धर्माच्या प्रचारकांत घातल्यामुळें अर्थातच ते या मायामिथ्यावादी तत्ववेत्त्यांचे विरोधक बनले !

परंतु श्रीसमर्थांविषयींचे त्याच्या निकटवर्ति भक्तांचे उद्गार, त्याचें वाङ्मय व त्याचें चरित्र यांचा अधिक खोल अभ्यास केल्यास वरील दृष्टी पतकरताना शब्दांची तारतम्युद्ध योजना झाली नाहीं, असें आपणांस आढळून येईल.

म्हणून, प्रथम श्रीसमर्थांचा व विरक्तपणाचा किती संबंध होता याचे काहीं दाखले देतो —

( १ ) श्रीसमर्थांचे उद्धवसुतानीं आपल्या अष्टकात ' शुकासारिखें पूर्ण वैराग्य ज्याचें ' असें वर्णन केलेलें सुप्रसिद्ध आहे.

( २ ) प्रत्यक्ष समर्थांनीं

( अ ) दासबोधाच्या १ ल्या दशकाच्या १ ल्या समासात— म्हणजे तज्ज्ञानीं ज्या समासाला ' दासबोधाची प्रस्तावना ' म्हटलें आहे त्या भागात—दासबोध ' श्रवण केलियाचें फळ ' सागताना

' योगियाचें परम भाग्य । अंगीं बाणे तें वैराग्य । '

अशी एक फलश्रुति सागितली आहे.

याशिवाय दासबोधात अनेक ठिकाणीं विरक्ताविषयींचे उल्लेख आहेत.

( आ ) आपल्या कवितासग्रहात वैराग्याच्या तत्वज्ञानाचें बरेच विशदीकरण केलें आहे.

( ३ ) श्रीसमर्थ शके १५४२ त लग्नसमारभातून पळाल्यापासूनचें त्याचें चरित्र, त्याची समर्थसाप्रदायिकाजवळ असलेली तत्कालीन चित्रें, त्याचें स्मारक म्हणून रामदासीयानी परिधान केलेला भगवा वेष या सर्व गोष्टी त्याच्या विषयत्यागी व विरक्त आचाराची खात्री पटवितात.

( ब ) निबंधाचा हेतु

प्रस्तुत निबधामध्यें, भारतीय तत्वज्ञानाच्या विचारपरपरेमध्यें वैराग्याच्या तत्वज्ञानाचें कोणचें स्थान होतें हें ठरवून नतर समर्थपूर्वकालीन तत्ववेत्त्यानीं व सतकवींनीं या विचारश्रेणींत कोणची भर टाकली हें सागून शेवटीं श्रीसमर्थांनीं या विविध विचाराच्या सृष्टींत कोणचें स्थान पटकाविलें होतें व त्याच्या विचारानुसार त्यानीं कोणची कामगिरी केली हें विशद करण्याचा प्रयत्न मी करणार आहें.

## ( २ ) भारतीय तत्वज्ञानाचे आधारभूत ग्रंथ व मुख्य प्रमेयें:—

### ( अ ) ग्रंथ

गीतारहस्यकार म्हणतात " प्रस्थानत्रयी ( उपनिषदें, वेदांतसूत्रें व भगवद्गीता ) म्हणजे निवृत्ति व प्रवृत्ति मिळून दोन्ही मार्गांचे पद्धतशीर व तात्त्विक विवेचन करणारे वैदिकधर्माचे तीन मुख्य आधारभूत ग्रंथ किंवा खांब होत. " अर्थात् सर्व भारतीय तत्ववेत्त्यांचा मुख्य भर या प्रस्थानत्रयींवर असणार. आतां, यांतील आपल्या विषयाच्या दृष्टीनें उपयुक्त अशा मुख्य प्रमेयाचा या ठिकाणीं निर्देश करतो.

### ( ब ) मुख्य प्रमेयें

या प्रस्थानत्रयींत कर्मनिष्ठा, ज्ञाननिष्ठा व भक्तिमार्ग या सर्वांचा ऊहापोह कमी अधिक प्रामुख्यानें आला असून कांहीं प्रमेयें सर्वांमध्यें सामान्य अशी आढळतात. त्यापैकीं प्रमुख म्हणजे अद्वैतवाद व मायामिथ्यावाद होत. सारांश, ज्ञाननिष्ठा व भक्तिमार्ग या दोघांत प्रमुख -गणली गेलेली विरक्ति हिला प्रस्थानत्रयींत एक विशिष्ट स्थान दिलें गेलें होतें. तेव्हां, भारतीय तत्वज्ञानाच्या अगदीं उगमापाशीं विरक्तीचा एक विचारप्रवाह आपणांस आढळतो, असें म्हणण्यांत अतिशयोक्ति नाहीं.

## ( ३ ) श्रीमत् भगवद्गीतेंतील वैराग्य

प्रस्थानत्रयींतील या एका ग्रंथाचा कर्मयोगपर अर्थ मान्य करूनही वैराग्याला त्यांत एक मोठें स्थान आहे, हें विसरतां कामा नये. ज्ञानप्राप्तीनंतर लोकसंग्रहार्थ, धर्मरक्षणार्थ व जगाची रहाटी चालू ठेवण्यासाठीं कर्में करणें जरूर आहे, इतकेंच नव्हे तर अपरिहार्य असा भगवंताचा संदेश आहे. परंतु हीं कर्में करीत असतांना ज्या एका मनोभूमिकेची अत्यंत जरूर आहे, असें श्रीकृष्णाचें म्हणणें आहे त्याचें विशदीकरण लोकमान्याच्याच भाषेत खालीं देतो:—

" कर्म कोणत्याही प्रकारचें असो तें करण्याची इच्छा व आपला उद्योग न सोडतां आपणास जें काय करावयाचें तें फलाची हांव न ठेवितां,

परिणामीं प्राप्त होणाऱ्या सुखदुःखास सारखेच तयार राहून निःसंगबुद्धीनें करीत गेलें म्हणजे तृष्णा किंवा असंतोष यांच्या अनिवार्यपणामुळें होणारे दुष्परिणाम टळतात इतकेंच नव्हे तर तृष्णेबरोबर कर्माचा हि नाश केल्यानें जग उध्वस्त होण्याचा जो प्रसंग येतो तो हि न येतां मनोवृत्ति शुद्ध राहून सर्वभूतहितप्रद होत असतात. फलाशा याप्रमाणें सोडण्यास हि वैराग्यानें इंद्रियांचा व मनाचा पूर्ण निरोध करावा लागतो, हें निर्विवाद आहे. पण इंद्रियें ताब्यात ठेवून स्वार्थाऐवजीं वैराग्यानें व निष्कामबुद्धीनें लोकसंग्रहार्थ त्यांना आपआपले व्यापार करूं देणें आणि संन्यासमार्गाप्रमाणें तृष्णा मारण्यासाठीं इंद्रियांच्या सर्व व्यापारांचा म्हणजे कर्माचा आग्रहानें समूळ नाश करणें या दोहोंमध्यें जमीनअस्मानाचें अंतर आहे. गीतेंत जें वैराग्य व जो इंद्रियनिग्रह सांगितला आहे तो पहिल्या प्रकारचा आहे, दुसऱ्या प्रकारचा नव्हे."

( गीतारहस्य पा. ११२, ११ )

गीतेंत सांगितलेल्या निष्कामबुद्धीचा वैराग्य हा केवढा बळकट आधार आहे हें वरील उताऱ्यावरून स्पष्ट होत आहे. म्हणून च प्रस्थानत्रयींचें सामान्यविवेचन केल्यानंतर गीतेचा निराळा उल्लेख केला आहे.

### ( ४ ) वैदिक काळानंतरचे कांहीं विरक्त

वैराग्याच्या तत्वज्ञानानुसार ज्यांनीं आपलें आचरण आमरणान्त ठेविलें अशा कांहीं विरक्तांचा उल्लेख येथें करावासा वाटतो.

( १ ) वर्धमान महावीर — या धर्मसंस्थापकाचा काळ इ. स. पूर्वी ५ व्या शतकांत येतो. राजकुळांत जन्म झाला असून सर्वसुखाचा त्याग करून त्यानें अरण्यवास पतकरला व दोन वर्षांच्या घोर तपानंतर 'अहिंसा परमो धर्मः' या तत्वाचा त्यानें प्रचार केला.

( २ ) गौतमबुद्ध—हा राजपुत्र महावीराचा जवळ जवळ समकालीन होता. या जगांतील दुःखें प्रत्यक्ष पाहिल्यामुळें त्याचें मन उद्विग्न झालें व बाल्यपणापासून अंगीं असलेल्या औदासिन्याला मर्यादा

येऊन त्यानें हि अरण्यवास पतकरला. तेथें ५ वर्षे घोरतप केलें व नंतर एकदम एके दिवशीं बोधिवृक्षाखालीं बुद्ध धर्माचा संदेश त्याला मिळाला. समता, अहिंसा, भूतदया वगैरे त्याच्या धर्माचीं मुख्य लक्षणें सर्वविश्रुत आहेत.

वास्तविक भारतीय तत्वज्ञानाच्या बुद्धतत्वज्ञान व महावीर-तत्वज्ञान या दोन शाखा होत. आचरणदृष्ट्या मात्र विरक्त पुरुषांच्या कांहीं मानसिक अवस्थांचे नवीन प्रकार त्यांच्या चरित्रांत पहाण्यास सांपडतात. आपल्या विषयाच्या दृष्टीनें त्या महत्वाच्या असल्यामुळें खालीं त्यांची नोंद केली आहे. त्या अवस्था येणेंप्रमाणें —

( १ ) जगांतील दु:खामुळें मनाची उद्विग्नता.
( २ ) एकांतवासाची आवड.
( ३ ) ज्ञानप्राप्ति.
( ४ ) ज्ञानप्राप्तीनंतर अहिंसा वगैरे तत्वानुसार वर्तन.

## ( ५ ) श्री शंकराचार्यांचें तत्त्वज्ञान व आचार

वैदिक तत्वज्ञानानें सांगितलेल्या अनेक मार्गांपैकीं ज्ञानमार्गावर श्री शंकराचार्यांनीं जास्त भर दिला, हें सुप्रसिद्ध आहे. मुख्य प्रश्न ज्ञानप्राप्तीनंतर कर्मे सोडावयाचीं कीं करावयाचीं हा आहे आणि त्यांस श्रीमदाद्यशंकराचार्यांचें उत्तर पहिल्या प्रकारचें आहे. हें उत्तर त्यांनीं अद्वैतवाद व मायामिथ्यावादावर बसविल्यामुळें हे दोन वाद त्यांच्या विचारसरणीचे आधारस्तंभ समजले जातात.

या तत्ववेत्याचा आचार हि उल्लेखनीय आहे. ब्रह्मचर्याश्रमांतून सन्यासाश्रमांत त्यांनीं एकदम उडी घेतल्यामुळें त्यावेळीं [ इ. स. ८ वें शतक ] चोहींकडे माजलेल्या कर्मठपणाला मोठा धक्का बसला व मोक्षप्राप्तीसाठीं त्यांच्या मतें जरूर असलेल्या ज्ञानोत्तर विरक्तीचें महात्म्यहि लोकांना पटूं लागलें. शिवाय, प्रांतोप्रांतीं हिंडून त्यांनीं केलेला वैदिक धर्मप्रचार व मठस्थापना ही कामगिरीहि उल्लेखनीय आहे.

## (६) विरक्त तुकाराम महाराज—चरित्र व तत्वज्ञान

बुद्धधर्माच्या -हासानंतर भक्तिमार्गाचें पुनरुज्जीवन ज्या संतमंडळींनीं केलें त्यांचे श्रीज्ञानेश्वर महाराज हे आद्य प्रणेते होऊन गेले. परंतु त्यांनीं आपलें तत्वज्ञान ' भाष्यकारातें वाट पुसत ' रचिलें असल्यामुळें त्यांच्याविषयीं अधिक लिहिण्याचें, आपल्या विषयाच्या दृष्टीनें, कारण उरत नाहीं.

या भक्तिमार्गी संप्रदायाचा कळस म्हणून तुकाराम महाराजांचा उल्लेख केला जातो. त्यांनीं आपल्या तत्वज्ञानानें व आचरणानें वैराग्याच्या विचारसरणींत कोणची भर घातली हें आतां पाहूं.

चरित्र:—

तुकाराम महाराजांच्या वयाचीं पहिलीं २१ वर्षे इतर कोणच्याहि सामान्य संसारी माणसाप्रमाणें गेलीं. या काळांतील वैशिष्ट्यच सांगावयाचें झाल्यास बाल्यावस्थेंतील खेळांची आवड व नंतर वाण्याचा धंदा चालविण्यांत त्यांनीं दाखविलेलें कौशल्य या दोन गोष्टींचा निर्देश करतां येईल. २१ व्या वयानंतर त्यांच्यावर अनेक आर्थिक व सांसारिक आपत्ती आल्या. शके १५५१ व ५२ या दोन वर्षी चाकण व देहू प्रांतांत मोठा दुष्काळ पडला. ' पाऊस मुटला गेला, ढोरं परागंदा होऊं लागले ' असें या दुष्काळाचें वर्णन रा. राजवाड्यांच्या ' मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें ' खंड १५ मध्यें सांपडतें. या दुष्काळामुळें तुकाराम महाराजाच्या धंद्यात मोठी तूट आली. शिवाय पत्नी रखुमाबाई व मुलगा संताजी यांच्या मृत्युमुळें त्यांच्या संसाराची वाताहत झाली. या सर्व दु:खामुळें त्यांचें मन ऐहिक व्यवहारांतून उडून अध्यात्मप्रवण झालें. अर्थात्, उरलेलें आयुष्य त्यांनीं भगवच्चिंतनांत व परमेश्वरस्तुतीपर अभंग रचण्यांत घालविलें. हें कार्य करीत असतांना त्यांना अनेकांचा विरोध सहन करावा लागला.

तत्वज्ञान--

वर दिलेल्या रूपरेषेवरून तुकाराम महाराजांचें वैराग्य मुख्यें संसाराविषयींच्या अनासक्तीत आहे, असा कोणी निष्कर्ष काढील.

परंतु नुसतें लग्न न करणें किंवा संसार सोडून जाणें व भगवीं वस्त्रें नेसणें यांत वैराग्य नसून एक प्रकारच्या मानसिक ठेवणींत आहे, हें मागेंच वर्णन केलेल्या बुद्धादि विरक्तांच्या उदाहरणांवरून स्पष्ट होईल. आतां, तुकाराम महाराज यांना विरक्त या नात्यानें कोणचा दर्जा होता तें पाहूं. याच दृष्टीनें त्यांचें तत्वज्ञान न्याहाळितांना त्यांच्या वाङ्मयाच्या प्रत्यक्ष अभ्यासापेक्षां प्रथम त्यांच्या च सांप्रदायांतील इतर संतांचा इतिहास पहाणें जरूर ठरतें. अंबरीष, प्रल्हाद, अंगद, उद्धव आणि नामदेव असे ते संत होत. अंबरीषापासून नामदेवापर्यंतची अध्यात्मिक प्रगती खालीलप्रमाणें होतीः—

( १ ) अंबरीष–परमेश्वरभक्तीची आसक्ति.
( २ ) प्रल्हाद–देहेबुद्धि जाऊन सगुणाची पूजा.
( ३ ) अंगद–विश्वात्मक चैतन्य आकारास आलें.
( ४ ) उद्धव–मुक्तीची हि आसक्ति सुटली.
( ५ ) नामदेव–सगुणभक्तिप्रेमाचा पुतळा.

अशा रीतीनें, पायरी–पायरीनें ही संतमालिका अध्यात्मिक सोपान चढत होती. नामदेव महाराजांना कोणच्याही क्षणिक गोष्टींची आसक्ति उरली नव्हती. परंतु परमेश्वराच्या सगुणदर्शनाशिवाय त्यांना सुचत नसे.

आतां, तुकाराम महाराजांच्या ठिकाणीं झालेली प्रगति पहातांना, आपणांस त्यांच्या वाङ्मयाच्या मननांत वर्षन् वर्ष घालविलेल्या चरित्रकारांची च मदत घेतली पाहिजे. एरवीं, काळाच्या तडाक्यातून वाचलेल्या कांहीं अभंगांची संगति लावणें सामान्य वाचकांस दुरापास्त होईल. म्हणून चरित्रकारांनीं च दिलेली प्रगति विचारांत घेतांना प्रथम ' जीव ' आणि ' शिव ' यांचीं भिन्न लक्षणें लक्षात ठेवावयास हवीं. जीव एकदेशीय असून त्याला तिन्ही काळाची उपाधि होऊं शकते, पण आत्मा हा व्यापक स्वरूपाचा असून निरुपाधिक असतो. तुकाराम महाराजांच्या ठिकाणीं जीव व आत्मा एकरूप झाले होते, याला च जीवशिवाचें ऐक्य

असें म्हणतात. समर्थ याला च सिद्धावस्था म्हणतील.गीतेंत जी स्थितप्रज्ञाची अवस्था वर्णन केली आहे ती ही च होय. अशा रीतीनें, देहबुद्धि व जीवबुद्धि उडून जाऊन त्या ठिकाणीं जीवशिवाचें ऐक्य येणें ही तुकाराम महाराजांच्या वैराग्याची पहिली पायरी होय. ही पायरी गाठल्यामुळें च ते कोणच्याहि कायाक्लेशामुळें किंवा अपमानामुळें परमेश्वरभक्तीपासून ढळले नाहींत हें त्यांच्या चरित्रातील अनेक उदाहरणावरून स्पष्ट आहे.

परंतु या ऐक्यात त्यांचें चिरंतन समाधान झालें नाहीं. ते म्हणतात

"अद्वैतीं तों माझें नाहीं समाधान ।
गोड हे चरणसेवा तुझी ॥ २८८४, १

तेव्हा त्यांचें नामस्मरण हें चिरंतन आनंदाची पुन: पुन: प्रतीति येण्यासाठी होतें.

त्याचें विरक्त या नात्यानें जीवन कशा तऱ्हेचें होतें हें खालील अभंगात दिसेल.—

वैराग्याचा अंगीं झालासे संचार ।
इच्छी वनांतर सेवावया ॥ २९१२—१
का जी-माझें करूं नये समाधान ।
वियोगानें मन शिणतसे ॥ २

त्यांनी जो इतरास नामस्मरणाचा उपदेश केला त्यात विरक्ताची एवढी उच्च भूमिका गृहित नसून संसारावरील आसक्ति उडणें हा जो वैराग्याचा लौकिकार्थ तो च अर्थ गृहित आहे.

तेव्हा, विरक्त या नात्यानें त्यांची भूमिका व जीवन हें आपण पाहिलें. त्याचप्रमाणें स्वत. विरक्त होऊन इतरास नामस्मरण करण्याचा, एकादशीव्रताचा व पदरांची माळ कर्टी धारण करण्याचा त्यांनी उपदेश केला हेंही लक्षात ठेविलें पाहिजे. सारांश, तुकाराम महाराजांचें वैराग्य हें नुसतें प्रपंचाविषयींच्या अनासक्तींत नसून तें निरिच्छ किंवा निष्क्रियही नव्हतें

(७) विरक्तीचे अनेक प्रकार —

आतापर्यंत आपण चर्चिलेले विरक्तीचे अनेक प्रकार पुनः सूत्ररूपानें पाहिल्यास श्रीसमर्थांचा या प्रकारात दर्जा कोणचा होता हें समजण्यास सोपें जाईल. म्हणून आतापर्यंतच्या चर्चेचा सारांश खालीं देतोः—

(१) प्रस्थानत्रयी-विरक्तीला ज्ञाननिष्ठा व भक्तिमार्ग यांत स्थान.

(२) भगवद्गीता-विरक्ति निष्कामबुद्धीचा बळकट आधार.

(३) बुद्ध, महावीर-(अ) संसाराच्या दुःखानें मन उद्विग्न.
(ब) एकांतवास.
(क) ज्ञानप्राप्ति.
(ड) अहिंसा वगैरे तत्वानुसार वर्तन.

(४) श्रीमदाद्यशंकराचार्य-ज्ञानोत्तर विरक्ति.

(५) श्रीतुकाराममहाराज—
(अ) संसाराच्या दुःखानें मन उद्विग्न.
(ब) जीवशिवाचें ऐक्य.
(क) नामस्मरणावर आसक्ति.
(ड) नामस्मरणाचा उपदेश.

(८) श्रीसमर्थांचा विरक्त या नात्यानें दर्जा

श्रीसमर्थांचा विरक्त या नात्यानें दर्जा ठरविण्यास त्यांचें चरित्र व त्यांच्या वाङ्मयांत आलेलें तत्वज्ञान आपणास अवलोकिलें पाहिजे. परंतु या दोहोंचा ही जो जो अभ्यास करावा तो तो आपल्या अभ्यासाचें वैगुण्य च प्रत्ययास येतें. म्हणून, त्यांच्या वैराग्याच्या तत्वज्ञानाचें व चरित्राचें येथें स्थूलपणें च अवलोकन केलें आहे, असें समजावें.

तत्वज्ञान :—

श्रीसमर्थांच्या तत्वज्ञानांत वैराग्याला केवढें श्रेष्ठ स्थान होतें याचा प्रत्यय आपणाला वारंवार त्यांच्या वाङ्मयात येतो. परंतु हें सर्व तत्वज्ञान

अगदीं सूत्ररूपानें त्यानीं आपल्या कवितेंतील ओव्याशतरू चौथ्यांत सांगितलें आहे. मनुष्य विरक्तावस्थेला कोणच्या पायऱ्यांनीं जाऊ शकेल याचें विवरण त्यांनीं त्या भागात केलें आहे. त्या पायऱ्या अशा —

( १ ) देहाचा अभिमान—' साक्षरूपें वर्तता ' हा अभिमान जातो, मग

( २ ) लिंगदेहे—याची निवृत्ति ' साक्षरूपें होतसे '

( ३ ) साक्षरूप—' सर्व पदार्थ जाणता '

आतां या जाणपणस्थितींतून आत्मस्थितीकडे कसें जावयाचें ? समर्थ म्हणतात —

नव्हे जाणीजेसे ऐसेंचि जाणावे । मग होये ठावे समाधान ॥ १७

आत्म्याच्या ठिकाणीं जाणपण नाहीं, आत्मा मनाला ' अगोचर ' आहे. ही आत्मस्थिति अंगीं बाणली म्हणजे ' शाश्वताची प्रीति ' व ' विषयीं विरक्ति ' धरावी. वैराग्य हें त्यागाचें लक्षण आहे हें जाणून भक्ति व ज्ञान दोन्ही एकरूप झाल्यानंतर समर्थांच्या मतें—

( ४ ) खरी आत्मस्थिति प्राप्त होते.

ही सर्व परंपरा न्याहाळिल्यावर गीतेंतील खालील उद्गाराची आठवण होते.

इन्द्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः ।
मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ( अ ३ )

अशा रीतीनें, मनुष्य विरक्त स्थितीला कसा जातो हें सांगून समर्थांनीं आपल्या तत्त्वज्ञानाची इतिश्री केलेली नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे समर्थांच्या मतें

कोण पुसे यापा ज्ञान हें शाब्दिक

एवढी च नुसत्या शब्दज्ञानाची महती आहे. वर उल्लेखिलेल्या त्यांच्या कवितासंग्रहाच्या प्रकरणात च त्यांनीं शब्दज्ञानाचा निषेध करून नवविधाभक्तीचें दासबोधप्रमाणें च परंतु सूत्ररूपानें विवरण केलें आहे व

इतक्या उच्च स्थितीला पोचलेल्या विरक्तानें हि लोकसमुदायांत शब्दज्ञानाला किंमत नाहीं हें जाणून

**सत्य जाण भक्ति शरीरें करावी । आवडी धरावी सगुणाची ॥ ६२**

अशा तऱ्हेचा उपदेश केला आहे. हीं सर्व सगुणोपासनेचीं कर्में करीत असताना बाह्योपाधींचा त्याग करावा आणि आपले नित्यनेम, कुळधर्म आणि ' साधनाची वाट ' सोडूं नये असा हि उपदेश करून या च मार्गानें अखेरची मुक्ती म्हणजे सायोज्यमुक्ती प्राप्त होईल असा निर्वाळा त्यानीं दिला आहे. या प्रतिपादनावरून आपणांस समर्थांचे वैराग्याचें तत्वज्ञान व गीतेंतील विचारसरणी यांतील साम्य दिसून येईल. श्रीसमर्थ ज्या त्यागानें विरक्तास स्वकर्में करण्याचा उपदेश करतात त्याला च भगवंतांनीं निष्काम-बुद्धि म्हटलें आहे. सारांश, भगवंताचा ' कर्मयोगी ' व समर्थांचा ' त्यागी विरक्त ' हे दोघे हि एका च दर्जाचे पुरुष ठरतात.

या शिवाय, श्रीसमर्थांनीं वैराग्याच्या महात्म्याचें श्रीमद्दासबोधांत अनेक ठिकाणीं वर्णन केलें आहे. त्यांतील प्रमुख ठिकाणें अशीं:—

( १ ) बद्धाची मुमुक्षाच्या स्थितींत प्रगति होण्यास तो ' संसारीं विरक्त ' व्हावा लागतो (द. ५ स. ८)

( २ ) मुमुक्षाच्या स्थितीनंतर साधकास हि वैराग्यबळ अहंकार वगैरे दुर्गुणांचा त्याग करण्यासाठीं अंगीं आणावें लागतें

(द. ५ स. ९)

( ३ ) दासबोधांतला १२ वा संबंध दशक विवेकवैराग्याचें प्रतिपादन करण्यासाठीं त्यानीं लिहिला आहे. या दशकांत वैराग्यापूर्वींच्या अनेक सूक्ष्म अध्यात्मिक प्रश्नांचें निरसन आलें आहे. मुख्य प्रश्न विवेक आणि वैराग्य यांच्या अन्योन्यसंबंधाचा आहे. त्या बाबतींत त्यांचें मत असें:—

> विवेकेविण वैराग्य केलें । तरी अविवेकें अनर्थी घातलें ।
> अवघें वेर्थचि गेलें । दोहिकडे ॥ ६ (द. १२ स. ४)

वैराग्येविण ज्ञान । तो वेथींचे साभिमान ।
लोभ दंभें घोळसून । कासाविस केला ॥ ९

विवेकें अंतरीं सुटला । वैराग्यें प्रपंच तुटला ।
अंतर्बाह्य मोकळा जाला । निःसंग योगी ॥ १२

अशा रीतीनें, विवेकाशिवाय वैराग्य आणि वैराग्याशिवाय ज्ञान हे दोन्ही समर्थांना नापसंत आहेत. परंतु या दोघांचें सहकार्य झाल्यावर 'शापादपि शरादपि' अशाच तऱ्हेचा अध्यात्मिक पराक्रम करतां येईल, असें त्यांचें निश्चित मत आहे.

( ४ ) 'आधीं प्रपंच करावा नेटका' अशा तऱ्हेची विचारसरणी अनेक ठिकाणीं श्रीसमर्थांनीं व्यक्त केल्यामुळें संसारांतील दुःखाबद्दल त्यांना इतर साधुसंतांप्रमाणें निश्चिति वाटत नव्हती, असा संदेह उत्पन्न होण्याचा संभव आहे. परंतु दासबोधाचें लक्षपूर्वक पारायण केल्यास संसाराबद्दल अनासक्ति हा विरक्तांच्या स्थितीचा जो पहिला टप्पा त्याबद्दल हि समर्थांचें मत अत्यंत स्पष्ट आहे, असें आढळून येईल. द. ३ मधले अनेक समास संसारांतील दुःखांच्या वर्णनांचे आहेत. हीं सर्व वर्णनें करून १० व्या समासांत त्यांनीं आपलें निश्चित मत अत्यंत तीव्र शब्दांत व्यक्त केलें आहे.

संसार म्हणिजे महापूर । माजी जलचरें अपार ।
डंखू धावती विखार । काळसर्प ॥ १ ॥

त्याचप्रमाणें द. ५ स. ४ मधल्या खालील ओंव्या उल्लेखनीय आहेतः—

संसारसुखें सुख जालें । ऐसें देखिलें ना ऐकिलें ।
ऐसें जाणोन अनहित केलें । ते दुःखी होती स्वयें ॥ १०१ ॥

संसारीं सुख मानिती । ते प्राणी मूढमती ।
जाणोन डोळे झांकिती । पडत मूर्ख ॥ १०२ ॥

( ५ ) विरक्ताचीं विविध लक्षणें ( द. २ स. ९ )

हें प्रकरण समर्थांच्या तत्वज्ञानाचें वैशिष्ट्य म्हणून सांगता येईल. समर्थांची विरक्ताची कसोटी किती कठिण होती याची जाणीव या प्रकरणात आपणास होते. हीं सर्व लक्षणें अंगीं नसल्यास ' पढत मूर्खता ' पदरीं येते असें हि त्यानीं वजाविलें आहे. या लक्षणाचे माझ्या दृष्टीनें विचारणीय असे तीन च नमुने देतो —

( १ ) विरक्तें धर्मस्थापना करावी.

( २ ) विरक्त चतुर असावा.

( ३ ) विरक्तें समय जाणावा.

श्रीसमर्थांच्या वैराग्याच्या तत्वज्ञानाचा सारांश—

श्रीसमर्थांचें वैराग्याचें तत्वज्ञान कसें होतें याचें थोडेसें दिग्दर्शन वर केलें आहे. आता समर्थपूर्वकालीन तत्वनेत्यांनीं प्रतिपादिलेल्या विचारप्रणालींत समर्थांच्या तत्वज्ञानाचें कोणचें विशिष्ट स्थान होतें तें पाहूं.

( अ ) साम्य स्थलें—

( १ ) गीतेंतील निष्कामबुद्धि व समर्थांची त्यागपूर्वक विरक्ति एकच होय.

( २ ) शंकराचार्यांचे अद्वैतवाद व मायामिथ्यावाद समर्थांच्या वैराग्याच्या तत्वज्ञानाचे मुख्य आधार आहेत.

( ३ ) श्रीतुकाराम महाराजांच्या अभंगाप्रमाणें च संसारांतील दु:खांची हृदयद्रावक वर्णनें समर्थवाङ्मयांत सांपडतात. दोघेही या दु:खांची जाणीव होऊन संसारांतून मुक्त होणें ही विरक्तीची १ ली पायरी समजतात.

( ब ) भेदस्थलें—

खालील गोष्टी इतरत्र इतक्या प्रामुख्यानें आढळत नाहींत.

( १ ) श्रीसमर्थांनीं आपल्या तत्वज्ञानांत वैराग्याला दिलेलें प्रमुख व सर्वश्रेष्ठ स्थान.

( २ ) विवेक आणि वैराग्य यांची सांगड.

( ३ ) विरक्ताचीं लक्षणें.

या भेदस्थलांवरून समर्थांचें वैराग्य हें नुसतें एकांतवासांतलें वैराग्य नसून समोंवतालच्या व्यवहारांतील उलाढालींना इष्ट कलाटणी देणारें एक बलवत्तर साधन होतें, हें स्पष्ट होत आहे. या एका आधारावरून च समर्थांचें तत्वज्ञान 'राजकारणपर' होतें असें कोणी म्हटल्यास, अतिशयोक्ति होणार नाहीं.

श्रीसमर्थांची त्यांच्या तत्वज्ञानानुसार कामगिरी—

घोलोनियां मुखें तैसी क्रिया करी। धन्य तो संसारी ब्रह्मज्ञानी ! ५९।
( श्लो. द. ४ )

असा समर्थांचा नेहमींचा दंडक असल्यामुळें वर चर्चिलेल्या तत्वज्ञानानुसार त्यांनीं केलेल्या कामगिरीचें आतां सिंहावलोकन करावयाचें आहे. या कामगिरीचें महत्व आपणांस नीट उमजावें म्हणून तिची पार्श्वभूमिका हि आपण न्याहाळिली पाहिजे. ही पार्श्वभूमिका म्हणजे, समर्थकालीं जी देशस्थिति होती त्यांतील आपल्या विषयाच्या दृष्टीनें उल्लेखनीय भाग खालीं देतो.

श्रीसमर्थकालीन देशस्थिति—

श्रीमदाद्यशंकराचार्यांनीं ज्ञानोत्तरविरक्तीचा उपदेश केल्यापासून त्या पंथाचे अनेक सांप्रदायिक आपल्या देशांत झाले होते. परंतु या सांप्रदायिकांमध्यें कांहीं निष्ठावंत निष्क्रियवादी व कांहीं ढोंगी व आपमतलबी प्रचारक निघाल्यामुळें मुख्यतः चार अनिष्ट पंथांचा प्रादुर्भाव झाला होता. हे चार पंथ म्हणजे— ( १ ) केवळ शब्दज्ञानी ( २ ) देशस्थितीची पर्वा न करतां नुसतेच जपतपांत गर्क झालेले ( ३ ) या दोहोंचेही ढोंग करणारे ( ४ ) अध्यात्मविद्येचें ढोंग करणारे व चमत्कार करणारे.

श्रीतुकाराम महाराज व एकनाथ महाराज यांना अशा या पंथांपासून किती उपद्रव झाला होता, हें सर्वश्रुत आहे. गुरु श्रीसमर्थांनीं आपल्या

काव्यांत अनेक ठिकाणीं या सर्व पंथांपासून अलिप्त रहाण्याची धोक्याची सूचना आपल्या शिष्यवर्गास दिली आहे. उदाहरणार्थ द. ५ स. २ मध्यें गुरुलक्षणें सांगितलीं आहेत. त्याचबरोबर गुरु कोण नाहीं याचा हि निर्देश आहे. नमुने:—

(१) जे करामती दाखविती। तेहि गुरु म्हणिजेती।
परंतु सद्गुरु नव्हेती। मोक्षदाते ॥ १

(२) अद्वैतनिरूपणें अगाध वक्ता। परी विषई लोलंगता।
ऐसिया गुरूचेनि सार्थकता। होणार नाहीं ॥ ३१

(३) निशेष दुराशा तुटे। तरीच भगवंत भेटे।
दुराशा धरितो ते चोरटे। शब्दज्ञाने कामिक ॥ ३६

अशा गुरूंचा निषेधः—

शिष्यास न लाविती साधन। न करविती इंद्रियेदमन।
ऐसे गुरु आडक्याचे तीन। मिळाले तरी त्यजावे ॥ ३१

अशा तऱ्हेनें, लोकसमुदायाला भलत्या च मार्गांनीं नेणाऱ्या स्वार्थसाधु लोकांचा व कांहीं अनिष्ट सांप्रदायिकांचा सुळसुळाट त्यावेळेला झाला होता.

श्रीसमर्थांना दिसलेल्या देशस्थितीच्या इतर लक्षणांचा उल्लेख इतरत्र अनेक ठिकाणीं आला आहे. त्यामध्यें धर्माचा नाश, परकीयांचे हल्ले, स्वजनांची स्वधर्म पराङ्मुखता या गोष्टी आपल्या विषयाच्या दृष्टीनें लक्षांत ठेवाव्या. पार्श्वभूमिकेच्या एवढ्या विवरणानंतर त्यांच्या विरक्त या नात्यानें कामगिरीचें महत्व आपल्या ध्यानांत आतां येईल.

चरित्राची रूपरेषा—(दासबोधाची प्रस्तावना)

शके १५३० जन्म

१५४२ विवाहसमारंभांतून पलायन

१५४२ ते १५५४ पुरश्चरण

१५५४ ते १५६६ पर्यटण

१५६६ ते १६०२ कृष्णाकांठीं चापळ खोऱ्यात निवास, मारुतीस्थापना, मठस्थापना वगैरे.

त्याच्या अगदच्या वैराग्याच्या सुप्तलहरी बाल्यावस्थेंत हि जागृत होत पण व्यक्तपणें चरित्रदृष्ट्या श्रीसमर्थांचे विरक्त या नात्यानें जीवन १५४२ पासून सुरू होतें, असें समजण्यास हरकत नाहीं. १५४२ ते ६६ एक अवस्था व ६६ च्या पुढें २ री अवस्था अशा दोन वैराग्याच्या अवस्था त्यांच्या जीवनात होत्या, असें दिसतें या ठिकाणीं थोडासा सूक्ष्म भेद म्हणून असा नमूद करावासा वाटतो कीं, काहीं पूर्वविरक्तांप्रमाणें संसारातील दु:खाचे विशिष्ट नमुने दृग्गोचर झाले म्हणून समर्थांच्या ठिकाणीं विरक्तीचा उदय झाला नाहीं तर त्यांच्या कुलांत पिढ्यान् पिढ्या जी सगुणोपासना चालू होती तिचेंच विरक्तीचा प्रादुर्भाव हें फळ होय श्रीतुकाराममहाराजांच्या बाबतीत हि ही परंपरागत परमेश्वरोपासनेची कारणमीमांसा लावता येईल पण त्याच्याचबरोबर प्रतिकूल परिस्थितींचा वेढा त्यांच्याभोंवती पडल्यामुळें त्यांचें मन संसारसुखाच्या आभासापासून दूरावलें व तेथेंच तुकाराममहाराजांच्या वैराग्याचा प्रादुर्भाव झाला या गोष्टी नाकारण्यात अर्थ नाहीं.

कामगिरी—

असा तऱ्हेनें, समर्थांचें जीवन वैराग्याच्या एका च भावनेनें प्रेरित झालेलें होतें. १५४२ नंतर आयुष्याच्या अखेरपर्यंत विरक्ताच्या जीवनाचे जे मूलभूत नियम दासबोधाच्या द. २ स. ९ मध्यें त्यांनीं दिले आहेत ते त्यांनीं ततोतंत पाळल्याचा पडताळा त्यांच्या चरित्रातील भागन् भाग पहाणारास येईल, असा भरवसा प्रस्तुत लेखकास वाटतो. उदाहरणार्थ म्हणून त्यांची मठस्थापनेपुरती च कामगिरी घेऊ या मठस्थापनेचे समर्थां-नंतर कांहीं अनिष्ट परिणाम घडून आल्याचें प्रो. श. वा. दांडेकर यांनीं

२ ऱ्या सुमनहारांत नमूद केले आहेत. हे परिणाम मान्य करून सुद्धां समर्थकाव्यांत या घटनेचें महत्व किती होतें हें आपण पाहूं. समर्थकालीन देशस्थितीचें अवलोकन करतांना वैराग्याच्या व निवृत्तीच्या नांवाखालीं कशी नाना ढोंगें या देशांत माजलीं होतीं हें आपण पाहिलें आहे. या ढोंगांचा एक परिणाम असा झाला कीं; भोंवताली परकीयांचे सर्व बाजूनें हल्ले चालू असतांना हे संत म्हणविणारे लोक देशस्थितीविषयीं उदासीन होते व त्यांच्या औदासिन्याचा व शैथिल्याचा परिणाम सर्व महाराष्ट्रभर होत होता. अशा या स्वधर्मपराङ्मुखतेच्या कालांत श्रीसमर्थांनीं मठस्थापना करून या मठांतून प्रांतोप्रांतीं कशा तऱ्हेचे प्रचारक पाठविले असतील याचें उत्तर दासबोधांतील द. २ स. ९ देईल. तें उत्तर म्हणजे या मठांत धर्मस्थापना करणारे, प्रसंग ओळखणारे, चतुर विरक्त तयार होत होते व ते सर्वत्र या समर्थप्रणीत वैराग्याचा संदेश फिरवत होते.

> विरक्तें विरक्त धुंडावे। विरक्तें साधु वोळखावे।
> विरक्तें मित्र करावे। संत योगी सज्जन॥ २४

अशा तऱ्हेनें विरक्तांचे प्रचंड मेळे तयार होत होते. तेव्हां समर्थांनीं महाराष्ट्रांत या विरक्तांच्या मदतीनें स्वधर्माविषयीं उन्माद व आदर वाढविला हें त्यांच्या कामगिरीचें रहस्य ठरतें. या एका च गोष्टीवरून त्यांच्या च कसोटीप्रमाणें समर्थ विरक्त पुरुषाचे आदर्श ठरतात, एवढें च नव्हे तर वैराग्याचे सगुणरूप च त्यांच्या कामगिरींतून भासमान होऊं लागतें.

## ( १० ) उपसंहार—

प्रस्तावनेंत प्रस्तुत लेखकानें ध्वनित केल्याप्रमाणें खरा निवृत्तिधर्म किंवा वैराग्य आणि व्यवहार व राजकारण यांत मूलतः विरोध नाहीं व केव्हां हि नव्हता. त्याच प्रमाणें भारतीय तत्वज्ञानाच्या अनेक विचारप्रवाहांपैकीं वैराग्याचा विचारप्रवाह आयुष्याला निरुपयोगी आहे हें

विधान हि भ्रममूलक आहे. हा दोन्ही तऱ्हेचा भ्रमनिरास समर्थांनीं आपल्या वैराग्याच्या तत्वज्ञानानें, वैयक्तिक आचारानें व कामगिरीनें केला हें पटविण्याचा हेतु धरून हा निबंध लिहिला आहे.



( १८ )

# श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील
# वाल्मीकि रामायणाची प्रत श्रीसमर्थांच्या हातची

— संभवांतून निश्चितीकडे —

( लेखक—गोपाळ रावजी गोगटे, बी. ए., एल्‌ एल्‌. बी. भुसावळ )

धुळें येथील श्रीसमर्थवाग्देवतामंदिराची 'अधिष्ठात्री देवता' म्हणून, श्रीसमर्थभक्त शं. श्री. देव, हे ज्या ग्रंथाला मान देतात, तो ग्रंथ म्हणजे तेथील संग्रहांतील अनुक्रमांक ६५३ चें 'रामेण रामदासेन लिखितं वाल्मीकि रामायणम्' होय. हें रामायण, त्यांना कसें उपलब्ध झालें, याची चमत्कारिक हकीकत, रामदासी संशोधनाच्या द्वितीय खंडांत पान ७३ ते ८० यावर, 'श्रीरामदासी संशोधनाचें उपान्त्य फल' या सदराखालीं त्यांनी दिलेली आहे, ती पुस्तकांच्या वाचनांत आली असेल. परंतु, पुढील विवेचन नीट समजण्यास मदत व्हावी म्हणून, तिचा सारांश देणें अवश्य वाटतें, म्हणून तो देतों.

## रामायणप्राप्तीची चमत्कारिक हकीकत

रा. शंकरराव देव हे गेले ३५ वर्षे रामदासी संशोधनाचें काम करीत आहेत. सुमारें पंधरा वीस वर्षांमागें इंदूरबोधन मठाधिकारी श्रीसमर्थदास यांचे मार्फत बीड मठांतून, त्यांनीं एक सप्तकांडात्मक वाल्मीकिरामायणाची पोथी मिळवली. त्यातील सात कांडाचे लेखनकाल खालीलप्रमाणें होते.

| | | |
|---|---|---|
| बाळकांड | शके १५४४ | |
| अयोध्याकांड | ,, १५७१ | |
| अरण्यकांड | ,, १६९१ | |
| किष्किंधाकांड | ,, १६९२ | |
| सुन्दरकांड | ,, १५४५ | |
| युद्धकांड | ,, १६९३ | |
| उत्तरकांड | ,, १६९४ | |

असा हा लेखनकाळाचा विस्कळितपणा पाहून एक कोडेंच पडलें व तें कसें सुटावें या विचारांत ते असतां त्याच श्रीसमर्थदासांमार्फत पुढें बीड मठांतील कांहीं कागदपत्रें श्रीदेव यांस मिळालीं, त्यांत बीड मठाधिकारी, भिमाजी गोसावी यांनीं आपले बंधु येसोबा गोसावी यांस लिहून दिलेले, असे दोन महत्वाचे कागद, वाटणी संबंधाचे होते. एक कागद शके १६५३ चा होता, व दुसरा शके १६६६ चा होता. या दोन कागदांवरून असें आढळून आलें कीं, समाईक जिनगींत, वाल्मीकिरामायण ग्रंथसंख्या २४००० व अध्यात्मरामायण ग्रंथसंख्या ६०००, असे जे दोन ग्रंथ होते, त्यांची वाटणी होऊन, येसाजीचे वाटणीस, वाल्मीकिरामायणापैकीं बाळ, अयोध्या, व सुंदर अशा ३ कांडांमिळून ९००० ग्रंथ व अध्यात्मरामायण ६००० असा १५००० ग्रंथ आला व भिमाजीचे वाटणीस, वाल्मीकिरामायणाचीं बाकीचीं चार कांडें, ग्रंथसंख्या १५००० अशीं आलीं. हे भिमाजी व येसाजी, समर्थप्रतापकार गिरिधर याचे बंधु होत. गिरिधर हे १६५१ त समाधिस्थ झाले होते.

असें दिसतें कीं, येसाजी यांचे कडे जीं मूळ पोथीचीं बाळ, अयोध्या व सुन्दर अशीं कांडें आलीं, त्यांत भरती घालून सबंद सात कांडांचा ग्रंथ व्हावा म्हणून बाकीचीं चार कांडें पुढें नकलून त्यांत सामील केलीं गेलीं व या नकललेल्या कांडांचे लेखनकाळ शके १६६६ चे वाटणीनंतरचे शके १६९१, १६९२, १६९३, १६९४ असे अर्थात् लिहिले गेले.

याप्रमाणें वरील दोन वाटणीचे कागदावरून प्रथम मिळालेल्या या वाल्मीकिरामायणाचे पोथींतील लेखनकाळाचा विस्कळितपणा कां दिसतो या

कोथ्यांचा उलगडा तर झाला. परंतु आतां बाकीचीं मूळ चार कांडें कशीं प्राप्त व्हावीं याची चिंता लागून बीडास अनेक तऱ्हेनें रा. देवांनीं तपास चालविला; परंतु त्या चार कांडांचा पत्ता लागेना. ज्यांच्या वांट्यास तीं कांडें गेलीं त्या भिमाजीच्या मठांत तीं असणार अशी त्यांस खात्री वाटे, परंतु कांहीं थांग लागेना. परंतु शेवटीं त्यांच्या प्रयत्नांना यश आलें. सन १९३४ मध्यें बीडास जाऊन बीड येथील भिमाजीबावांच्या परंपरेंतील मठांत अस्ताव्यस्त पडलेला संग्रह सन १९३४ मध्यें हस्तगत करून श्री. देवांनीं धुळ्यास रवाना केला व आपला दौरा आटपून परत आल्यावर, त्यीं संग्रहाची विल्हेवाट लावतां, त्यांत नेमकीं तींच चार कांडें अवचितपणें सांपडलीं!

याप्रमाणें, शके १६६६ चे फा. शु. ११ पासून, विभक्तपणाचे हाल भोगीत असलेलीं हीं ३ कांडें व ४ कांडें, अशीं एकंदर सात कांडें, शके १८५६ च्या वैशाखांत म्हणजे सुमारें १९० वर्षांनीं, समर्थभक्त शंकरराव देव, यांचे हातांत हात घालून; एकमेकांस भेटलीं; व श्रीसमर्थ-वाग्देवतामंदिरांत, त्या ग्रंथासाठीं निर्मिलेल्या सिंहासनावर, त्याच श्री. देवांचा हात धरून, ज्येष्ठ शु. १३ स विराजमान होऊन सर्वांच्या आदरास पात्र झालीं. एकंदरींत, ही अघटित घटना श्री. देवांच्या दीर्घ तपश्चर्येनें झालेल्या समर्थकृपेचें च दृश्य फल होय, यांत संशय नाहीं.

## ग्रंथाची वाटणी कां झाली?

हल्लींच्या या काळांत, देवदेवतार्चन व जुन्या पोथ्या, यांची वाटणी करणारांना, लोक वेड्यांतच काढतील. पेपरवेट म्हणून, जेथें लंगड्या बाळकृष्णादिक देवांच्या मूर्तींचा उपयोग केला जातो व घरांतील अडगळ म्हणून जुन्या पोथ्यांची संभावना होते, तेथें वरील वाटणी करणारे बंधु, भिमाजी व येसाजी, हे अव्यवहारी ठरल्यास नवल नाहीं. इतकेंच नव्हे, तर आपल्या वाटणीस आलेल्या ३ कांडांच्या भरतीसाठीं, बाकीचीं चार कांडें लिहिणाऱ्यांनीं, काळाचा निवळ अपव्यय केला, असा निकाल देण्यासही, आजचे लोक कचरणार नाहींत, हें खरें. पण पूर्वीचा काळ

असा नव्हता. उत्तम उत्तम ग्रंथ स्वहस्तानें लिहून, आपले घराण्यात ठेवणें, हें एक महत्वाचें काम समजलें जाई, व अशा ग्रंथाची नित्य पूजा अर्चा चाले. इतर जिनगीपेक्षा, बहुमोलाची जिनगी म्हणून, ती समजली जाई व वाटणी करतांना, इतर मौल्यवान वस्तूप्रमाणें, आपला हिस्सा त्यात मिळविण्यास, जो तो टपत असे. शिवाय, या ग्रंथासंबधानें विशेष लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट अशी होती कीं, हा ग्रंथ समर्थ रामदास स्वामींनीं, स्वहस्तें लिहिलेला असल्याची माहिती उभयता बंधूंना होती. अर्थात् गुरु परंपरेनें आलेला हा ग्रंथ, फार पूज्य व मौल्यवान म्हणून जतन केला गेला होता. व इतर जिनगीची वाटणी करताना, ह्या पवित्र ग्रंथाचा बरोबर निमा हिस्सा मिळविण्यासाठीं, वरील दोनी पत्रात दिसून येणारी दक्षता, अनाठायीं नव्हती, असेंच म्हणावें लागते. येसाजीचे वाटणीस आलेल्या ३ कांडाचे भरतीसाठीं, नकललेलीं बाकीचीं चार कांडें, भिमाजीच्या वाटणीस गेलेल्या चार कांडावरून च, नक्कलून घेतलेलीं आहेत, दुसरी कोणती तरी रामायणाची प्रत मिळवून नकललेलीं नाहींत. ही गोष्टही लक्षात ठेवण्यासारखी आहे. समर्थांनीं स्वहस्ताक्षरें लिहिलेलें सर्व रामायण, आपले घराण्यांत नसलें तरी त्यांनीं स्वतः लिहिलेलीं तीन, व त्याच्याच ४ कांडाची नक्कल मिळून, समर्थांचें सर्व रामायण, आपले पाशीं आहे, हें समाधान त्यात व्यक्त होतें.

## या ग्रंथाचें स्वरूप

या रामायणाचीं सातही कांडें मिळून एकंदर ७१० पत्रें आहेत. पत्राचा आकार १०॥" × ६" असा आहे. पत्राचा मुख्य गाभा कसा आहे, याची बरोबर कल्पना व्हावी म्हणून, वर नमूद केलेल्या संशोधनाच्या पान ७३ ते ८० सोबत पान ७६ पुढें, रा. देवांनीं, एका पानाचें छायाचित्र दिलेलें आहे. त्या चित्रावरून समर्थांच्या अक्षराचा

१ हीं नक्कललेलीं ४ कांडें वाग्देवतामंदिरात अनुक्रमांक ६५४ म्हणून ठेवलेलीं आहेत तीं आम्ही त्याचे मूळाशीं ताडून पाहिलीं तीं तंतोतंत मूळाशीं जुळतात.

कल्पना होते, व शिवाय तें छायाचित्र बालकांडाच्या अखेरच्या पत्राचें असल्यामुळें, " रामेण रामदासेन लिखितमिदं पुस्तकम् " अशी त्यावर स्वहस्तलेखनाची मुद्रा केल्याचा प्रत्यय हि येतो.

## सात कांडांचा लेखनक्रम, ग्रंथसंख्या, काल व लेखक

| मुखपृष्ठावरील नांव व ग्रंथसंख्येचे आकडे | लेखन कधीं संपलें | लेखकाचा उल्लेख |
|---|---|---|
| १ आदि (२८५०) | शके १५४४ माघ शु. १३ | रामेण रामदासेन लिखितम् |
| २ अरण्य (४१५०) | शके १५४४ माघ व. १२ | रामेण रामदासेन सह गोपीनाथेन |
| ३ किष्किंधा (२९२९) | शके १५४५ आश्विन व. १० | रामेणलिखितम् |
| ४ सुंदर (२०४५) | शके १५४५ मार्ग. शु. १ | रामेण रामदासेन |
| ५ युद्ध (४५००) | शके १५४६ वै. शु. ३ | रामेण परोपकारार्थम् आलेखि |
| ६ उत्तर (३९६०) | शके १५६७ का. शु. १० | रामेण रामचरितं प्राप्तं यदुकुलोद्भवम् |
| ७ अयोध्या (४१७०) | शके १५७१ फा. व. ७ | राघवनाम्ना कश्चित्सत्पुरुषचरणानुचरः तेन आलेखि |

वाचकाचे सहज लक्षात येईल कीं, रामायणात अयोध्याकांडाचा क्रम, दुसरा असता, येथें तें अगदीं शेवटीं लिहिलें आहे. वरील कोष्टकांतील पहिलीं पाच कांडें, सुमारें १॥ वर्षांत लिहून संपविलीं आहेत व त्यानंतरचीं दोन कांडें अनुक्रमें २१ व २५ वर्षांनंतर संपविलीं आहेत. ग्रंथसंख्येचे आकडे याच पोथींतील मुखपृष्ठावर लिहिलेले दिले आहेत. हे संख्येचे आकडे आदिकांडाचे अ. ३ वरून कोणी उतरले आहेत. परंतु हें परंपरागत परिगणन वस्तुस्थितीशीं जमत नाहीं, असें

विद्वानांनीं ठरविलें आहे. प्रत्यक्ष मोजणींत, अरण्य कांडाचे श्लोक २५५८ आम्हांस आढळून आले.

## ग्रंथाची पारख करण्याची अवश्यकता

समर्थांचें व शिवाजीमहाराजांचें हस्ताक्षर फार दुर्मिळ आहे, व तें पोटभर पाहातां व वाचतां येईल, इतकें विपुल सांपडावें, अशी प्रत्येक महाराष्ट्रीयाची अपेक्षा आहे. त्या दिशेनें संशोधकांचे प्रयत्न चालू आहेत. कल्याणस्वामींनीं लिहिलेल्या दासबोधांत, समर्थांनीं स्वहस्तें कांहीं शोध घातले आहेत, तेवढ्यावर, व श्रीशिवाजीमहाराजांचीं कांहीं पत्रांचे अखेर 'मोर्तबसुद' अशीं हस्ताक्षरें आहेत, तेवढ्यावर आपण या थोर पुरुषांचीं अक्षरें पाहिलीं असें समाधान, महाराष्ट्र नाइलाजानें, मानून घेत आला आहे. परंतु समर्थांचे हस्ताक्षराचे बाबतींत, रा. देव यांस सापडलेल्या त्या वाल्मीकिरामायणानें, अल्पसंतुष्ट राहाण्याची, जरूर राहिलेली नाहीं. येवढा थोरला ग्रंथ मिळून, अगदीं आकण्ठ तृप्ती होण्याचा, ईश्वरकृपेनें हा सुयोग घडून आला आहे.

पण एखाद्या दरिद्र्याला लॉटरीनें अगर अन्य तऱ्हेनें अचानक विपुल द्रव्याचा लाभ झाल्यास, प्रथम तो जसा भांबावून जातो व मी पाहातों हें स्वप्न तर नाहींना, माझें येवढें भाग्य कुठलें, असे संशय मनांत येऊन, तो स्वतःलाच चिमटे घेऊन आपण जागृत आहोंत, झोंपेंत नाहीं, अशी खात्री करून घेतो अगर लॉटरींतला आपले तिकिटाचा नंबर अनेकांना दाखवून पुनः पुनः खात्री करून घेतो. तशी च आज आपली या प्रकरणीं स्थिती झाली आहे. जेथें एखाद दुसरें समर्थांचें पत्रहि दृष्टीस पडत नव्हतें, तेथें अचानकपणें येवढा मोठा ग्रंथ सांपडतां च 'आपणास भ्रांती तर पडत नाहींना ?' 'आपण खरे च कां इतके भाग्यवान आहो ?' असे संशय उत्पन्न होऊन आपण गांगरून गेलों आहोंत. परंतु एका अर्थीं आपण स्वप्नांत नसून सत्यसृष्टींत आहोंत ह्याची खात्री करून घेणें, वाईट नाहीं. परिणामीं वेडे ठरून घेण्यापेक्षां,

आधीं च जास्त चौकसबुद्धि चालवून सत्य काय आहे, याचा छडा लावणें बरें. हल्लींचें युग चिकित्सेचें आहे. कोणती हि गोष्ट, शाबीत झाल्याशिवाय, ती प्रमाण मानण्यास कोणी तयार नाहीं. आणि तें एकप्रकारें युक्त आहे.

परीक्षेविणें बांधलें दृढ नाणें
परी सत्यमिथ्या असें कोण जाणें ( मनाचे श्लो० १४३ )

असें समर्थांचें च सांगणें आहे. प्रचीती घ्यावी, प्रत्यय पाहावा, यावर समर्थांचा मोठा कटाक्ष आहे. तेव्हां हा ग्रंथ समर्थांनीं च लिहिला कशावरून, याचा काय तो निर्णय व्हावा म्हणून, रा. देव याची, जरी तो समर्थांनीं लिहिला याबद्दल, खात्री होती तरी— त्यांनीं एका मंडळाची, सन १९३८ चे वाग्देवतामंदिराचे वार्षिक सभेंत, नेमणुक करून घेऊन, त्या मंडळाकडे हें काम सोपविलें. या मंडळांत रा. रा. ज. स. करंदीकर, प्रो. वनहट्टी, प्रो. न. र. फाटक, नानासाहेब घारपुरे, पंडित सातवळेकर, श्रीसमर्थदास, तात्यासाहेब भट व मी स्वतः इतके होतों. मंडळानें एकमतानें निर्णय दिला कीं.—

" सर्व प्रमाणांचा विचार करता, समितीचें मत असें आहे कीं, ही प्रत समर्थांच्या च हातची असण्याचा बळकट संभव आहे. "

वरील संभवतेच्या क्षेत्रांतून, निश्चिततेच्या क्षेत्रांत, आणखी प्रयत्न केल्यास, जाता येईल, असें मला वाटलें व त्या दिशेनें मी या रामायणाचें थोडें परिशीलन केलें व मला जो काहीं निष्कर्ष काढता आला तो विवेचनासह सादर करीत आहें. मी निष्कर्ष काढूं शकलों तो असा कीं, एकंदर ग्रंथापैकीं निदान ⅔ भाग श्रीसमर्थांच्या हातचा आहे.

## विवेचन

आपण विचार विषय असा मांडू कीं —

हें वाग्देवतामंदिरांतील अनुक्रमांक ६५३ चें वाल्मीकि रामायण, समर्थ रामदासस्वामींनी स्वहस्ताक्षरें लिहिलें आहे कीं नाहीं ?

यांतील ' अस्ति ' ' नास्ति ' अशा दोन्ही पक्षांचें म्हणणें मांडणें जरूर आहे. साधारणतः, ' अनेक संशयच्छेदी परोक्षार्थस्य दर्शनम् ' म्हणजे प्रथम संशय असतील ते फेडून, नंतर सिद्धांत पक्ष सांगावा, असा क्रम असतो. त्याप्रमाणें प्रथम, ' हें रामायण समर्थांचें नसावें, ' असें म्हणणाऱ्या नास्तिपक्षाचें म्हणणें काय आहे, याचा अनुवाद करून व त्यांतील अपुरेपणा दाखवून, मग ' हें समर्थांनीं च लिहिलें आहे ' असें म्हणणारा अस्ति पक्ष याचें म्हणणें पाहूं.

## नास्ति पक्षाचें म्हणणें

( १ ) समर्थ जांबसारख्या एका खेड्यांत बाराव्या वर्षापर्यंत होते—पैठण अगर काशी अशा विद्यापीठाच्या गांवीं नव्हते—त्यांना संस्कृताचा गंध हि जांब सोडतांना नसेल. त्यांच्या जन्मतिथीवरून पाहतां, आदिकांड पुरें झालें त्या वेळीं त्यांचें वय १४ वर्षें १० महिने व ४ दिवस इतकें होतें व ते त्या वेळीं टाकळीस पुरश्चरण करीत होते. येवढ्या लहान वयात त्यांनीं २८५० श्लोकांचें आदिकांड लिहून काढणें, शक्य नाहीं.

( २ ) या रामायणातील हस्ताक्षर पाहतां, तें इतकें सुंदर स्वच्छ, ठसठशीत आहे कीं, जसे काहीं मोत्याचे सर च.

सदट सघन वोळी अक्षरें दाटघेटा ।
सरळ सगट याची धाटुटा आणि मोटा ।
अचुक चुकत नाहीं पुस्तकीं शोध नाहीं ।
बहुत विचरितां ही वेंग कांहीं च नाहीं ॥

असें जें करुणाष्टक १५४ मध्यें सुंदर लेखकाचें वर्णन आहे, तें पुरेतेपणीं लागू पडण्या इतका, सुंदर रीतीनें लिहिलेला हा ग्रंथ आहे. एखाद्या संस्कृतज्ञ सराईत वाक्बगार प्रौढ लेखकाला हि, असें लिहितां येणें कठिण. तेव्हा समर्थांच्या सारख्या १५।१६ वर्षांच्या अल्पवयी मुलाकडून असें लिखाण होणें शक्य नाहीं.

( ३ ) समर्थांच्या काळांत सर्व विद्या हस्तलिखित ग्रंथावरून चाले व ते अति दुर्मिळ असत. त्यांतून वाल्मीकि रामायणासारखा ग्रंथ मिळणें महादुर्घट. तेव्हां असा हा बहुमोल ग्रंथ, घरून पळून आलेल्या, व टाकळीस राहून नाशकास माधुकरी मागणाऱ्या, ज्याला ठाव ना ठिकाण, अशा अल्पवयस्क, पोराला नकल करण्यास तरी कोण देणार ?

( ४ ) समर्थांनीं गायत्रीपुरश्चरणाचा संकल्प केलेला होता. तें अन्हिक आटपावयाचें, पुन्हा नाशीक पंचवटीकडे भर उन्हांत माधुकरीसाठीं जावयाचें, हीं कामें आटोपतां आटोपतांच त्या लहान मुलाचा जीव मेटाकुटीस येत असेल. त्याच्याचानें १। अगर १॥ वर्षांत आदि, अरण्य, किष्किंधा, सुंदर व युद्ध या पांच कांडांचे मिळून जे १५।१६ हजार श्लोक होतात, तेवढे लिहून होणें शक्य नाहीं.

( ५ ) युद्धकांड शके १५४६ वै. शु. ३ ला लिहून संपल्यानंतर हि, सुमारें ७८ पर्वें टाकळीस पुरश्चरण संपेपर्यंत समर्थ जर होते, तर त्यांनीं राहिलेलीं २ कांडें, त्यावेळीं च कां नक्कलीं नाहींत ? समर्थांसारख्या नेमक वागणाऱ्यानें, असें अर्धवट काम सोडलें नसतें.

( ६ ) प्रत्येक कांडाचे शेवटीं लेखकाचे म्हणून जे उल्लेख आहेत, त्यात ' रामदासेन लिखितम् ' असा कोठें च उल्लेख नाहीं, ' रामेण रामदासेन, ' रामेण, राघवनाम्ना वगैरे जे उल्लेख आहेत ते समर्थांचे बद्दल नव्हत.

हे, अगर असल्याच तऱ्हेचे आणखी कांहीं, आक्षेप नास्ति पक्षाकडून, घेतले जाण्याचा संभव आहे. हे सर्व आक्षेप अगदीं काल्पनिक नाहींत. यापैकीं काहीं घेतले गेल्याचें आमचे ऐकिवांत आहेत. या आक्षेपास उत्तर देण्याचा आतां प्रयत्न करूं.

## नास्ति पक्षाचे आक्षेपांस उत्तर

वरील सारखे आक्षेप घेणारांना, ' समर्थ ' या व्यक्तीची नीट कल्पना च झालेली नाहीं, असें म्हणणें भाग पडतें. परमार्थप्राप्तीकरतां,

आजपर्यंत त्यांतून च सावध होऊन पळालेला असा जो हा एक च अलौकिक मुलगा, त्याच्या तेजस्वितेची कल्पना, वरील प्रकारचे आक्षेपक आपले स्वत वरून करणार! व त्यामुळें च संस्कृत लिहिणें अशक्य, चांगलें सुंदर अक्षर लिहिणें अशक्य, जपाचा क्रम सभाळून येवढा लेखनव्यवसाय करणें अशक्य, वगैरे प्रकारच्या अशक्यतेच्या वाळूच्या भिंती उभ्या करून, समर्थासारख्या सिंहाच्या वचाला, हे नेमळे आक्षेपक अडवू पाहात आहेत, असें म्हणण्याची पाळी येते. एका कवीनें म्हटल्याप्रमाणें तेजस्वी पुरुषाचा प्रयत्नाभिनिवेष, असा जाज्वल्य असतो कीं.—

नात्युच्चशिखरो मेरुर्नातिनीचं रसातलम् ।
व्यवसायद्वितीयस्य नाप्यपारो महोदधि ॥

त्याला मेरूची उंची अडवू शकत नाहीं, रसातलाची खोली भेडसावू शकत नाहीं, महोदधीहि त्याला अनुल्लंघनीय वाटत नाहीं! असल्या अडचणींवर तो स्वार होतो.

एकचक्रो रथो यन्ता विकलो विषमा हया ।
आक्रमत्येव तेजस्वी तथाप्यर्कोनभस्तलम् ॥

रथाला एकच चाक, हाकणारा विकलांग अरुण, घोडे आडनिड असे ७, अशा सर्व अडचणी असतांहि, सूर्य येवढ्या विस्तीर्ण नभस्थलाचें आक्रमण, आता कसें करूं, म्हणून अडून राहात नाहीं. त्या सर्व अडचणी पायाखालीं दडपून तो आपल्या पल्ल्या गाठतोच! ती च वृत्ति या सूर्योपासक बाळाची!

समर्थ ल्हानपणापासूच असे सूर्यासारखे तेजस्वी होते त्यांना अशक्य काहीं नव्हतें. बारा वर्षांचे असतांना टाकळीस गेल्यावर, त्यांनीं आपला नित्यक्रम कसा आखला होता, याची साद्यंत माहिती उपलब्ध नाहीं. त्यांच्या पुढील चरित्रावरून व त्यांचे ग्रंथरचनेवरून त्याची अटकळ बांधता येते. सूर्योदयापासून माध्याह्न पर्यंतचा काल जपादि अनुष्ठानांत जाई व नंतर ते भिक्षेला पंचवटीकडे जात. भोजन

झाल्यानंतर, नाशकासारख्या पवित्र क्षेत्रीं जे नानाशास्त्रप्रवीण असे विद्वान असत त्यांच्या सान्निध्यात काहीं काळ ते नियमितपणें घालवीत असावे. पुष्कळसें ज्ञानार्जन अशा रीतीनें त्यांनीं १२ वर्षांत केलें असावें. श्री. स. वा. देव. मंदिरामार्फत, जो दुसरा सुमनहार प्रसिद्ध झालेला आहे, त्यात, '**श्री समर्थांचा विद्याव्यासंग**' या नावाचा एक निबंध, श्री बाळस्वामी यांनीं लिहिला आहे. त्यांत समर्थांचा हा व्यासंग किती दांडगा होता हें समर्थांच्याच ग्रंथातून येणाऱ्या वचनाधारें त्यांनीं दाखविलें आहे. हें येवढें ज्ञान प्राप्त करून घेण्यास, समर्थांस या टाकळीच्या १२ वर्षांशिवाय, स्वस्थतेचा वेळ मिळाला नसल्यामुळें, नाशकासच त्यांनीं हें ज्ञान मिळविलें असलें पाहिजे, असें ओघानेंच प्राप्त होतें. एकदरींत, या १२ वर्षांत श्रेष्ठ-ज्ञानार्जन व भगवत्प्रसाद, हीं आयुष्यातील फार मोठीं कार्यें त्यांनीं साधून घेतलीं, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

टाकळीस समर्थांनीं शके १५४२ चे माघ शु. ७ स ( रथ-सप्तमीस ) पुरश्चरणास प्रारंभ केला, असें हनुमतस्वामी बखरींत सांगतात. आदिकांड १५४४ माघ शु. १३ ला संपविलेलें आहे. म्हणजे पुरश्चरणाचे सुरवातीपासून २ वर्षें ६ दिवस होतात. आदिकांडाचे श्लोक २८५० आहेत ते प्रथमचे म्हणून, सावकाशीनें, रोज ३०।३५ श्लोक प्रमाणें लिहिले, असें मानलें तर ३ महिने त्या लिहिण्यात गेले, ते वजा करता, सुमारें १॥ वर्षें, पुरश्चरण सुरवातीपासून लेखनास सुरवात होईपर्यंत राहातात. हीं १॥ वर्षें, एखाद्या विद्वान शास्त्र्याजवळ, संस्कृत शिकण्यात, त्यांनीं घालविलीं असावीं. जुन्या प्रथेप्रमाणें, समासचक्र, रूपावळी, वगैरे प्राथमिक अध्ययन आधींच लहानपणीं घरीं झालें असण्याचा फार संभव आहे. नाशकास पुढलें अध्ययन होऊन, संस्कृत लेखनाचा सराव हि झाला असेल. आणि समर्थांसारख्या विशाल व तरल बुद्धीच्या तरतरीत विद्यार्थ्यास वर्ष दीड वर्षांत रामायणासारखें सोपें काव्य समजून, तें नीट लिहून काढणें सहज साध्य झालें असावें. अल्पवयातच झालेल्या प्रगल्भ ज्ञानोत्कर्षाचीं उदाहरणें सर्व देशात दर्शास

पडतात. आपल्याकडे जशी आचार्य, ज्ञानेश्वर इत्यादींची या बाबतींत प्रसिद्धी आहे त्याचप्रमाणें पाश्चात्य देशात फ्रान्सिस बेकन, लॉर्ड केल्व्हिन्, इत्यादींची प्रसिद्धी आहे. बेकनबद्दल मेकॉलेनें

possessor of the most exquisitely constructed intellect that has been bestowed on any of the children of man

असे जरी उद्गार काढले असले तरी आचार्यादिकांची त्याला माहिती नसल्यामुळें त्यानें ते काढले असें म्हणण्यास हरकत नाहीं. समर्थहि अशाच कोटींतले होते. लो. मा. टिळकांनीं गीतारहस्याच्या प्रस्तावनेच्या पहिल्याच पानावर, आपणास १६ व्या वर्षीच, "अर्जुनास युद्धाला प्रवृत्त करण्यासाठीं सांगितलेल्या गीतेंत, नुसत्या मोक्ष मार्गाचें विवेचन कशाला," अशी मूलग्राही शंका, मनात आल्याचें सांगितलेलें, आपण वाचतों. अशीं प्रखर बुद्धीचीं कांहीं माणसें असतात. हें लक्षात घेतलें म्हणजे समर्थांच्या सरस्वतज्ञानप्राप्तीसंबधानें आलेली शंका पार वितळून जाते.

सुंदर व घोटीव मोत्यासारखें अक्षर लिहिण्याची समर्थांना लहानपणासूनच सवय असली पाहिजे. दा. बो. १९।१ वाचला, व आधीं केलें मग सांगितलें अशा बाण्याचे समर्थ होते हें लक्षात घेतलें, म्हणजे ही शंकाही नाहींशी होते.

नकलेसाठीं पोथी मिळण्याची अडचण हा आक्षेप क्षुल्लक वाटतो. या सुंदर बाळ ब्रह्मचाऱ्याची अक्षत विरक्तवृत्ती व कठोर नित्यक्रम १॥–१॥। वर्षे एकसारखा पाहिल्यानंतर टाकळी, नाशिक, पचवटी येथील लोक आश्चर्यानें थकित झाले असले पाहिजेत समर्थांच्या सहवासाचा व सेवेचा लाभ व्हावा म्हणून पुष्कळ जण टपत राहात असतील. स्वत चें स्वार्थपरायण, रात्रंदिवस ससारात गुरफटलेलें आपलें चरित्र व या बाळस्वामीचें वैराग्य हीं ताडून पाहून त्याना स्वत बद्दल खंती वाटून, समर्थांबद्दलचा आदर द्विगुणित झाला असेल. लेखनसाहित्यादिकांची अडचण असे लोक कां भासू देतील ? ज्या कोणा शास्त्र्याजवळ, त्यानीं सस्कृताचें अध्ययन केलें असेल, त्याला

समर्थांच्या तैलबुद्धीचें व वैराग्यशील शुद्ध आचरणाचें कौतुक वाटून समर्थांनीं इच्छा दर्शवितांच, त्यांस रामायणाची पोथी देण्यास त्यांनीं यत्किंचित हि अनमान केलें नसेल. अशा शास्त्र्याकडे असलेला च, कोणी गोपीनाथ नावाचा सहाध्यायी समर्थांशीं समरस होऊन, त्यांचे लेखनकार्यांत त्यांस सहाय करण्यास तत्पर झाला असेल व समर्थांनीं त्याची लायकी परीक्षून त्याला अरण्यकांडाचे लेखनांत मदतीस घेतलें असेल, असें मानण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं.

कष्टाला भिणारे समर्थ नव्हते. त्यांचा सर्व जन्म च कष्टांत गेला. कष्टावांचून कोणतें च फल प्राप्त होत नाहीं असा उपदेश करणारे समर्थ विद्यार्जनासाठीं वाटेल ते कष्ट सोशीत असतील यांत शंका नाहीं. हल्लींच्या परिस्थितीवरून आपण समर्थांची कल्पना करणें साफ चुकेल. व यामुळें नित्यक्रम संभाळून समर्थांना ज्ञानार्जन करण्यास उत्साह राहात नसावा, या शंकेचें निरसन होतें.

नेमस्तपणें वागणाऱ्या समर्थांनीं दोन कांडें कां लिहिलीं नाहींत व 'रामेण रामदासेन' वगैरे लेखकाचे उल्लेख कोणाचे आहेत, याचा खुलासा पुढील भागांत सविस्तर येणार असल्यामुळें येथें त्याचा उहापोह केला नाहीं.

## अस्ति पक्षाचें म्हणणें

( १ ) या पक्षाचें असें म्हणणें आहे कीं विराध रामायणापैकीं निदान ¾ तरी भाग समर्थांचे हातचा निःसंशय आहे.

( २ ) 'रामेण रामदासेन,' 'रामेण' हे उल्लेख समर्थ रामदासाचेच आहेत.

( ३ ) समर्थांनीं हें रामायण नाशकास अगर टाकळीस लिहिलें.

( ४ ) उत्तरकांड व अयोध्याकांड याचें लेखन त्यांना नाशकास अगर टाकळीस करता येणें शक्य नव्हतें म्हणून तें त्या वेळीं राहिलें. तें त्यांनीं तीर्थयात्रेहून परत आल्यावर आटोपलें.

## अस्तिपक्षाच्या म्हणण्याचें विवेचन

या पक्षाचें म्हणणें नीट लक्षात येण्याकरिता रामायण प्रती संबंधीं थोडी माहिती आगाऊ सांगणें जरूर आहे. त्यावाचून पुढें काढिलेल्या अनुमानांची यथार्थता पटणार नाहीं.

### रामायणाच्या प्रती

" रामायणाचे अनेक हस्तलिखित ग्रंथ, आपणापर्यंत परंपरागत चालत आलेले आहेत त्या परस्परांत पुष्कळ भेद आहे हिंदुस्थानांत निरनिराळ्या भागांत परंपरागत चालत आलेल्या प्रतींमध्यें साधारणतः निदान तीन प्रती अगदीं निरनिराळ्या अशा आढळतात. या प्रती केवळ काहीं पाठांच्या बाबतींत भिन्न आहेत असें नसून प्रत्येकींत काहीं श्लोक, लांबलचक उतारे, एवढेंच नव्हे तर संबंध सर्गहि, असे आहेत कीं ते दुसरींकडे आढळत नाहींत शिवाय एकींत श्लोक ज्या अनुक्रमानें आहेत त्याच अनुक्रमानें दुसरींत सापडत नाहींत मुंबईत पुष्कळ वेळा छापली गेलेली जी प्रत आहे तिचाच सर्वत्र प्रसार असून उत्तर व दक्षिण हिंदुस्थानांत तिचा ज्यास्त प्रसार आहे हीच सर्वांत जुनी प्रत आहे. दुसरी प्रत बंगाली. युरोपांत ज्या संपूर्ण रामायणाचा प्रचार आहे ती गोरेशिओनें संपादिलेली बंगाली प्रत आहे. पंडित रसिकलाल भट्टाचार्यानें ' पंडित ' मासिकांत संबंध बंगाली प्रत सटीक छापून प्रसिद्ध केली आहे तिसरी प्रत वायव्य हिंदुस्थानी होय हिला काश्मिरी प्रत म्हणतात...या सर्व प्रतींतून जे बरेच मोठे फरक दृष्टीस पडतात याचें कारण हें महाकाव्य बराच वेळ केवळ तोंडी परंपरेनें चालत आलें होतें. ( महाराष्ट्रीय ज्ञानकोश पुरवणीखंड विभाग २३ पा. ६८ ) "

रामायणाच्या प्रती संबंधानें श्री रामायणसमालोचना द्वितीयखंड यांतील पान ६२ ते ६५ यावर ' महाराष्ट्रीय ' लिहितात कीं — " रामायणाची वायव्य प्रांतांतील प्रत अगदीं भिन्न आहे व याकरितां रामायणाच्या खऱ्या प्रती दोन आहेत असें मानणें भाग आहे तेव्हां या दुसऱ्या प्रतीविषयीं, येथें माहिती द्यावयाची आहे. या प्रतीत

' **गौड प्रत** ' असें म्हणतात. ही प्रत आम्हांस पाहावयास मिळाली नाहीं....तिची माहिती रा. रा. अभ्यंकर यांनीं आपल्या रामायणांतील निबंधांत दिली आहे. ही प्रत **गॉरिशिओ** साहेबानें पारिसमध्यें इटालियन भाषेंत छापून सन १८४३ ते १८५० पर्यंत प्रसिद्ध केली. प्रकाशकाचे नांवावरून इला **गॉरिशिओची** प्रत असेंहि कोणी म्हणतात........या प्रतीचे पहिले कांडांत प्रारंभीं अनुक्रमणिका दिली असून तींत सर्व कांडांतील सर्ग व श्लोक यांची संख्या किती ती दिली आहे व त्याच ग्रंथाचे छापील प्रतींत ती आतां किती आढळते याचें कोष्टक देत आहों. " *

" या गौड प्रतीवरून लाहोर येथील दयानंद विद्यालयामार्फत रामायण प्रसिद्ध होत असून तें अद्यापि पूर्ण झालेलें नाहीं. " " रामायणाची ही प्रत कथेच्या दृष्टीनें भिन्न नसून श्लोक मात्र एकमेकाशीं मिळत नाहीत. रा. अभ्यंकर यांनीं दोन प्रतींतील बालकांड ताडून पाहिलें तेव्हां दोन प्रतींत अगदीं एक असलेले श्लोक अवघे ४७ मिळाले. "

वरील उतारे देण्याचा हेतु असा आहे कीं वा. रामायणाच्या २।३ प्रती ( versions ) हिंदुस्थानात प्रचलित आहेत. त्यांपैकीं मुंबई प्रत व दुसरी गौड अथवा गॉरिशिओची प्रत यांच्याशीं आपणास दर्त कर्तव्य आहे. विवाच रामायणांतील पहिलें कांड, मुंबई प्रत समोर ठेवून वाचूं लागलों, तेव्हां प्रथमच कांडाचे नावाचा फरक दिसला. मुंबई प्रतींत त्याचें नांव ' बालकांड ' तर ह्या प्रतींत त्याचें नांव ' आदिकांड. ' तिकडे थोडें दुर्लक्ष केलें व पुढें वाचूं लागलों तों असें आढळून येई कीं,

---

* येथें रामायण समालोचनकारांनीं २ कोष्टकें उतरलीं आहेत व या नंतर मुंबई प्रतीपेक्षा या गौड प्रतींत प्रत्येक कांडांत किती सर्ग अधिक आहेत व मुंबई प्रतींतील कोणते सर्ग या प्रतींत सापडत नाहींत त्याची तपशीलवार यादी दिली आहे. त्या यादींतील नमूद करण्यासारखी एक महत्वाची गोष्ट अशी आहे कीं सातवें जें **उत्तरकांड तें सर्वच्या सर्व या गौड प्रतींत नाहीं** असा स्पष्ट निर्देश आहे.

कथाभाग जमावा पण शब्द, वचनें चरणें यात एकसारखा फरक पडावा. उदाहरणार्थ विनाय प्रतींत —

> जितक्रोधो महान्कश्चद्युतिमान्कोऽनसूयक ।
> संजातरोषात्कस्माच्च देवता अपि बिभ्यति ॥
>
> आ कां स. १ श्लो ४

असें आहे, तर मुंबई प्रतींत —

> आत्मवान्को जितक्रोधोद्युतिमान्कोनसूयकः ।
> कस्यबिभ्यति देवाश्च जातरोषस्य संयुगे ॥
>
> बा का स १ श्लो ४

असें आहे. याप्रमाणें दोन सर्ग ताडून पाहाता पाहाता तिसऱ्या सर्गावर आलों तों भलताच फरक दिसला. मुंबई प्रतींत या सर्गाचे ४० श्लोक आहेत, तेथें समर्थ रामायणात १५० श्लोकाचा 'अनुक्रमणिकानाम तृतीय सर्ग' भेटला, व त्यात एकदर रामायणाची कितीतरी विस्तृत अशी अनुक्रमणिका आढळली! समर्थ आमच्या महाराष्ट्राचे, नाशकास त्यांनी तपश्चर्या केली, व कृष्णातीरीं बहुतेक पुढील आयुष्य घालविलें तेव्हा त्याचें रामायण मुंबई प्रतींत आहे तेंच असणार असें आग्रहीं धरून चाललों होतों, परतु येथें भलताच विपरीत प्रकार दिसू लागला. पुढें पुढें असेंच होऊ लागलें, तेव्हा निश्चित झालें कीं मुंबई प्रतींत जें रामायण आपण वाचतों तें हें नव्हे भग हें रामायण कोणचें?

वरील प्रश्न मनात घोळत असतां महाराष्ट्रीयन याचें 'रामायण समालोचना' हें पुस्तक पाहाता त्यात गौड प्रतीची माहिती मिळाली व त्या पुस्तकाचा द्वितीयखड पान ६२ ते ६५ यावर दिलेल्या माहितीचा पडताळा पाहातां तो बहुतेक जमू लागला व गौड प्रतच नक्कल करण्यास हा विनाय रामायण डोळ्यापुढें असावी अशी खात्री पटली. आदि अगर बालकाण्ड याचा याप्रमाणें निकाल लागल्यावर दुसरें क्रमानें या. रामायणात येणारें जें अयोध्या काड तें पाहाता मुंबई प्रतीशीं बरेंचसें जमू लागलें. प्रत्येक सर्गाचे आदिअत ताडून पाहाता ते बरोबर मिळू

लागले, श्लोकांचे चरण बहुतेक जमूं लागले. पण पाठभेद मधून मधून डोकावीतच होते. यापुढील अरण्य, किष्किंधा, सुन्दर व युद्ध हीं कांडें पुनः मुंबई प्रतीशीं जमेनाशीं झालीं. सर्ग, श्लोक, चरण वगैरेंत बालकाण्डाप्रमाणेंच पुष्कळसा फरक पडूं लागला. परंतु यापुढील व शेवटचें जें उत्तर कांड तें मुंबई प्रतीशीं अखेर पर्यंत बरोबर जमलें.

लाहोरच्या दयानंद विद्यालयामार्फत छापलेली म्हणून जी गौड प्रत अगर गॉरेशियोची प्रत म्हणून रामायणसमालोचनाकार उल्लेखितात ती प्रत विवाद समर्थांच्या रामायणाशीं ताडून पाहातां त्यांत पुष्कळ च मेळ जमतो असें दिसून आलें. तें इतकें कीं त्या प्रतींतील बालकाण्ड ९५ टक्के विवाद प्रतीशीं जमतें व या च प्रमाणें अरण्य, किष्किंधा, सुन्दर व युद्ध हीं कांडें त्या गौड प्रतीशीं वव्हंशीं * जमतात.

एकंदरींत या तुलनेवरून असा बोध झाला कीं विवाद रामायणांतील

| | |
|---|---|
| १ आदि ऊर्फ बालकांड,<br>२ अरण्यकांड,<br>३ किष्किंधाकांड,<br>४ सुन्दरकांड,<br>५ युद्धकांड, | हीं पांच कांडें गौड अथवा गॉरेशियोच्या प्रतीशीं वव्हंशीं जमतात |

आणि

| | |
|---|---|
| ६ अयोध्याकांड,<br>७ उत्तरकांड | हीं मुंबई प्रतीशीं वव्हंशीं जमतात. पण उत्तरकांडाइतकें अयोध्याकांड जमत नाहीं. |

* वव्हंशीं हा शब्द मुद्दाम योजला आहे. जशीं कितीहि उत्तम चालणारीं घड्याळें एकमेकांशीं तंतोतंत जुळत नाहींत तसेंच या प्रतीचें असतें. उदा० कुंभकोणमची कृष्णाचार्यांनीं छापलेली वा. रामायणाची प्रत पाहिली तरी तींत किती तरी पाठभेद दिलेले आढळतात. अशा ग्रंथाचा संपादक जितक्या म्हणून सारख्या प्रती मिळवितो त्या प्रत्येकाचे एकमेकांशीं न जमणारे असे असंख्य पाठभेद असतात. याचें कारण वरील ज्ञानकोशातील उताऱ्यांतच दिलेलें आहे कीं महाकाव्य वराच वेळ केवळ तोंडी परंपरेनें चालत आलेलें असतें.

वाल्मीकिरामायणाची जी गौड प्रत दयानंद विद्यालयामार्फत लाहोरास प्रसिद्ध होत आहे तिचे संपादक श्री. भगवद्दत्त यांना एकंदर १० प्रती कैथल, भावल्पुर, ल्याहोर, अमृतसर, भरतपुर, प्रयाग वगैरे ठिकाणाहून मिळाल्या असून शिवाय दोन प्रती नाशिक, पंचवटीहून मिळाल्या असें ते आपल्या प्रस्तावनेंत सांगतात. या दोन प्रतींपैकीं एक प्रत २०० वर्षांची प्राचीन असून ती–" नासिक पञ्चवटी के राममन्दिर के पाससे प्राप्त हुईथी " असें हि कळवितात. त्यांनीं आपल्या प्रतीस मूळ ( text ) म्हणून कैथलची प्रत घेतली आहे व नासिक पञ्चवटींची २०० वर्षांची जुनी प्रत त्या कैथल प्रतीशीं " आदिसे अन्तपर्यंत मिलती है " असें ते सांगतात.

हीं श्री. भगवद्दत्त यांचीं विधानें लक्षांत घेतल्यास असें स्पष्ट होतें कीं गौड प्रतींचीं रामायणें नासिक पंचवटी भागांत पूर्वी होतीं व त्या परिसरांत असणाऱ्या एखाद्याच्या मनांत तसलें रामायण नकलावें असें शके १५४४ ते १५४६ पर्यंतचे काळांत मनांत असतें तर त्यास तसली प्रत मिळणें खास अशक्य नव्हतें.

### गौड प्रतींत उत्तरकांड नसे

वर आपण टीपेंत पाहिलें कीं गौडप्रतींत उत्तरकांड नाहीं. ही गोष्ट रामायणावरील निबंधकार रा. अभ्यंकर यांनीं मुद्दाम नमूद केलेली आहे.

The Bengal or Gonda version called by the name of *Gorresio's edition* is believed by some, notably Mr. Abhyankar who has written an excellent brochure in Marathi on the Ramayan, to have no उत्तरकांड and as a matter of fact in the text printed py Gorresio the Uttarkanda is not given. But it is apprehended that this is so because that Kanda *in that version is now lost* & not because it did not exist at all.

( See C. V. Vaidya's Riddle of the Ramayan Appendix p. 181 )

युद्धकांडाच्या समाप्तीपर्यंतचें रामायण वाल्मीकींनीं रचून कुशलवांना पढविलें होतें. रामायणांत जेथें काण्डांचा उल्लेख आहे तेथें " षट्कांडानि तथोत्तरम् " असा उत्तरकांडाचा उल्लेख वेगळा करून उत्तरकांडाची रचना मागून केल्याबद्दल अप्रत्यक्ष पुरावा आहे. असें समालोचनाकारही सांगतात. यामुळें वाल्मीकि रामायण फक्त युद्धकांडाअखेर पर्यंत म्हणून स्वा पुढील उत्तरकांड ग्रंथांत अंतर्भूत करीत नसतील असें वाटतें.

## कांडसमाप्तीचे शेवटचे लेखकांचे उल्लेख

एकंदर सात कांडामिळून

१ रामेण रामदासेन ( आदि व सुंदर )

२ रामेण रामदासेन सहगोपीनाथेन ( अरण्य )

३ रामेण ( किष्किंधा व युद्ध व उत्तर )

४ राघवनाम्ना कश्चित्सत्पुरुष चरणानुचरः तेन ( अयोध्या )

असे चार प्रकारचे उल्लेख आहेत. हे सर्व समर्थ रामदास स्वामींचेच आहेत हें रा. देवानीं अनुक्रम नंबर ६५३ मध्यें स्पष्ट केलें च आहे. समर्थांना अनेक नांवानें संबोधीत, त्यापैकींच हीं नावें आहेत. ' रामेण रामदासेन ' अगर ' रामेण ' हे उल्लेख ' रामी रामदासाचे ' असणें शक्य नाहीं. कारण श्रेष्ठांच्या प्रत्यक्ष मुलाचेंच नाव जर ' रामजी ' होतें तर राम असें त्याचें नांव असणें संभवत नाहीं. ( पाहा रामदासी संशोधन द्वितीय खंड पृष्ठ ७९।८० ).

समर्थांना ' रामदास ' हें नांव शके १५३८ मध्यें मिळालें हें समर्थ वाकेनिशीवरून दिसतें. समर्थांचे घराण्यात सूर्योपासनेप्रमाणेंच रामोपासना दृढ होती. समर्थांचा जन्म हि रामनवमीलाच झाला. त्याना रामचंद्रांनींच अनुग्रह दिला. सर्व कर्ता करविता रामच आहे अशी त्यांची निःसंशय भावना होती.

ते समर्थ रामायण लिहित असताना हें सर्व रामच माझें निमित्त करून लिहित आहेत असें मानीत असले पाहिजेत. मी तर म्हणतों कीं

प्रत्येक कांडाचे शेवटीं रामेण लिखितं असें त्यांनीं किष्किंधाकाण्डाचे अखेरीस लिहिलें आहे तसें लिहिलें असतें तर समर्थांनीं स्वहस्तें रामायण लिहूनहि, आपल्याला त्या गोष्टीचा पत्ताहि लागला नसता. तुमचें आमचें मान्य म्हणून रामेण रामदासेन असें लिहिण्याची त्यांची लहर लागली म्हणून आपल्यास धागा दोरा सांपडला व अक्षर-साम्यावरून पुढील कांडें त्यांचींच आहेत असें ठरवून एकंदर मेळ बसविता आला. आतां एवढें खरें कीं " जंबुग्रामनिवासिना ठोसरकुलो-त्पन्नेन सूर्याजिपंत सुनुना सांप्रत गोदातीरस्थ टाकळी ग्रामे पुरश्चरणार्थं आगतेन रामदास इति प्रसादनामधारिणा नारायणेन स्वहस्तेन लिखितमिदं आदिकांडम् " असा त्यांचा स्पष्ट उल्लेख असता तर मात्र शंकेला जागा उरली नसती. श्रीसमर्थ रामाची सेवा घडावी, त्याच्याच कथांचा छंद लागावा, रामचरित्र नीट आकळून घ्यावें व आपण अखंड रामसान्निध्यांत राहावें म्हणून, हें एक प्रकारचें व्रत त्यांनीं अंगिकारलें असावें. येवढी अचाट सेवा करूनहि ' तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों ' असें ज्यांना वाटे त्या समर्थांना हें लिखाण रामच स्वतः करीत आहे, अगर माझे हातून करवून घेत आहे, असेंच वाटत असावें व म्हणून वरील प्रमाणें उल्लेख, त्या त्या वेळीं मनःस्थिती असेल त्याप्रमाणें उमटलेले दिसतात. या दृष्टीनें ' रामेण परोपकारार्थमालेखि ' हा युद्ध कांडांतील उल्लेख लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

सह गोपीनाथेन हा नामनिर्देश कोणाचा असावा हें वर आम्हीं अनुमानानें सुचविलें आहे. तें बहुधा बरोबर असावें. हें नांव अरण्य कांडाचे लेखनांत आहे व या कांडांत पूर्वीचें बाल कांड ज्याचे हातचें असेल त्याचें व एक निराळें ( गोपीनाथाचें ) अशीं दोन निरनिराळीं अक्षरें स्पष्ट दिसतात. या कांडाचा बराचसा म्हणजे सुमारें $\frac{२}{३}$ भाग गोपीनाथाचे हातचा दिसतो.

रा. देव यांनीं ' राघव ' हें समर्थांचें एक नांव असल्यामुळें तें नांव त्या एका शेवटीं लिहिलेल्या अयोध्याकांडांत आलेलें आहे तेंहि

समर्थांनींच लिहिलेलें आहे असें ठरविलें आहे त्याबद्दल मात्र मला थोडी शंका वाटते. ती शंका बरीच अंधुक आहे. त्या कांडाचें लेखन इतर कांडांचे लेखनाशीं ताडून पाहातां कांहीं ठिकाणीं विसदृशता प्रतीत होते. परंतु ही विसदृशता अगदीं पटकन डोळ्यांत भरणारी नाहीं. जरा बारीक नजरेनें पाहिल्यास ती भासते व कश्चित् सत्पुरुष चरणानुचरःतेन हें जें राघवनामापुढें विशेषण घातलें आहे त्यानें आलेली शंका अस्थानीं नाहीं असें वाटतें. अशी शंका मनात मूळ धरते तोंच मागील लेखकाचीं जीं कांहीं अक्षरांचीं वळणें व जोडाक्षरांची विशिष्ट धाटी आहे तीहि मधून मधून प्रत्ययास येते व यामुळें आलेली शंका अनाठायीं वाटते व मन दुग्ध्यांत पडतें. कदाचित् मागील लेखकानें घाईनें या कांडाचें लिखाण केलें असावें अगर मागील लेखकासारखेंच वळण असलेल्या दुसऱ्या कोणी तें लिहिलें असावें. रा. देवांनाहि माझी ही शंका पटते व ते म्हणतात श्रीसमर्थांच्या शिष्यवर्गांत एक राघव शिष्य प्रख्यात आहेत व त्यानीं हें घाड उतरलें असावें व तसें असेल तर ' कश्चित् सत्पुरुषचरणानुचरः ', याची हि उपपत्ति बरोबर लागते.

## योग्य ठिकाणीं ग्रंथाचा आढळ

पुराव्याच्या कायद्याचें असें एक कलम आहे कीं जुना दस्तैवज, तो जेथें असण्याचा योग्य संभव तेथून पुराव्यांत म्हणून आल्यास तो पुराव्यांत ग्राह्य होतो. याला Proper custody असें म्हणतात. या विवाद्य रामायणाचे बाबतींत हें कलम लागू पडतें. रा. देवांनीं याबद्दल लिहिलें आहे कीं.—

" वेणाबाईच्या परंपरेतील गिरिधर यांच्या मठांत हें रामायण मिळावें ही गोष्टहि कमी महत्त्वाची नाहीं. वेणाबाईच्या परंपरेंत रामायणें व्हावीं अशी समर्थांची आज्ञा होती व त्या आज्ञेप्रमाणें गिरिधरांनीं सात प्रकारचीं रामायणें रचिलींहि. ( श्रीसमर्थप्रताप १९ × ६०।६२ पद्य ).

अशी आज्ञा करताना......प्रस्तुतची प्रत श्रीसमर्थांनीं गिरिधराच्या हातीं केली असल्याचा फार सबळ आहे. '

( रामदासी संशोधन द्वि. ख. पा. ८० )

गिरिधराचे पश्चात त्याचे बंधु येसोबा व भिमाजी हे आपल्या वाटणींत श्रीसमर्थांचें हस्ताक्षर एकाकडेच का, तें दोघांहिकडे असावें या भावनेनें कांडें वाटून देतात व पुढें तीं त्यांच्याच मठांतून प्राप्त होतात ह्या सर्व गोष्टींवरून वरील पुराव्याचें वजन येथें तंतोतंत लागू पडतें असें कोणीहि कबूल करील

## लेखनाचे शक काय दर्शवितात ?

वरील प्रत्येक कांड केव्हा केव्हा लिहून संपलें त्याचे शिवाय रामायणांत स्पष्ट शक दिलेले आहेत. त्यावरून असें दिसतें कीं, आदि, अरण्य, किष्किंधा, सुंदर व युद्धकांड हीं शके १५४४ ते १५४६ वै. शु. २ पर्यंत म्हणजे २। अगर २॥ वर्षांत लिहून झालीं व तें काम तसेंच पडलें. राहिलेल्या दोन कांडांपैकीं उत्तरकांड पुढें २१॥ वर्षांनीं शके १५६७ मध्यें संपविलें व अयोध्याकांड त्यानंतर पुढें ३। वर्षांनीं शके १५७१ त संपविलें. पांच कांडें लिहून झाल्यानंतर, हीं इतकीं वर्षें त्या लेखकास कां थांबावीं लागलीं, हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. हीं पुढें लिहिलेलीं उत्तर व अयोध्या कांडें पूर्वीच्या प्रतीपासून, भिन्न अशा दुसऱ्या प्रतीशीं बराबरी जुळवून, हें आम्ही पूर्वी च पाहिलें आहे. या कांडाचें हस्ताक्षर पाहतां जो पहिल्या पांच कांडांचा लेखक आहे तो च उत्तरकांडाचा लेखक आहे हें निःसंशय म्हणतां येतें. अयोध्या कांडाचे हस्ताक्षराबद्दल मन थोडासा संशय वाटतो हें वर सुचविलें च आहे. प्रथम लिहिलेल्या पांच कांडांपैकीं आदि व सुंदर यांचा लेखक कोणी एक ' रामदास ' आहेत हें निश्चित आहे व त्या कांडांचें हस्ताक्षर ( गेल्यापानावर लिहिलेला भाग पहावा ) इतर अरण्य, किष्किंधा व युद्ध कांड अक्षरशीं

तंतोतंत जुळत आहे त्याअर्थी तेच रामदास ह्या सर्वहि पांच कांडांचे लेखक आहेत हें निर्विवाद सिद्ध होत आहे. असलेंच अक्षर लिहिणारानें पुढें २१॥ वर्षांनीं उत्तरकांड लिहिलेलें आहे. तर मग असा प्रश्न उभा राहातो कीं, असे हे ' रामदास ' कोण असावे ? आमच्या मनश्चक्षूपुढें समर्थ रामदास स्वामी खेरीज तर दुसरे कोणी ' रामदास ' दिसत नाहींत.

## समर्थ रामदास स्वामींशीं या गोष्टी जमतात कां ?

समर्थ टाकळीस १५४२ ते १५५४ पर्यंत होते. त्यांना नाशिक पंचवटी भागांत इच्छीचे विशाय रामायणांची गौड प्रत नकलेस मिळणें शक्य होतें. गौड प्रतींत उत्तरकांड अंतर्भूत होत नसे म्हणून तें त्या वेळीं नकलणें शक्य नव्हतें. त्यांना मिळालेल्या पोथींतील अयोध्याकांड गाहाळ झालेलें असावें यामुळें हीं दोन कांडें नकलणें पुढें ढकलणें भाग पडलें असावें. टाकळीहून १५५४ मध्यें तपश्चर्या आटपून ते १२ वर्षें तीर्थयात्रा करण्यासाठीं सारखे फिरत होते. ती तीर्थयात्रा शके १५६६ मध्यें संपवून ते कृष्णातीरीं आले. नंतर शके १५६७ चे चैत्रांतील मसूरच्या श्रीच्या उत्सवाचें मोठें कार्य आटोपल्यावर उर्वरित लेखनाचें काम त्यांनीं हातीं घेतल्याचें दिसतें. त्यांस त्या भागांत वा. रामायणाची पोथी जाधव अगर यादव घराण्यांतून मिळाली असें दिसतें. यामुळें ' रामेण रामचरितं प्राप्तं यदुकुलोद्भवम् ' हा उल्लेख उत्तर कांडाचे अखेर केलेला दिसतो. उत्तरकांड लिहून झाल्यावर मग अयोध्याकांड ३। वर्षांनीं संपविलें याला कारण असें झालें असावें कीं पूर्वीचे गौड प्रतींतील सांपडत नसलेलें तें कांड मिळविण्यासाठीं त्यांनीं प्रयत्न चालविला असावा व तें मिळेल या भरंवशावर त्याचें लेखन तहकूब केलें असावें व पुढें तें मिळणें अशक्य झाल्यावर तें कांड स्वतः नकललेलें असावें अगर कोणाकडून नकलवून घेतलें असावें. एकंदरीनें पाहातां समर्थ रामदास स्वामींच्याच वायतींतच या निरनिराळ्या घनावांची मळी बसते.

### हस्ताक्षराशीं मेळ

अमुक एका लेखकाचें निर्विवाद असें अक्षर असल्यास त्याच्याशीं संशयित अक्षर तज्ञांनीं ताडून काय तें ठरविणें हाहि एक पुराव्यांत ग्राह्य असा मार्ग आहे. समर्थांचें तसें निर्विवाद अक्षर ताडून पाहाण्या-इतकें बरेंचसें उपलब्ध नाहीं. त्यांनीं कल्याणस्वामींस—अक्षर सुधारण्यासाठीं म्हणून—एक कित्ता झोळींतून काढून दिला होता तो कित्ता आजहि डोमगांवचे मठांत आहे. त्याचें छायाचित्र रामदासी संशोधन खंड १ मध्यें पृष्ठ ११२ जवळ दिलेलें आहे. त्या कित्यांतील अक्षर विवाद्य रामायणांतील अक्षरांशीं आम्हीं ताडून पाहिलें तेव्हां त्या अक्षरांचें बरें च साम्य आढळून आलें. संशोधन पुस्तकांतील दोन्ही अक्षराचे फोटो कोणासहि ताडून पाहून आपलें मत बनवतां येईल. कित्यांतील द, दा, दो, व्हा, इ, कु, ज, च. हा अक्षरांचें साम्य खात्रीच पटवितें. असो. हा तज्ञांचा प्रश्न आहे. मला निश्चित मत देण्याचा अधिकार नाहीं. परंतु ढोबळ मानानें जी गोष्ट नजरेस आली ती मुख्य मुद्याला थोडी बळकटी आणणारी दिसली, म्हणून तिचा उल्लेख केला आहे.

### अखेरचा निष्कर्ष अथवा सिद्धांत

अस्ति नास्तिपक्षाचें म्हणणें व त्याचें विवेचन झालें, त्यावरून असें निश्चित म्हणतां येतें कीं विवाद्य रामायण समर्थ रामदास स्वामींनींच बहुतेक लिहिलें आहे. गोपीनाथानें लिहिलेला अरण्य कांडाचा भाग याचे श्लोक सुमारें २२०० व वर्तें संशयित म्हणून अयोध्याकांड वगळल्यास त्याचे श्लोक ४१७० असे एकंदर ६३७० श्लोक वाजूस ठेवता वाल्मीचे अटरा साडे अटरा हजार श्लोक म्हणजे अजमासें वा. रामायणाचा ३/४ भाग खुद समर्थ रामदासस्वामी याचे हातचा लिहिलेला आहे यांत संशय नाहीं. वरील विवेचनावरून समर्थ प्रतसंशोधनें समितीनें दर्शविलेला ' बळकट संभव ' निश्चिततेच्या कोटींत उतरला आहे असें मला वाटतें. माझे अन्य समजुतीनें ठरविलेल्या या सिद्धांतावर आक्षेप येऊं शकणार नाहींत असें नाहीं. परंतु ते येऊन अखेरचा निकाल लागला ही

सर्वांचीच इच्छा आहे. नेमलेल्या समितींत मी एक असल्यामुळें समितीचेंच कार्य जरा पुढें नेण्याचा मी प्रयत्न केला आहे असें समजण्यास हरकत नाहीं.

## या ग्रंथाचें महत्व

श्रीसमर्थ रामदास स्वामींच्या या वाल्मीकिरामायणाला विशेष महत्व आहे. समर्थांच्या हातचा म्हणून, या ग्रंथाची महाराष्ट्राला एक अपूर्व देणगी समर्थकृपेनें प्राप्त झाली हें तर खरेंच, परंतु याशिवायहि या ग्रंथामुळें एक मोठा फायदा पदरांत पडला आहे. पुण्याचे वर उल्लेखिलेले रा. अभ्यंकर यांचें मत असें आहे कीं, गौड अथवा गॉरिशिओची रामायणाची प्रत ही मूळ असून तीवरून मुंबई प्रत झाली. रामायण-समालोचनाकार या म्हणण्याचा इन्कार करतात. भारताचार्य कै० चिंतामणराव वैद्य या दोन म्हणजे गौड व मुंबई प्रतींबद्दल असें म्हणतात कीं:—

> " It appears also probable that this bifurcation of the poem into two versions is much posterior to the last compilation in 100 B. C. ... ... ... ... ... In both countries viz Bengal & Southern India this last compilation was subsequently subjected here and there to prunnings and minor additions. But we believe that while more additions have been made in the south, in Bengal the text has been prunned with more liberty. " ( Riddle of the Ramayan by C. V. Vaidya, pp. 182, 183. )

असा हा दोन प्रतींचे बाबतींत असाच वाद आहे. अशा वादांत

जी प्रत जास्त जुनी ती जास्त प्रमाण असें साहजिकच असणार. गौड प्रतींपैकीं बालकांडाचे संपादक श्री. भगवद्दत्त यांना ज्या १० प्रती मिळवितां आल्या त्यांत सर्वांत जुनी प्रत २५८ वर्षांची आहे. समर्थांच्या प्रतींतील चार कांडें तर ३१५ वर्षांमागचीं आहेत व दोन कांडें २९० वर्षांमागचीं आहेत.

या दृष्टीनें श्रीसमर्थांच्या या प्रतीचें महत्व फार आहे. महत्वाचे असे अनेक पाठभेद या प्रतींत आहेत. रा. भास्करराव जाधव यांनीं रामाच्या एकपत्नीव्रतावर ज्या वचनाधारें आक्षेप घेतला तें

हृष्टाः खलु भविष्यन्ति रामस्य परमाः स्त्रियः ।

वचन समर्थांच्या या प्रतींत

हृष्टाः खलु भविष्यन्ति रामस्यान्तःपुरस्त्रियः ।

असें असल्यामुळें रा. जाधवांच्या आक्षेपाचा सर्वच डोलारा कोसळतो !

अशी ही रामेण रामदासेन लिखितं वाल्मीकिरामायणम् ची महत्त्वाची प्रत त्वरित प्रकाशित होणें इष्ट आहे. सबंध भरतखंडाच्या साह्याय्यानें तिच्या प्रकाशनाची योजना सत्कार्योत्तेजक सभेनें करावी, अशी मी सभेस व भारतीय संस्कृतीच्या अभिमानी श्रीमंतांना व विद्वानांना विनंति करितों.



ताजा कलम

गॉरेशिओचें रामायण मुंबईच्या रॉयल एशिआटिक सोसायटीच्या वाचनगृहांत पाहाण्यास मिळालें. या रामायणाचे मराठी भागांत

इटालियन भाषेंत भाषांतर आहे व पांच भागांत देवनागरी लिपींत लिहिलेलें मूळ संस्कृत रामायण आहे हे पांच भाग छापण्याचें काम इ स १८४३ पासून १८५० पर्यंत चाललें होतें. या रामायणांत उत्तरकांड नाहीं अशी प्रत्यक्ष खात्री करून घेतली.



( १९ )

श्रीरामसमर्थ

# रामचंद्रपंत अमात्यांचा जन्मकाल

( लेखक — रा. अनंतदास रामदासी, गिरड )



तिसऱ्या सुमनहाराच्या सोळाव्या लेखांत श्री. वासुदेव वामन ठाकूर यांनीं " रामचंद्रपंत अमात्य बावडेकर, हुकमतपन्हा यांचा अल्प परिचय " श्रीरामदास-रामदासी मासिकाच्या वाचकांस करून दिला आहे. जुन्या ऐतिहासिक कागदपत्रांच्या व बखरी वगैरेंच्या आधारें हा लेख काळजीपूर्वक लिहिला गेला असल्यानें विश्वसनीय असा झाला आहे. श्री. ठाकूर यांच्या लेखास पूरक असें एक दोन मुद्यांचें स्पष्टीकरण करण्याचें येथें योजिलें आहे.

' जन्मकाल व अन्तकाल आज निश्चिण्यास साधन नाहीं ' असें श्री. ठाकूर लिहितात. पैकीं ' बावडेकर पंत अमात्य यांचें वंशवृत्त ' या लेखमालेंत रामचंद्रपंत यांचा अंतकाल सन १७२० दिल्याचें स्मरतें आणि त्याच लेखाचे आधारें श्रीसमर्थसांप्रदायास जोडलेल्या श्रीचरित्रपर निबंधांत " रामचंद्र नीळकंठ यांचा मृत्युशक १६४२ ( इ.स. १७२० ) आहे...... ( रामचंद्र नीळकंठ शिवराज-चरित्र ) अतिशय ठळक

करी नित्य नैमित्य । ज्यांचीं वृंदावनें लोक नित्य । पराशर पर्वतीं पूजिताती ॥ ५ ॥ स. ११ असा उल्लेख श्रीसमर्थप्रतापांत असल्यानें ) प्रतापाची रचना श. १६४२ नंतर झाली हें निश्चित " असें विधान केलें आहे ( पृ. ५६ ). तेव्हां रामचंद्रपंताचा मृत्युशक १६४२ ( सन १७२० ) याबद्दल अधिक शोध व्हावयास पाहिजे. पन्हाळ्यास ' वृंदावन-पूजन ' व तत्संबंधीं प्रतिवार्षिक समाराधना हीं अद्यापि चालू असतील तर त्यांवरून मितिहि निश्चित होऊं शकेल.

आतां जन्मकालाबाबत अनुमान करण्यासारखीं प्रमाणें आहेत तीं येणें प्रमाणें—

( १ ) " सिंहासनाचे सभोंवार हातांत सुवर्णादिकलश घेतलेले अष्टप्रधान अष्टदिक्स्थानापन्न होते; त्यांत, पश्चिमेस रामचंद्र नीळकंठ पंडित अमात्य दधिपूर्ण ताम्रकलश घेऊन उभे राहिले होते. " हा उतारा श्री. ठाकूर यांनींच दिला आहे.

( २ ) हनुमंत स्वामीकृत ( वस्तुतः मल्हार रामराव चिटणीसकृत ) बखरींत शिवराज्याभिषेक-समयीं चाफळच्या रामनवमीमहोत्सवांतील मान निश्चित केले त्यांत ( १ ) समर्थसंस्थानचे खर्चाचा बंदोबस्त, ( २ ) ब्राह्मणपूजन, ( ३ ) कीर्तनाची बैठक घालणें, आणि श्रीसमर्थ गादीवर विराजमान असता ( ४ ) डावे बाजूचें मोर्चेल इतके मान एकट्या रामचंद्रपंताकडे दिल्याचा उल्लेख आहे. आणि त्यास श्रीसंप्रदायिक कागदपत्रें लेखांक ४२ नें दुजोरा मिळतो.

तेव्हां यासमयीं म्हणजे श. १५९६ मधें वरील महत्वाचीं कामें संभाळण्यासारखें रामचंद्रपंताचें वय सुमारें २०–२५ वर्षांचें होतें हें

निश्चित. या मुद्याचा अधिक विचार करण्यासारखा पुरावा पुढील कर्यंत आहे.

*भीमस्वामी शिरगावकर यानीं लिहिलेल्या अभंगात्मक भक्तलीलामृतात ( अभंग ३५–३८ ) रामचंद्रपंताच्या मातुश्रीची व रामचंद्रपंताच्या जन्माची माहिती दिली आहे ती अशी—*

तेथें निळोपंत अमात्य रायाचा । आले भेटायाचा आनंदानें ॥
भेटी होतां रायें सर्व वर्तमान । केलें निवेदन सद्गुरूचें ॥
ऐकताचि प्रेमा तयासी होवोनी । रायासी पुसोनी निघते जाले ॥
आले चाफळासी जाहालें दर्शन । प्रेम आलें पूर्ण भीम म्हणे ॥

\+ \+ \+ \+

भावार्थ पाहोनी दिल्हा अनुग्रह । आज्ञा घेवोनी ये रायापासी ॥ १ ॥
राव म्हणे गुरु–भाऊ जालों आता । म्हणोनिया माथा ठेवी पाईं ॥ २ ॥

\+ \+ \+ \+

निरबाई पतिव्रता पुसे स्पष्ट । म्हणे तुम्ही कोठें गेला होता ॥ ३ ॥
रायापासोनीया वृत्तांत जो जाला । तये निवेदिला महिमा सारा ॥ ४ ॥
ऐकता चि तये नेत्रीं आले अश्रु । म्हणे ते सद्गुरु भेटती कैं ॥ ५ ॥
दर्शन होईल तरी अन्न खाणें । अपवित्र जिणें गुरवीण ॥ ६ ॥
तीन दिवस जाले बहुतीं वर्जिलें । परि नाहीं घेतलें अन्नपाणी ॥ ७ ॥
प्रहर रात्रींत आले स्वामी तेथें । म्हणती क्षुधित तीं दिसाचा ॥ ८ ॥
ऐकोनिया सती घाबरीच जाली । चुलीपासी गेली पहावया ॥ ९ ॥
किंचितसा अग्नि आंत पाहोनिया । भीम म्हणे तया काय केलें ॥१०॥३६॥

\+ \+ \+ \+

साडी नेसली ते फाटोन पेटवी । वरी आधण ठेवी क्षीरीलागीं ॥ १ ॥
सर्व घरातील शाल्या सोंवळ्यास । जाळिताच त्यास स्वामी पाहाता ॥ २ ॥

सेवायाची क्षीर करोनी धाडिली । स्वामींनीं सेविली यथासांग ॥ ३ ॥
उरल्या प्रसादासी ग्रहण करून । अनुग्रह सांग दिल्हा तये ॥ ४ ॥
भ्रताराची उंच होती शाळ जोडी । मनांत आवडी जाली यांचा ॥ ५ ॥
पाहों गेली तंव जाळोनी टाकिली । बहु खिन्न जाली मनामाजीं ॥ ६ ॥
जाणोनी अंतर स्वामी ह्मणती तये । गवाळ्यांत पाहे स्वस्थ चित्तें ॥ ७ ॥
गुल्बस्ला काशाचा ह्मणूनी निळोपंत । गृहांत जों येत तंव स्वामी ॥ ८ ॥ ३७ ॥

\+ + + +

प्रसन्न होवोनी ह्मणती मागे वरा । ते ह्मणे दातारा पुत्र देई ॥ १ ॥
नारळ योट्यांत घालिता स्वामींनीं । नमन उभयांनीं केलें तेव्हां ॥ २ ॥
वर्षां पुत्र होतां घेवोनी तयासी । आली स्वामीपासीं दर्शनासी ॥ ३ ॥
रामचंद्र नाम ठेविलें स्वामींनीं । पूर्ण कृपा करुनी पाठविली ॥ ४ ॥
मुंजहि तयाची केली स्वामीपासीं । अनुग्रह त्यासी केला तेव्हां ॥ ५ ॥

हनुमंत स्वामीकृत बखरींत शिवानुग्रह प्रकरणीं शिवरायाबरोबरच बाळाजी आवजी व निळो सोनदेव ( ह्मणजे रामचंद्रपंताचे वडील ) यांसहि खडीचे मारुतीचे खालीं बागेंत अनुग्रह झाला असें म्हटलें आहे. पुढें १।२ दिवसांत राजे शिवछत्रपति व त्यांचे अनुयायी यांस उद्देशून राजधर्म, क्षात्रधर्म व सेवकधर्म हीं प्रकरणें उपदेशिलीं आणि त्यांचा उल्लेख श्रीसांप्रदायिक कागद-पत्रांतहि आला आहे. म्हणून बखरच अधिक प्रमाण वाटतें. तेव्हां बखर किंवा भक्त-लीलामृत कोणतेंहि प्रमाण मानिलें तरी रामचंद्रपंतांच्या मातुःश्री निराबाई यांना श्रीसमर्थांनीं अनुग्रहपूर्वक श्रीफळप्रसाद श. १५७१ च्या वैशाख शु. ९ नंतर दिला एवढें निश्चित. बखर प्रमाण धरिली तर हा प्रसंग १५७१ वैशाख कृष्ण पक्षांत अथवा ज्येष्ठ शुक्ल पक्षांत घडला असेल अथवा भक्तलीला-

मृताप्रमाणें पाहिल्यास शिवानुग्रहानंतर २।३ महिन्यांत झाला असेल असें मानावें लागतें. यावरून रामचंद्रपंताचा जन्म शके १५७१ चे अखेरीस अथवा श. १५७२ चे पहिले तिमाहींत झाला असावा. रामचंद्रपंताच्या जन्माचें हें वर्ष निश्चित झालें तर तें पुढील कोणत्याहि प्रसंगास आड येत नाहीं. हें वर्ष प्रमाण धरलें तर शिवराज्याभिषेकसमयीं रामचंद्रपंताचे वय २४।२५ अर्थात् मोठमोठ्या जबाबदाऱ्या स्वीकारण्यास योग्य असेंच होतें असें दिसतें आणि पुढें औरंगजेबाच्या स्वारीच्या प्रसंगीं रामचंद्रपंताची जी कर्तबगारी दिसून आली तिचा ' श्रीगणेशा ' शिवसमर्थांच्या तालमींतच झाला होता असें उघड होतें.



( २० )

श्री सद्गुरु प्रसन्न

# श्रीमत् दासबोधाच्या नवव्या दशकांतील दहा हि समासांचा समन्वय

( लेखक—रा. महादेव काशीनाथ खेर, बी. ए., इंदुर )

ग्रंथराज दासबोधांतील पहिले सात दशक व त्यांचा परिपोषक आठवा ज्ञानदशक हे पूर्वार्धांत गणले जातात; व पुढले नऊ ते वीस दशक उत्तरार्धांत गणले जातात अशी परिपाटी आहे. या परिपाटीस फुलबडीकारांची हि संमति असल्याचें समजतें. पूर्वार्ध व उत्तरार्ध असे विभाग पाडण्यापासून मूळग्रंथांतील दशकांची किंवा त्यांतील समासांची संगति, परस्परपोषकता, किंवा जन्यजनकभाव यांना बाध येत नसतो. शिवाय श्रीसमर्थ पहिल्या नमनाच्या समासांत लिहितात कीं, 'तथापि अवघा दासबोध । दशक फोडोनि केला विशद । जे जे दशकींचा अनुवाद । ते ते दशकीं बोलिला ॥' याप्रमाणें या ग्रंथराजाचे विषयवार दशक फोडून त्यांतील विषयांचा अनुवाद त्या त्या दशकांत स्पष्ट केला आहे. अर्थात् वीस हि दशकांचा परस्परान्वय त्यांनीं कायम ठेविला आहे. दशकांचा परस्परान्वय देण्याचा या प्रसंगीं हेतु नाहीं; केवळ उत्तरार्धांतील प्रथम दशक म्हणजे ग्रंथराजांतील नववा दशक घेऊन त्याचा तदंतर्गत दहा समासाशीं कसा समन्वय आहे तो दाखविण्याचा यथामति प्रयत्न केला आहे.

आठव्या दशकाचें शीर्षक मायोद्भव नाम असें दिलें आहे. 'ब्रह्मीं माया कैसी झाली ' अर्थात निरवयव ब्रह्मांत चराचरसृष्टि कशी

झाली असा आक्षेप घेऊन मायेचा उद्भव दाखविला, तिचें मुळांत च पांचभौतिक रूप दाखविलें म्हणजे मूळमायेचा सूक्ष्म विचार सांगितला. नंतर नवव्या दशकास गुणरूप नामाभिधान देऊन आठव्या दशकाचा जनकभाव प्रदर्शित करून मूळमायेपासून गुणक्षोभिणी मायेचा जन्म कसा झाला हें सविस्तर सांगितलें; त्रिगुणांचें प्रमाण व तदंतर्भूत भूतांचीं हि रूपें दाखविलीं व शेवटीं भ्रममूलक जगाचा निरास करून आत्मस्थिति हि पूर्णपणें दाखविली हा च या दशकाचा प्रधान अनुवाद होय. आतां त्यांतील समासांचा परस्पर अन्वय कसा आहे तो पाहूं.

श्रीसमर्थ बहुधा दशकाच्या शेवटीं पुढील दशकाचें अवतरण देत असतात. त्याप्रमाणें च समासाच्या अंतीं सुद्धां अवतरण देऊन वाचकांचा किंवा श्रोत्यांचा पुढील विषयांत प्रवेश करून देत असतात. आठव्या दशकाच्या म्हणजे ज्ञानदशकाच्या शेवटीं आत्मज्ञान पूर्ण रीतीनें निरूपिलें; व न्यूनपूर्णाची क्षमा हि नम्रतेनें मागितली. त्याच दशकांत सूक्ष्ममायेचा उद्भव हि दाखविला. परंतु त्यापुढील विषय म्हणजे गुणक्षोभिणी मायेचें रूप प्रस्तुतच्या दशकांत दाखवावयाचें आहे. अर्थात् तें आत्मज्ञान नव्हे, तर निरवयव ब्रह्मामध्यें सृष्टिरचना कशी झाली हें प्रतिपादावयाचें आहे. निरूपण दोन प्रकारें केलें जातें; एक अन्वयानें व दुसरें व्यतिरेकानें अर्थात् निषेधमुखानें. आत्मज्ञानांत साक्षात् सृष्टिरचनेचा समावेश होत नसल्यामुळें या पहिल्या समासांत व्यतिरेकाचा च अवलंब श्रीसमर्थांस धरावा लागला. ब्रह्म निराकार, निराभास, निर्विकल्प, निरामय, निरवयव, निरुपाधि, निष्प्रपंच, निष्कलंक, निरंजन, निरुपम, निरंतर, निरापेक्ष, निःसंग, निर्मळ, निवृत्ति, निःशब्द, अनाम्य, अप्रलक्ष, अरूप, अलक्ष, अद्वैत, अनंत, अदृश्य, अच्छेद्य, अदाह्य इत्यादि विशेषणांनीं पूर्वीं निरूपित केलें. व या दशकांत तर गुणरूपाचें च प्रतिपादन होणार आहे. तेव्हां श्रोत्यास शंका उत्पन्न झाली कीं, या विरोधाभासाचा समन्वय कसा लागणार! एवढ्याकरितां वरील व्यतिरेक पदाचा निश्चित अर्थ श्रीसमर्थांच्याच मुखांतून ऐकून घ्यावा म्हणजे बरें. श्रीसमर्थ हि श्रोत्याचा अंतस्थ हेतु जाणून

समासाच्या एका शेवटच्या ओवींत समर्पक उत्तर देतात कीं, ब्रह्म हें या सकळांपरतें आहे व त्याला पहाण्याचा निश्चय जर तूं केलास तर तूं च तें ब्रह्म आहेस असा च तुला अनुभव येईल. अर्थात " तूं " हें सकळ दृश्य असून हि त्या तुला, अदृश्य ब्रह्म, अंतर्बाह्य व्यापून कसें अलिप्त, निर्गुण व निराकार आहे याचा प्रत्यक्षच अनुभव तुला येईल व मग तुझ्या आशंकेचें निरसन सप्रचीत होईल. म्हणून या समासास " आशंका नाम " असें नांव श्रीसमर्थांनीं ठेविलें. तूं च तें आहेस असें सांगण्यानें दहाव्या समासाचा म्हणजे स्थितिनिरुपणाचा समावेश या दशकांत कां केला याचें हि रहस्य येथें ध्वनित केलें व ' फळ एक व आपण एक। ऐसा नाहीं हा विवेक। फळाचें फळ कोणी येक। स्वयेंचि होइजे ॥ या समारोपाचें रहस्य अनुभवानें पटविलें.

सातव्या दशकांतील एका समासांत चतुर्दश ब्रह्माचीं संकेतनामें दिलीं. नंतर त्यांच्या व्याख्या हि सांगितल्या व शेवटीं त्या संकेताचें वर्म दाखवून तोच समास पूर्ण केला. त्याप्रमाणें च येथें पहिल्या समासांत व्यतिरेक पदें दिलीं; त्यांच्या व्याख्या हि त्रोटकशा दिल्या, पण त्यांचें सोपपत्तिक वर्म त्या समासांत दाखविलें नाहीं. तें आतां दुसऱ्या समासांत दाखविलें जात आहे. श्रोत्याचा पहिला संकेत निराकाराविषयीं होता. त्याचें च वर्म दाखवून स्वरूपाची हि सिद्धि दाखवितात.

श्रीसमर्थ म्हणतात कीं, साकार जेवढें दिसतें त्यास कल्पांतीं नाश होतोच. पण ज्याच्यावर हा आकार दिसतो तें मात्र ' असत चि असे. ' अशी निरंतर असणारी जी सार वस्तु तिलाच स्वरूप असें म्हणतात व तें तर भगवंताचें निजरूप आहे. वस्तुतः तें स्वरूप नामातीत आहे पण त्यास समजण्याकरिता नामाचा संकेत द्यावा लागतो एवढें च. तें दृश्याला सबाह्य व्यापून राहिलें आहे तरी सुद्धा तें विश्वास चोरलें आहे. जवळ असताना हि जर तें नाहींसें झालें आहे तर मग तें ' असत चि असे ' असें कसें ह्मणतां येईल ? श्रीसमर्थ म्हणतात, निराकार स्वरूपाला तुम्ही आपल्या चर्मचक्षूंच्या दृष्टीनें पाहण्याचा विचार करितां.

पण दृष्टीला दृश्य पाहण्याची सवय लागली आहे व ती सजातीय न्यायानें योग्य च आहे. कारण दृष्टि व दृश्य हीं दोन्हीं अविद्यात्मक च आहेत. या आपल्या दृष्टीनें जर पाहूं लागलांत तर दृश्य पाहून संतोष वाटेल खरा; पण तें दृश्याचें देखणें होईल, सत्यस्वरूपाचें देखणें होणार नाहीं. हें पहा ज्या वेळेस आपण एखादा डोंगरासारखा पदार्थ पहातों त्या वेळेस आपणाला डोंगर च दिसतो, पण त्या डोंगराच्या पोटांतलें आकाश दिसतें कां? तर नाहीं. हीं तर आकाराची गोष्ट झाली. पण या हि पेक्षां भासाचा प्रकार फार सूक्ष्म आहे. ज्याप्रमाणें पर्वताच्या पोटांतलें आकाश दिसत नाहीं त्याप्रमाणें च आकाशांत भासणाऱ्या चित्र विचित्र रंगांच्या आंत असणारें आकाश दिसत नाहीं. भास मात्र भासतो. पण भास नाशवंत आहे. पदार्थामध्यें असणारें आकाश व भासामध्यें असणारें आकाश हीं जरी आपणास दिसत नसलीं तरी आकाश नाहीं असें म्हणतां येईल कां? विचार करा कीं, आकाश त्यांच्या जवळ च असतें कीं नाहीं? त्या च प्रमाणें जगदीश ( स्वरूप ) सर्वांना सबाह्यांतर व्यापून राहिला आहे व संनिध च आहे. श्रीसमर्थांनीं किती सोपपत्तिक व सयुक्तिक वर्णन करून श्रोत्याला त्याच्या सान्निध्याची अर्थात् ' असत चि असे ' याची सप्रचीत साक्ष पटवून दिली आहे पेरे? ही त्यांची अपूर्व शैली च होय. येथपर्यंत पिण्डातील दृष्टीचा खेळ दाखविला. ब्रह्मांण्डांतील चारी भूतांत तें असतें च. पण त्यांचे धर्म त्यास लागत नाहींत; म्हणून च तें अच्युत, अछेद्य, अदाह्य व अढळ असें आहे. पण अशा रीतीनें निरंतर संचलेलें ब्रह्म असून हि त्याचें आकलन होत नाहीं; कारण इतकें च कीं या अखिल ब्रह्मामध्यें भेदोत्पत्ति करणारी अहंता आहे. अहंता जेव्हां स्वरूपाकडे धांव घेते, त्या वेळेस " आतां मी च तें स्वरूप " असे अनुभवाचे बोल सुद्धां ती बोलून दाखविते पण अनुभवाला मात्र मुकते. मुकण्याचें कारण इतकें च कीं, अनुभव हा अनन्य असतो म्हणजे अन्यपणाचें ( अनात्मपणाचें ) बंड त्यांत नसत. या अन्यपणाचा संग नाहींसा झाला कीं, आत्मा आत्मपणानें

च उरतो. मात्र आत्मपणाची जाणीव सुद्धां आत्म्यास ( स्वरूपास ) नसते हें च आत्म्याच्या निःसंगपणाचें रहस्य होय. असो.

श्रीसमर्थ अन्वयांत[1] म्हणतात कीं, ' मुळीं ब्रह्म निराकार । तेथें स्फूर्तिरूपें अहंकार । तो पंचभूतांचा विस्तार । ज्ञानदशकीं बोलिला ॥ मूळप्रकृति महाकारण । देह सर्वेश्वराचें जाण । त्यांत पंचभूतें जाण । सूक्ष्म असतीं ॥ ( २ । १० ) व एके ठिकाणीं असें हि म्हणतात कीं, ' ब्रह्माहमस्मि हें स्फुरण । पडे देहाचिया माथां जाण । तात्पर्य इतकें च कीं ईश्वराचा जो चौथा देह मानला जातो त्याच्या च माथ्यावर हें स्फुरण पडतें. निराकार ब्रह्माच्या ठिकाणीं हें स्फुरण च नाहीं हें यावरून सिद्ध होत नाहीं कां ? अरे जे मुळीं जालें च नाहीं । म्हणूनि अनिर्वाच्य पाहीं । ऐसें सांगणें तेंही । निर्वांत जालें ॥( व्य. ११-१२) असो. एवढ्याचकरितां ही अहंता निराकार ब्रह्मापासून वेगळी पडते. पण ऐक्य साधावयाचें हा हेतु आपल्या कल्पनेंत असतो च म्हणून कल्पना ही माया अथवा मूळप्रकृति होय. यास च हरिसंकल्प असें म्हणतात पण तो हि मिथ्या च. द्वैताची कल्पना केल्याशिवाय अद्वैत सिद्ध च होत नाहीं किंवा सांगतां येत नाहीं. म्हणून श्रीसमर्थ सांगतात कीं ' निःसंगाचें लक्षण । हें वाच्यांशें बोलिलें जाण । कळावयाकारणें ॥ व्यवहारांत सुद्धां आकाश सर्वत्र संचलेलें असतांना हि घटामध्यें भरलेल्या आकाशास आपण घटाकाश असें केवळ कल्पनेनें च म्हणत नाहीं कां ? घट फुटल्यावर त्यांतील आकाशास समरस होण्याकरितां कोठें जावें लागतें कां ? त्या प्रमाणें मूळप्रकृति हा ईश्वराचा देह कल्पनेच्या उपाधीनें च आपण बनविला. मग ती उपाधि नष्ट झाली कीं, सर्वत्र संचलेलें ब्रह्म च उरत नाहीं का ? व मग अहंता हा भ्रम ठरत नाहीं कां ? तो उपाधीबरोबर मध्यें च दिसतो व तिच्या नाशाबरोबर च

---

[1] अन्वय व्यतिरेक हीं प्रकरणें श्री समर्थांचीं नसून त्याचे शिष्य सीताराम म्हणून होते, त्यांचीं आहेत परंतु पूर्वप्रकाशकांनीं तीं समर्थांच्या नांवावर प्रकाशित केलेलीं असल्यामुळें पुष्कळांचा अकारण गैरसमज झाल्याचें वारंवार आढळतें.

–संपादक

नाहींसा होतो. मायेमुळें च ब्रह्मास ईश्वरत्व प्राप्त झालें तें हि काल्पनिक च. मग मी व माझें हें अवघें चि काल्पनिक. अर्थात मी लटिका पुरुष व प्रकृति हीं दोन्हीं लटिकीं. या दोघांचा हि निरास झाल्यावर मग " मीपण " हा विशेष कसा राहूं शकतो ? अर्थात मीपणास ( अहंतेस ) थारा च राहत नाहीं. पण हें सर्व विवेकानें कळतें व कळल्यावर तें काल्पनिक असल्यामुळें न केल्यासारिखें होत नाहीं कां ? म्हणून च श्रीसमर्थ ' करून काहीं च न करावें । असोन निःशेष नसावें । विवेकबळें ॥ अशी शेवटीं ओवी घालून पुढील समासाचें अवतरण करतात.

या दुसऱ्या समासांत श्रीसमर्थांनीं पहिल्या समासांतील व्यतिरेक-पदाचें वर्म सक्रिय व सानुभव स्पष्ट तर केलें च पण या अभेदात भेद पाडविणारी जी अहंता तिचें हि यथार्थ स्वरूप वर्णन केलें. तें मीपण भ्रमात्मक ठरवून प्रकृति व पुरुष हीं दोन्हीं लटिकीं असें हि ठरविलें व आत्मप्रचीति बाणविली. नंतर या मीपणास स्वरूपात मुरविलें म्हणून या समासास ब्रह्मनिरूपण असें नांव दिलें. मीपण हें मायेचें रूप असल्यामुळें गुणरूप या दशकाच्या नांवास हि सार्थक केलें.

वर ओवी दिली च आहे कीं, करून काहीं च न करावें । असोन नि.शेप नसावें । विवेकबळें ॥ ही तिसऱ्या समासाची अवतरणिका होय. येथें श्रोत्यास संदेह उत्पन्न झाला कीं भोगून अभोक्ता, करून अकर्ता, असें जर योगीश्वराचें ब्रह्मज्ञान असेल तर मग स्वर्गाला व नरकाला जाऊन हि न गेल्यासारखें होईल, जन्ममृत्यु भोगून हि न भोगल्यासारखें होईल व मग पतित आणि सिद्ध हे दोघे बरोबरीचे च म्हणावे लागतील. यास श्रीसमर्थ उत्तर देतात कीं, अशा आडरानात जाऊन उगा च शब्दच्छल का करिता ? ज्ञानाची संपत्ति नसली म्हणजे अज्ञानदारिद्र्य भोगलें च पाहिजे. मनुष्य आपापल्या अनुभवाप्रमाणें बोलत असतो. योगी ओळखावयास योगी च झालें पाहिजे ! हें पहा भूतानें झडपलेला हि देहधारी च व मंत्राक्षरी हि देहधारी च. या दोघास देहसाम्यानें कोणता

जाणता मनुष्य सारखे समजेल बरें ? त्या च प्रमाणें अज्ञानी हा पतित व ज्ञानी तो जीवन्मुक्त या दोघांस समान कोण लेखील बरें ?

पण हे दृष्टांत कराला पाहिजेत? प्रचीतीचें तत्व लाऊन पहा म्हणजे याचा निर्णय तेव्हां च लागेल. हें पहा, आकार म्हणून जेवढा आहे त्या सर्वांचा लय विवेकांत होतो व हा ज्ञानी तर विवेकांत विरलेला च असतो; तसें च सर्व वृत्तींचा लय एका ज्ञानांत च होतो व हा ज्ञानी तर ज्ञानबलावर निश्चल राहतो म्हणजे आकार व वृत्ति यांचा लय झाल्यावर गुप्त च असतो. शिवाय ब्रह्माशीं त्याचें अनन्यत्व झालेलें असतें. मग उरतें काय तें सांग पाहूं? केवल अस्तित्व असतें म्हणून असा ज्ञानी, असून हि देहाकारानें म्हणजे द्वैतभावानें निःशेष नसतो; कारण त्याचें चित्त च चैतन्य झालेलें असतें. तत्वांच्या गांठोड्यांत तो सांपडत नाहीं, व त्याचें अंतर शोधावें तर तो निरंतर असतो. तात्पर्य इतकें च कीं, हेतु, विकार वगैरेंचा त्यास विटाळच नसतो. म्हणून त्यास सहजीं सहज आत्मा असें म्हणतात. अशा तऱ्हेचा जीवन्मुक्त दोन दृष्टींनें पाहिला जातो. देहाकारानें जे त्यास पाहतात त्यांना फक्त त्याचा देह च दिसतो पण ज्ञान्यास तो विदेही दिसतो. भावासारखी च फलद्रूपता होत असते. जर कोणी समर्थ राजाचें महिमान जाणूं लागेल तर त्यास समाधान प्राप्त होईल परंतु श्वान देह पाहून च भुंकतें कारण श्वान च तें. तसा अज्ञानी मनुष्य या ज्ञान्यास सत्यस्वरूप न पाहता, मनुष्यरूप च पाहतो. पण ज्ञानी त्याचें अंतर पाहतो म्हणून त्यास तो जन्ममरणरहित सत्यस्वरूप दिसतो. हें पहा, देव निर्गुण निराकार असतांना हि अज्ञानी मनुष्य पाषाणाला च देव समजतो कीं नाहीं या त्याच्या स्वभावास काय करावें? काष्ठ जळावयास लागलें कीं अग्नि तदाकार दिसत नाहीं का? म्हणून तो काष्ठ होईल का ? नाहीं. एकास मुळ्वी सर्पाकार भासते व तो भितो तर दुसरा ती मुळ्वी आहे असें जाणतो. एकाचा भयानें प्राण जातो तर दुसरा जाणता मनुष्य त्या मुळीला हातात घेतो पण ती त्यास डसत नाहीं; मग या दोघांस समान कोण समजेल बरें ? यावरून काय

निष्पन्न होतें ! ज्याला जाणपण म्हणजे ज्ञान असतें तो ज्ञानी व ज्यास तें नसतें तो अज्ञानी. परमार्थांत ज्ञान्यास ज्ञान असल्यामुळें तो मुक्त होतो पण नेणत्यास जन्ममरणाचे कष्ट भोगावे लागतात. या सर्वांच्या बुडाशीं जाणीव व तद्विपरीत नेणीव असते असें सप्रचीत सिद्ध करून श्रोत्यास निःसंदेह केलें म्हणून या समासास निःसंदेह निरूपण असें नाव दिलें. एका जाणपणाकरितां च सर्वांची खटपट असते व तदभावीं कष्ट कसे होत असतात, हें च कथानुसंधान पुढल्या समासात केलें जाणार आहे असें सांगून श्रोत्यास सावधान होण्यास श्रीसमर्थ सुचवितात.

श्रीसमर्थांनीं या समासात एका दगडानें दोन पक्षी कसे मारले हें मार्मिक वाचकाच्या लक्षांत आलें च असेल. द्वितीय समासात मीपणाचें स्वरूप दाखवून द्वैतपणाचा निरास तर केला च, पण हें अद्वैत ब्रह्मज्ञान " असून नि शेष नसावें " अशा प्रकारचें असतें. अर्थात् जाणपण हस्तगत झाल्याशिवाय असा प्रकार साधत नसतो. अभेदात भेद झाला कीं, ज्ञान व अज्ञान म्हणजे जाणीव व नेणीव असे दोन भाग पडतात. जाणत्यास भान उघडा होतो पण नेणत्यास तो होत नाहीं; म्हणून आनुषंगिक कल्पना उत्पन्न करून तिचें निःसंदेहपणानें निरसन तर केलें च पण तिच्या बुडाशीं असलेल्या जाणपणा हि व्यक्त दशेस आणिला. ज्ञान्यास द्वैताचा अभाव तर अज्ञान्यास द्वैताची भ्रामक सिद्धि असें विचित्र मिश्रण यात ध्वनित केलें. अहंस्फुरण म्हणजे माया हिचा उद्भव दाखवून तिच्या च पासून ज्ञान अज्ञान अशीं दोन अपत्यें व्यक्तदशेस आणून दिलीं व हा समास गुणरूपाचा च आहे अशी हि साक्ष वाचकास पटविली. जाणीव हें सत्त्वगुणाचें लक्षण आहे. ज्ञानं तु प्रकृतेर्गुण असें भागवतकार हि म्हणतात. अशा रीतीनें जाणीव व तद्विपरीत नेणीव याचें *अवतरण या समासात श्रीसमर्थांनीं केलें व त्याचें च दृढीकरण ते पुढल्या* समासात करणार आहेत असें हि सांगून दिलें.

श्रीसमर्थ व्यवहार व परमार्थ याची सांगड नेहमीं च घालीत असतात. निरूपणाचे वेळीं प्रथम ते व्यवहारातले दृष्टांत देऊन विषयाचें

स्पष्टीकरण करीत असतात; परंतु त्यांचा भर आत्मप्रचीतीवर विशेष असतो. शास्त्रानें आत्मप्रचीतीस पुष्टीकरण मात्र मिळत असतें. मागच्या समासांत सुद्धा दृष्टात दिल्यावर आत्मप्रचीतीची कसोटी त्यानीं लाविली होती हें वाचकाच्या निदर्शनास आलें च आहे. या चोथ्या समासांत सुद्धा पहिला आक्षेप व्यवहारांतील विषमतेवर आहे. विषमता अथवा नानात्व हें मायेचें लक्षण आहे. तेव्हां एक राजा तर एक रंक, एक निर्मळ तर एक ओंगळ असा विषमभाव का दिसावा असा प्रश्न श्रोत्यानें केला. त्यास श्रीसमर्थांनीं उत्तर दिलें कीं, ' हे सकळ गुणापाशीं गती ' गुणवानास भाग्य प्राप्त होतें, तर अवगुण्यास दारिद्य. हें पहा, एका च घरीं जन्मलेल्या व एका च व्यवसायात असलेल्या दोन पुत्रांपैकीं जाणता यशस्वी होतो व नेणता भीक मागतो. विद्या, बुद्धि, प्रयत्न व विवेक हे गुण नसतील तर तो ओंगळ व विकारी असतो. यात पहिले दोन गुण व्यवहारातले व दुसरे दोन गुण विवेक आणि पुरुषार्थ हे परमार्थातले, म्हणून च असा मनुष्य व्यवहारात ओंगळ, व परमार्थांत विकारी असतो. मनुष्याची च गोष्ट कशाला ? पक्षी जर गुणवंत असले तर त्याच्यावर समर्थ कृपा करीत नाहींत का ? गुणाच्या अभावीं साहजिक च अवलक्षण प्राप्त होतें. प्रपंचात काय किंवा परमार्थांत काय जाणत्याची च किंमत, नेणत्यास कोणी च विचारीत नाहींत. अज्ञानामुळें मनुष्य प्रपचात ठगतो, त्यास शत्रु जिंकितात इतकें च नव्हे तर तो प्राणास हि मुकतो. त्या च प्रमाणें परमार्थांत आहे. मायाब्रह्म, जीवशिव, सारअसार जाणल्यानें च जन्ममरण चुकतें. तसें च देवास निर्गुण जाणणें, मी कोण हें शोधणें, व अनन्यपणाचें ज्ञान असणें यानीं च ज्ञानी मुक्त होतो. व्यवहारात सुद्धा समर्थाचें अंतर ओळखून च लोक वैभवास चढतात कीं नाहीं ? राजकारण नीट समजलें नाहीं, तर त्या पुरुषाचा प्राण अधिकारी लोक घेतात कीं नाहीं ? म्हणून जाणणें हा उपाय व नेणणें हा अपाय. पण काय करावें ! जाणणें सर्वांस प्रमाण वाटत असताना मूर्खास मात्र तें अप्रमाण वाटतें ! म्हणून जाणणें ही सामान्य गोष्ट नाहीं. या

जाणण्यामुळें च विज्ञान हि कळून येतें. विज्ञान झाल्यावर जाणपणा खुंटतो व मग निर्हेतुक समाधान प्राप्त होतें, इतकी या जाणपणाची महती आहे; म्हणून च या समासाला ' जाणपण निरूपण ' असें नांव दिलें.

चौथ्या समासांत जाणपणाचें दृढीकरण केलें, त्याची प्रतिष्ठा हि स्थापित केली व तें जाणपण सामान्य गोष्ट नाहीं हें हि श्रोत्यास पटविलें. येथपर्यंत पिण्डांत ज्ञानी व अज्ञानी या विभागांनीं जाणपणाची व्याप्ति दाखविली; अर्थात् जीवामध्यें जाणपणाची व्याप्ति कशी असते तें दाखविलें. पण अशी च त्याची व्याप्ति ईश्वरांत हि आहे असें दाखविल्याशिवाय जाणपणाची व्याप्ति पूर्णत्वानें होत नाहीं. मायेंत पिंड व ब्रह्माण्ड असे दोन भाग आहेत म्हणून ब्रह्माण्डांत हि जाणपण आहे हें व्यक्त करून दाखविण्याकरितां श्रीसमर्थ श्रोत्याच्या तोंडून पिंड व ब्रह्मांड यांचें ऐक्य मला दाखवा अशी विनंति वदवून पांचव्या समासाचें ते अवतरण करतात.

या समासांत श्रोता विचारतो कीं, पिंडीं तें चि ब्रह्मांडीं अशी लोकधाटी, स्थूल, सूक्ष्म, कारण, व महाकारण असे पिण्डाचे चार देह, तर विराट्, हिरण्यगर्भ, अव्याकृत व मूळमाया असे चार देह ब्रह्मांडींचे म्हणजे ईश्वराचे अशी शास्त्रधाटी. अंतःकरण, मन, बुद्धि, चित्त व अहंकार असें अंतःकरणपंचक पिंडांत तर विष्णु, चंद्र, ब्रह्मा, नारायण व रुद्र अशा पांच अंतःकरणाभिमानिनी देवता ब्रह्मांडांत इत्यादींचें साम्य लक्षण मला समजावून द्या. श्रीसमर्थ म्हणतात, प्रचीतीशिवाय बोलणें च फोल. एकदां का अनुभवाचे नेत्र गेले कीं, सर्वत्र अंधःकार च. अनुमानाचें बोलणें कल्पनामात्र होय. कल्पनेनें मंत्र केले; मग देवांस मंत्राधीनत्व आलें. तसें च पिंडाप्रमाणें ब्रह्मांड कल्पिलें तर अशा अनुमानाचे प्रसंगीं न बोलतां च राहणें बरें. कारण या पांचों देवतांचा निर्माणकर्ता किंवा संहारकर्ता कोण याचा विचार कळल्याशिवाय अंधःकारांत च चांचपावें लागेल. म्हणून सारासार विचार करून प्रचीतीस जें येईल तें च निश्चयात्मक मानावें. एवढें मात्र खरें कीं,

ब्रह्मांडीची विस्तृत प्रमावळी पिण्डांत प्रत्ययास येत नाहीं. पांच भूतांचें च ब्रह्मांड व पांच भूतांचा च हा पिंड येवढें च कायतें या दोहोंत साम्य. बाकीचें सर्व अनुमान म्हणजे पिण्डब्रह्माण्डांच्या देहांचें स्थानमान, रचना, व तदंतर्गत पदार्थ वगैरे बद्दलचें बोलणें अनुमानाचें आहे. यांत मुख्य प्रचीतीचें समाधान कसें प्राप्त होईल ? अनुमानाचें येथें काम च नाहीं. अशा रीतीनें अनुमानाचें निरसन केलें व नगद प्रचीति आणून दिली म्हणून या समासास अनुमान निरसन असें नांव देण्यांत आलें.

चौथ्या समासांत जाणपण पिंडांत स्थापित केलें पण जर तें ब्रह्माण्डांत असल्याचें दाखविलें नाहीं तर ज्ञानाची सर्वव्यापकता विस्खलित होऊन त्यास एकदेशीयत्व प्राप्त होतें म्हणून पिंडब्रह्मांडाच्या ऐक्यमिषानें पांचवा समास हा मधला दुवा म्हणून घातला. जाणपणाची व्याप्ति वस्तुतः पुढील समासांत दाखविणार आहेत त्याची पूर्व तयारी हा पांचवा समास होय. आतां ते सहाव्या समासांत शीर्षकांतील गुणरूप दाखवीत आहेत म्हणून हा समास अत्यंत महत्वाचा आहे.

दुसऱ्या समासांत अहंकर्तृत्वरूपी मूळमायेचें दिग्दर्शन केलें. नंतर तिसऱ्या समासांत तिच्या अंतर्गत असलेल्या ज्ञान व अज्ञान यांस व्यक्तदशेस आणिलें. चौथ्या समासांत यांचें च दृढीकरण पिंडांत कसें आहे तें पूर्णपणें दाखविलें. पांचव्या समासांत पिंडब्रह्मांडाच्या ऐक्यमिषानें जाणपणाचें च अवतरण केलें. इतकी पूर्वतयारी श्रोत्यास विषय सहजग्राह्य व्हावा म्हणून श्रीसमर्थांस करावी लागली. आतां सहाव्या समासांत ज्ञानदशकांत दाखविलेल्या मायोद्भवापासून च गुणक्षोभिणी माया कशी व्यक्तदशेस आली व तिच्या अंतर्गत असलेल्या पिंडब्रह्मांडांत जाणपणाचा तंतु कसा अनुस्यूत आहे हें दाखविण्याकरितां व श्रोत्यांच्या लक्षांत विषयाचा धागा नीट यावा म्हणून ज्ञानदशकांतील कथानुसंधान श्रीसमर्थ देत आहेत हें वाचकांच्या लक्षांत येईल च. याशिवाय मागील पाच समासांत सांगितलेल्या विषयाची तंतोतंत संगति सहाव्या समासांत आऊन दाखवावयाची हा श्रीसमर्थांचा मुख्य हेतु आहे हें सांगावयास नको च. असो.

कथानुसंधान दाखवितांना ' आकाश जैसे निराकार । तैसा ब्रह्माचा विचार । तेथें वायोचा विकार । मूळमाया ॥ हें दासबोधांतील सातव्या दशकांत सांगोपांग दाखविलें. तसें च मूळमायेचें पांचभौतिक स्वरूप त्या च दासबोधांतील ज्ञानदशकांत विशद केलें. हा सिद्धांत दासबोधाचें सार होय. या प्रक्रियेच्या वैशिष्ट्याचा उल्लेख सामान्यतः इतर त्यांच्या ग्रंथांतून वारंवार केला जातो. हेतु इतका च कीं, हा विशिष्ट सिद्धांत वाचकांच्या मनांत दृढ मूलत्वानें प्रतिबिंबित व्हावा. अन्वय-व्यतिरेकांत, आत्मारामांत असा च सामान्यतः उल्लेख केलेला आढळतो. ज्याप्रमाणें फणिस उमळून मोकळें होतें त्याप्रमाणें च ही मूळमाया उमळून त्यातून हा त्रिगुणात्मक डिरु व्यक्तदशेला येतो तेव्हां त्या च मायेला गुणक्षोभिणी असें कार्यावरून निराळें नांव दिलें जातें. अर्थात् तिच्यांत गुप्तरूपानें असलेले सत्व, रज, तम असे त्रिगुण ती प्रसवते म्हणजे व्यक्त दशेस आणिते. जाणिवेस सत्व गुण, नेणिवेस तमोगुण व मध्य तो रजोगुण अशीं निरनिराळीं नांवें त्यास दिलीं जातात. पिंडांत जाणिवेची व्याप्ति दाखविली; तिची च व्याप्ति ब्रह्मांडात कशी आहे हें दाखविण्या-करितां मागील समासांत पिंडाचे चार व ब्रह्माण्डाचे चार देह अशी भूमिका अगोदर च तयार करून ठेविली. पिंडांतील चौथ्या देहाची सर्वसाक्षिणी अवस्था म्हटली जाते. आतां मायेंत असलेल्या पंचमहाभूतांत हि जाणिवेचें अधिष्ठान असलें च पाहिजे, कारण मूळप्रकृति हा ईश्वराचा चौथा देह आहे. अशा रीतीनें ब्रह्माण्डांत जाणिवेचें अधिष्ठान सिद्ध केलें.

अहंब्रह्मास्मि असें जें प्रथम स्फुरण झालें ती च मूळमाया होय. हें स्फुरण जाणीवरूप जसें आहे तसें च तें वायुस्वरूप हि आहे. मात्र हे दोन्ही प्रकार एकवटून च सदा एकरूपानें असलेलें तें आढळतें; म्हणून श्रीसमर्थ म्हणतात कीं, मूळमाया वायुस्वरूप आहे. येथें सृष्ट्यादिक इच्छा झाली कीं तिला च अव्याकृति असें नाव देतात. इच्छा चलनात्मक असल्यामुळें गुणाची साम्यावस्था बिघडून ती त्रिगुणांना प्रसवते म्हणून तीस गुणक्षोभिणी असें हि नाव देतात. इकडे पुरुष ( जाणीव ) व वायु

( प्रकृति ) अशीं दोन्हीं एकत्र झालीं कीं मायागुणामुळें सकलांचा ईश जो विशेष अंतरात्मा तो व्यक्तदशेला येतो, तर दुसरीकडे त्रिगुणात्मक पंचभूतें आविष्कृत होतात. अशा रीतीनें जड व चंचल यांचे व्यापार निश्चलावर चालू असतात; यास च 'पुढें जाणीव मध्यस्थ नेणीव। मिश्रित चालिला स्वभाव' असें श्रीसमर्थ म्हणतात. अर्थात् ज्ञान ( महाकारण ), अज्ञान ( कारण ) व वासनात्मक वायु मध्यस्थ म्हणजे लिंग देह यांचें संसरण चालू होतें. तात्पर्य इतकें च कीं, चंचल पिंड व जड ब्रह्मांड यांचें रहाटगाडगें सुरू होतें. पिण्डांत अंतःकरण, मन, बुद्धि, चित्त व अहंकार हे मूळपुरुषाचे अंश असल्यामुळें अंतःकरणपंचक एक च मानलें जातें. या अंतःकरणाच्या पांच हि क्रिया अंतरात्म्याच्या असल्यामुळें त्याला आकाश असें म्हणतात. श्रीसमर्थ या प्रसंगीं दुसऱ्या देहाचें म्हणजे अव्याकृतीचें वर्णन करीत आहेत व येथून च भूतांचा कर्दम कसा झाला तें दाखवीत आहेत. अंतरात्म्यास च ते आकाश मानीत असल्यामुळें शब्दगुणास आकाशाचा कर्दम असा अभिप्राय ते देत आहेत. हा शब्दगुण च मातृकांचा ठाव आहे हें सांगणें नको च. कारण स्वरूपामध्यें जें परारूप स्फुरण होतें तें प्रणवरूप च असतें व त्यामध्यें तत्पदत्वें एकावन मात्रा असतात. तसें च, ॐ पिण्डी परा प्रणव। तोचि वायूचा स्वभाव। देहयोगें सावेव। मात्रा उठती॥ ( अन्वय ३-१८. ) असो.

जेथें वायूचें मुळीं च चलन नसेल तेथें जाणीव लक्षण दिसणार च नाहीं. जाणीव नसेल तर नेणीव तरी कोठली ? म्हणून च वायूकरितां जाणीवनेणिवेचा विचार होतो, वास्तव वायुगुण च जाणीवनेणिवेचा ठाव ठरतो. असा हा वायु कर्दम सांगितला; नंतर अग्नि, जळ व पृथ्वी यांचा कर्दम सांगितला. भूतांमध्यें जाणीव असते च. जाणीवरूपी पुरुषास वायुरूपी प्रकृतीचें चलन मिळत असतें म्हणून जाणिवेस जाणतें चलन असें श्रीसमर्थ म्हणतात. वायु कधीं स्तब्ध तर कधीं चलनात्मक असतो, पण दोन्ही वेळेस वायु च म्हटला जातो. त्याप्रमाणें भूतांत जाणीव कधीं दिसते व कधीं दिसत नाहीं,

पण तेथें ती असते च. याप्रमाणें गुणापासून स्पष्ट दशेला पावलेल्या भूतांचीं रूपें दाखविलीं. परंतु आकाश निराकार व निरवयव असल्यामुळें त्याची अभिव्यक्ति मात्र गुणांपासून होत नाहीं. शब्दगुणास आकाश व्यर्थ च लोक कल्पितात. ब्रह्मापासून झालेल्या मूळमायेच्या लीळेचें जेव्हां परीक्षण केलें तेव्हां तीं त्रिगुणात्मक भूतांची ओतलेली मूस च आहे असें दिसलें. भूतांमध्यें चार भूतें विकारवंत आहेत, आकाश मात्र निर्विकार आहे. उपाधींत सापडलें कीं तें सूक्ष्मरूपानें भासतें, एवढ्या च करितां तें भूतरूप झालें. अविद्येच्या उपाधींत सांपडलें कीं, तें च जीव म्हटलें जातें; मायेच्या उपाधींत सांपडलें कीं, तें च शिव म्हटलें जातें अर्थात् भूतांतरांत जो ब्रह्मांश त्यास च आकाश असें म्हटलें जातें. तो च अवकास व तो च भकास म्हणजे भास. उपाधि नसली कीं, तें च निराभास ब्रह्म होय. पुढें जाणीव नेणीव व मध्यमान असें गुणांचें प्रमाण दाखवून त्यांचीं रूपें हि दाखविलीं. नंतर विकारवंत भूतें एकमेकांत कालवलीं गेलीं कीं, त्यांचे रंग किती पालटतील याचा नेम च नाहीं. एका उदकाचे च, मनुष्यें, वृक्ष, मुळ्या, खोड, साल, पत्र, पुष्प, फळ इत्यादि किती तरी विकार होतात कीं ? पण सालींत अथवा खोडांत फळ सांपडतें का ? तें च उदक जेव्हां शेंड्याला पोहोंचतें तेव्हां फळ दिसतें. त्या वेळेस तें उदकरूप आहे असें वाटतें का ! असा हा एका उदकाचा प्रकार मग त्रिगुणांची खटपट बहुरूप होते व विलक्षण पालटतें यात नवल तें कोणतें ? याप्रमाणें गुणरूपाचें विस्मयजनक वर्णन करून या समासास गुणरूप निरूपण असें अन्वर्थक नाव दिलें व शेवटीं उपसंहार केला कीं, अशा प्रकारच्या प्रवृत्तींचा निवृत्तीनें निरास करून परमात्म्याशीं अनन्य व्हावें.

चौथ्या व पाचव्या समासात जाणीव पिंडांत व ब्रह्मांडांत कशी असते तें दाखविलें. व सहाव्या समासांत गुणमायेच्या घटनेचें व्यक्तरूप दाखवून हीं सर्वभूतें त्रिगुणात्मक आहेत असें ही दाखविलें. त्याचें प्रमाण व रूपें ही दाखविलीं व त्रिगुणांचा सन्निपात चौऱ्यायशी लक्ष योनींच्या

विस्तारास कसा कारणीभूत झाला त्याचें हि विस्तृत वर्णन केलें. पिंडांत व ब्रह्मांडांत ही जाणीव असते च हें हि सिद्ध केलें. आतां हा च धागा पुढें या सातव्या समासांत थोडासा अधिक श्रीसमर्थ वाढवीत आहेत.

ते म्हणतात, जाणीव कला हा अंतःकरणाचा धर्म आहे. अंतःकरण स्मरणविस्मरणीभूत असल्यामुळें त्यास स्थूलाचा च आधार लागतो. म्हणून स्थूल अगोदर कीं सूक्ष्म अगोदर असा श्रोत्यास मध्यें च विकल्प झाला. पण घर अगोदर कीं किडा अगोदर असा प्रश्न विचारून च श्रीसमर्थांनीं श्रोत्याची शंका फेडली. परंतु एवढ्यानें संसाराची पुनरावृत्ति निष्पन्न होत नाहीं. हें संसारचक्र सतत चालू च आहे. एक जीव जातो व दुसरा उत्पन्न होतो. असा च पाठ स्थावरांत हि दिसतो च. तर मग जन्माला कोण घालतो ? व पुनर्जन्म कोण घेतो ? ब्रम्ह्यानें जन्मास घातलें असें म्हणावें तर ब्रम्ह्याला कोणीं निर्माण केलें ? निर्गुण ब्रह्माकडे तर कर्तृत्व येऊं च शकत नाहीं. शिवाय माया स्वतः विश्वरूपानें परिणत झाली असल्यामुळें व विचारापुढें टिकत नसल्यामुळें तिचें हें काम नव्हे हें खास. संचित म्हणावें तर त्याचें तरी काय रूप ? व त्याचा कल्पक तरी कोण ? आतां वासना जन्म घेते म्हणावें तर ती एक अंतःकरणाची वृत्ति आहे व शिवाय अव्यक्त आहे. अंतःकरण म्हणजे जाणती कळा. तिला जन्मसूत्र कसें लागूं शकेल ? जाणीव यत्र देह म्हणावा तर तो केवळ तत्त्वांचें गाठोडें आहे. तेथें कोणास कोण जन्माला घालणार ? तर मग वाळलेलें झाड जसें पुन्हा हिरवाळत नाहीं तसा मेलेला प्राणी पुनः जन्मत नाहीं, असें होत नाहीं कां ? मग अज्ञानी व सज्ञान एक च होतील. मग बंध, मोक्ष, वेदशास्त्रें अवघीं निरर्थक च म्हणावीं लागतील. असें असून हि संसाराची धटामोड अव्याहत चालू आहे ती आहे च, असा प्रत्यक्ष अनुभव आहे. तेव्हां याचा उलगडा मला समजेल अशा रीतीनें करून द्या असे नाना विकल्प श्रोत्यानें श्रीसमर्थांपुढें ठेविले. त्यात सज्ञान व अज्ञानी असे दोन पक्ष पडल्यामुळें श्रीसमर्थ प्रथम

सज्ञानाचें च स्पष्टीकरण या समासांत करीत आहेत. नंतर आठव्या समासांत वासनेचें वर्णन ते करणार आहेत. दोन्ही ठिकाणीं ज्ञानाची च कसोटी लाऊन सज्ञानास मोक्ष व अज्ञान्यास पुनरावृत्ति अशी प्रचीति ते श्रोत्यास आणून देणार आहेत.

व्यवहारांत सुद्धां जेवल्याशिवाय पोट भरतें कां ? प्रयत्नावांचून कार्य होतें कां ? मग ज्ञानावांचून मुक्त होईल कां ? ज्यास पोहावयास येत असेल तो च बुडणार नाहीं, बाकीचे बुडतील च. म्हणून ज्यास आत्मज्ञान झालें असेल त्यास च निर्हेतुक समाधानाची खूण प्राप्त होईल, इतरांस नाहीं. म्हणून अज्ञानी व सज्ञानी एकसारखे नव्हत. वेद, शास्त्र, व संत या सर्वांना जर कोणी अप्रमाण मानूं लागेल तर त्या एकट्याचें च प्रामाण्य तरी कसें सिद्ध होणार ? म्हणून आत्मज्ञानी तो च मुक्त. आत्मज्ञान झालें म्हणजे दृश्य मिथ्या असा अनुभव येतो तोंपर्यंत नाहीं. इतर आपल्या कल्पनेनें च बांधले जातात हें उघड आहे. वस्तुतः बंधन म्हणजे कांहीं च नाहीं असें असून हि बद्धतेनें सर्वांना वेढून घेतलें आहे हें नवल नव्हे कां ! आपली च कल्पना आपणास बाधक हें त्यांच्या लक्षात येत नाहीं म्हणून ते बद्ध. पण ही कल्पनारूपी उपाधि मिथ्या आहे असा अनुभव आल्यावांचून त्यास दुसरा उपाय च नाहीं. एकंदरींत जाणीवरूप प्राप्त झाली कीं, तो मनुष्य उपाधीपासून आपोआप च वेगळा पडतो व नंतर ही जाणीव स्वरूपांत मुरली कीं तो स्वतः आत्मरूप च होतो. मग असा ज्ञानी, बद्धाचा जन्म कसा येतो याचें कौतुक च करतो. जागा असेल तो च, निजलेला का वरळतो असें विचारील, इतर नाहीं. अनुभव घ्यायचा असेल तर विवेकास दूर सारून बद्धाचें लक्षण पहावें. पण सिद्धाच्या ठिकाणीं वृत्ति लागली तरी तो बद्धाप्रमाणें गुंयात पडत नाहीं. इतक्यानें च श्रोत्याची शंका फिटली व ज्ञानानें च मोक्ष होतो व विवेकानें आत्मस्थिति प्राप्त होते हें श्रोत्याच्या प्रचीतीस आलें. याप्रमाणें श्रीसमर्थांनीं श्रोत्याच्या विकल्पाचें निरसन केलें म्हणून या समासास विकल्प निरसन असें नाव दिलें.

सहाव्या समासांत मूळमायेपासून गुणक्षोभिणी माया व तिच्या-पासून सत्व, रज व तम या गुणांची उत्पत्ति दाखविली. शुद्ध सत्वगुण म्हणजे ज्ञान व तमोगुण म्हणजे अज्ञान असें सांगून त्याच्या पूर्वीच्या समासांत सिद्ध केलेलें जाणपण म्हणजे च सत्व गुण अशी संगति हि लाऊन दिली. पैकीं ज्ञान हें मोक्षास कारणीभूत कसें होतें व त्याच्या विपरीत जें अज्ञान तें बंधास कसें मूळभूत आहे याचा सविस्तर विचार सातव्या समासांत सांगितला. पण ज्ञानाज्ञान मिश्रित असा जो मध्यस्थ रजोगुण त्याचें कार्य दाखवितां आलें नाहीं. पुनरावृत्ति हा रजोगुणाचा परिणाम आहे. मी च देह असें म्हणणारा मनुष्य च बद्ध म्हटला जातो. केवळ ज्ञानी मुक्त असतो व केवल अज्ञानांत तर जाणीव लीन झालेली असते म्हणजे व्यक्त नसते. पण देहामध्यें जाणीव नेणिवेचें मिश्रण असतें म्हणून जीवास पुनर्जन्म प्राप्त होतो.

श्रोत्याच्या शंकेच्या पूर्वार्धाचें ' ज्ञानी ज्ञानमतें सुटला ' असें पटवून च उत्तर दिलें. त्याच्या उत्तरार्धाचें म्हणजे देहधाऱ्याचें ( बद्धाचें ) अंतकाळीं काय जन्मतें याचें उत्तर आठव्या समासांत देण्यांत येत आहे. मागील समासांत श्रोत्यानें शंका घेतली होती कीं जन्म होण्यापूर्वी स्मरण व विस्मरण हीं दोन्हीं नव्हतीं. पण जाणती कळा जें अंतःकरण त्यांत हे मध्यें च निर्माण झालें. नंतर मरणसमयीं ' स्मरण विस्मरण राहिलें । मग देहास मरण आलें । पुढें जन्मास घातलें । कोणास कोणें ॥ ' याचें मला समाधान करून द्या. श्रीसमर्थ म्हणतात कीं, मरणसमयीं पंचप्राण आपापलीं स्थानें सोडून देहाबाहेर जातात हें खरें पण ते वासनामिश्रित असतात. प्राणरूप वासनावृत्ति वायूबरोबर जाते म्हणून मरणानंतर ती वायूरूपानें च राहते व मग हेतुपरत्वें पुनः जन्म घेऊन येते. असें नसतें तर सर्पदंशानें मेलेल्या मनुष्यास तीन दिवसानंतर मांत्रिक कसे उठवितें ? शापग्रस्तास पूर्वदेह कसा प्राप्त झाला असता ! परकायाप्रवेश कसा करितां आला असता ?

यावरून वासना जरी दिसत नसली तरी ती पुनः जन्म घेते हें स्पष्ट दिसतें. याचें च तत्वदृष्टीनें ते आता विवरण करीत आहेत.

जाणीव मूळचा मूळ तंतु आहे म्हणजे पुरुष आहे व वायु ही प्रकृति आहे. दोहोंच्या एकरूप मिश्रणास च माया असें म्हणतात. या मायेंत जाणीव तंतु ( ज्ञान ) कारणरूपानें मिश्रित असतो. यास्तव तो ब्रह्माण्डात कारणरूपानें च आढळतो. पण पिंड हें मायेचें कार्य असल्यामुळें त्यात तो कार्यरूपानें राहतो. तातटीनें त्याचें अनुमान आपण करू लागलों तर तो आपणास सापडत नाहीं परंतु सूक्ष्मरूपानें तो तेथें असतो च. त्याचें पिंडात राहण्याचें स्थान अंत करण हें होय. अंतःकरणात जाणीव कळा जी असते ती च पुरुषाचा अंश. वायुरूप प्राणपंचक हें च प्रकृतीचा अंश असून तें अंत.करणाचें चालक असतें. आता काहीं हेतु धरून जी जाणीव असते तिला च वासना असें म्हणतात. पण ती हि एक अंत करणाची वृत्ति आहे. मागें सांगितलें च आहे कीं, ज्ञान हा महाकारण देह अज्ञान हा कारण देह व वासनात्मक वायु हा लिंगदेह. ज्ञानाज्ञानाचें सविस्तर वर्णन मागील समासात झालें आहे व प्रस्तुतच्या समासात रजोगुणाचें म्हणजे वासनात्मक वायूचें वर्णन ते देत आहेत. मरणसमयीं हा वासनात्मक वायु च देह सोडून जातो म्हणून च ही प्राणरूप वासनावृत्ति वायूबरोबर जाते व वायुरूपानें राहते. हा लिंग देह सूक्ष्म पंचकाचा च बनलेला आहे म्हणून यात अंत करणपंचक व वायुपंचक इत्यादि सूक्ष्मरूपानें असतात च. पुढें या जाणीव वासनेनें जो हेतु धरलेला असतो तो च अनुकूल समयीं उदयोन्मुख होतो व अंत करणद्वारा पुनर्जन्मास कारणीभूत होतो. यास च ' पुन जन्म घेऊन आली हेतुपरत्वें ' असें श्रीसमर्थ म्हणतात. वासना ही वायुरूप असून सूक्ष्म आहे व तिच्यात जाणिवेचें अधिष्ठान आहे म्हणून तीस मिथ्या म्हणता येत नाहीं. गुप्त अथवा प्रगट वायु सृष्टीच्या वर्तती गतीवरून आपणास कळतो कीं नाहीं ! संसारात सुद्धा भूतें, दैवतें, ब्रह्मसमंध इत्यादि शरीरांत संचार करतात हें

आपण प्रत्यक्ष पाहतों हें सर्व वायुरूप वासनेमुळें नव्हे कां ? इतकें च नव्हे तर हा वासनारूप वायु देहाच्या आधारानें गुप्त धन दाखवितो, गुंतले उगवितो. वगैरे वासनेचीं प्रत्यक्ष कार्यें पहातां वासना वायुरूप च आहे. वायूशिवाय कर्तृत्व दुसऱ्या कोणाच्या अंगीं आहे बरें ! आतां वासना वायुरूप आहे असें सिद्ध केल्यावर वायूंत जाणिवेचा प्रकार कसा आहे तो दाखवितात. मूळ जाणीव जशी ब्रह्मांडांत गुप्त व पिंडांत प्रत्यक्ष दिसते त्याप्रमाणें च ती कधीं वायूमध्यें गुप्त तर कधीं प्रगट असते. नुसता वायु वाहत असला तर जाणीव प्रगट होत नाहीं. पण त्या च वायूनें हातपाय वाळले, दीपरागानें प्रत्यक्ष दिवे लागले, केवळ फुंकण्यानें रोग बरे झाले, वेड्याचे धड झाले, मंत्रानें विष उतरलें वगैरे अनेक कार्यें जाणिवेचीं पाहिलीं म्हणजे हा सर्व खेळ जाणीववासनेचा च आहे असें ठरत नाहीं कां ? असो. या सर्व उपपत्तीवरून वद्धाला वासनेमुळें जन्म येतो हें श्रोत्याच्या प्रचीतीस आलें व देहाचा अंत झाल्यावर वासना वायुरूप राहते व ती पुनर्जन्मास कारणीभूत होते; म्हणून या समासास देहांत निरूपण असें योग्य नांव दिलें व जाणीववासनेंत प्रकृतिपुरुषत्व कसें आहे तें हि विशद केलें.

पहिल्या पांच समासांत जाणीव व नेणीव विशेषतः पिंडांत व ध्वनिरूपानें ब्रह्मांडांत दाखविली. सहाव्या समासांत गुणमायेचा विस्तार दाखवून ज्ञानाज्ञानाची संगति सत्व व तमोगुणाशीं दाखवून मध्य जो रजोगुण तो हि व्यक्त केला. ब्रह्मांडांत जाणिवेची पूर्ण व्याप्ति दाखविली; पण रजोगुणाचें उत्तरदायित्व दाखवितां आलें नाहीं. ज्ञानानें संसाराचा उपशम होतो असें सातव्यांत व रजोगुणानें पुनरावृत्ति होते असें विशेषतः आठव्यांत सांगितलें. सारांश ब्रह्मांडांत जाणीव कारणरूपानें राहते व पिंडांत कार्यरूपानें. गुणसन्निपातामुळें त्या जाणिवेचें स्वरूप वासनेंत परिणत होतें. ही जाणीववासना हा चराचर सृष्टीची पोषक जननी किंवा दृश्य स्वरूप होय. चराचरसृष्टीच्या सातत्याला ही च कारण आहे; असें हि निदर्शनास आणून दिलें. यावरून ही पिंडब्रह्मांड रचना ब्रह्मांत

च राहते असें च सिद्ध होतें व प्रत्यक्ष असें दिसत हि आहे. पहिल्या समासात ब्रह्म निर्गुण आहे असें दाखविलें गेलें व आता तर गुणाचा निस्तार पूर्णपणें दाखविला गेला. तसें च ब्रह्म अद्वय आहे, त्यात दुसरें वड च नाहीं असें हि तेथें सांगितलें गेलें. मग या ब्रह्माण्डाचा शिरकाव त्यात कसा झाला ? तें तर अभेद्य आहे. ब्रह्माण्डात ब्रह्म आहे हें म्हणणें योग्य दिसतें पण ब्रह्मात ब्रह्माण्ड आहे असें म्हटलें तर त्याचा भेद होत नाहीं का ? तर याचा मला उलगडा करून द्या असें श्रोत्यानें विनविलें श्रीसमर्थ उत्तर देतात कीं, आकाशामध्यें दिवा लाविला तर त्या दिव्यानें आकाश परतें केलें असें होतें का ? चारी भूतें आकाशात आहेत च तरी सुद्धा आकाश जसें या तसें च निश्चळ आहे ना ? प्रचीति अशी आहे कीं जें जडत्वास येतें तें च नाश पावतें चारी भूतें जड म्हणून त्याचा नाश होतो पण तीं गगनास भेदू शकत नाहींत असें प्रत्ययास येतें ना ? आता गगनाचा विचार करू या. वेगळेपणानें म्हणजे द्वैतभावानें जेव्हां आपण ब्रह्माकडे पाहतों तेव्हा त्यास आपण आकाश असें म्हणतों. द्वैतभाव सोडून आकाश जर पाहू लागलों तर तें च निराभास ब्रह्म होय वस्तुस्थिति अशी आहे कीं, आपण स्वत वस्तु न होता जेव्हा निर्गुण ब्रह्माकडे पाहू लागतों तेव्हा तें निर्गुण असताना हि ब्रह्मासारखें भासू लागतें व कल्पनेला तें तसें दिसू हि लागतें. मग या भासलेल्या ब्रह्मास आपण आकाश म्हणतों तें केवळ कल्पनेसाठीं च. म्हणून च कल्पनेला जेव्हा भास भासतो तेव्हां च आकाश समजावें, ब्रह्म तर निर्विकल्प व निराभास आहे. हा सर्व खेळ द्वैतभावनेचा म्हणजे केवळ कल्पनेचा आहे. दुसऱ्या रीतीनें सांगावयाचें अमेळ तर भूतातरीं जो अवकाशाचा भास असतो त्यास च आकाश अर्थात् अवकाश ना असें म्हणतात हीं सर्व भूतें येतात व जातात म्हणून मिथ्या. या मिथ्या भूतानीं आकाशाचा ( शून्या ) भंग कसा होईल ? तर मग भ्रमानें च हें सर्व जग प्रत्यक्ष दिसतें असें च सिद्ध होत नाहीं का ? भ्रमाचा जर आपण शोध घेऊ

लागलों तर विचारापुढें तो मुळीं च टिकत नाहीं. मग कोणी कोणास भेदिले ? भ्रमानें भेदिलें म्हणावें तर भ्रम जात्याच खोटा आहे. तर मग भ्रममूल भूगोलरचना ब्रह्मास कशी भेदूं शकेल ? जर भ्रम च लटिका तर लटिक्याचें कारणे हि लटिकें च, असें शहाणे मात्र समजतात. तर मग हें दृश्य सर्व कल्पनेचें आहे. कल्पना ही बुद्धीवर अवलंबून असते. जशी बुद्धि तसा तिचा प्रकाश. ही बुद्धि जर आपण विशाळ केली तर हें सर्व ब्रह्माण्ड आपणाला कवठासारखें भासूं लागेल; त्याहून हि विशाळ केली तर बोराएवढें व नंतर वटबीजाप्रमाणें भासूं लागेल; व आपण च जर परिपूर्ण झालों म्हणजे भेद न राहता वस्तु च झालों तर कांहीं च भास भासणार नाहीं. आपण साडेतीन हाताचे देह अशी कल्पना करून जर लहानाळलों तर मग आपल्या बुद्धीला ब्रह्मांड कसें कवळतां येईल ? एवढ्या च करितां बुद्धीचें वृत्तिज्ञान इतकें वाढवावें कीं तें पूर्ण ब्रह्मास चहूंकडे पुरेल. अशी स्थिति प्राप्त झाल्यावर वृत्तिज्ञान ब्रह्मास स्वतः कवळूं शकत नसल्यामुळें तें फाटून त्याच्यात च मुरून जाईल व मग केवळ निर्विकल्प निराभास असा आत्मा च उरेल अर्थात् ज्ञान च विज्ञान होईल. मग आपणास वेगळेपणानें शोधण्यास अवकाश च मिळणार नाहीं. पण अनुमान किंवा कल्पना तोडण्यास विवेक च लागतो व आत्मनिवेदन झाल्यावर सायुज्यता प्राप्त होते. प्राप्त होते असें म्हणण्यापेक्षा आपल्या असलेल्या स्वयंसिद्ध स्वरूपानें च आपण उरतों मग प्रत्यक्षाला प्रमाणाची आवश्यकता च उरत नाहीं. याप्रमाणें श्रोत्याचा संदेह फिटला म्हणून यास संदेहवारण असें नांव दिलें गेलें.

पहिल्या समासांत ब्रह्म या सकळां परतें आहे असें म्हटलें होतें त्याचें च विस्तारपूर्वक रहस्य या नवव्या समासांत सांगितलें. गुणांचा विस्तार, मूळमाया, प्रकृति पुरुष हीं सर्व च लटिकीं असें सिद्ध केल्यावर मग ब्रह्म या सगळ्याच्या पलीकडे आहे हें आपोआप च ठरतें. त्याच्यावर माया हें विवर्तरूप मिथ्या भान आहे असें पूर्वी च सातव्या दशकांत सांगितलें आहे. त्याचें च दृढीकरण या दशकांतील दुसऱ्या समासांत